**ती. सौ. आईला आणि ती. दादांना**

हे पुस्तक मी अर्पण करीत आहे.
आपल्या मतांची नि हट्टांची त्यांनी
आम्हां भावंडांवर कधीही बळजवरी
केली नाही. आमच्या मनाची वाढ
मोकळेपणानं होऊ दिली—

**दिगंबर**

नजरभेट झालीच तर दोघांनीही झरकन् माना वळवाव्यात--अशी कांहीं गम्मत चालली होती. शामची अवस्था अगदीं कींव येण्यासारखी झाली. तोंच त्याची बहीण पुढं आली. बॅड्मिंटनच्या रॅकेट्स् त्यांच्या हातीं देत ती म्हणाली,—

' तुम्हीं दोघं एखादी गेम खेळा–तोंवर मी चहा करते. '

खालीं येऊन दोघांनीं खेळायला सुरवात केली. खेळ संकोचानं चालला होता. ती बरं खेळत होती. पण शामचं लक्ष मात्र खेळांपेक्षां तिच्या हालचालींकडेच जास्त होतं. आपलं लक्ष तिच्याकडे आहे, हें तिच्या लक्षांत आलं तर तिला काय वाटेल, या भीतीनंच तो खेळाकडे मधून मधून लक्ष देत होता.

खेळ संपल्यानंतर त्यांनीं चहा घेतला. तोंपर्यंत बरीच संध्याकाळ झाली होती. ती जायला निघाली तेव्हां श्यामच्या बहिणीनं त्याला म्हटलं,--

' अरे ! तिला पोंचवून ये घरापर्यंत. काळोख पडलाय् बाहेर. पण घरांत शिरू नकोस हं. '

शिरावर पडलेली कामगिरी गोड होती, पण तितकीच अवघडही होती. रस्त्यांत तिच्याशीं बोलायला हवं. तें काय बोलायचं ? आपण तिच्याशीं बोललों नाहीं, तर ती काय बोलेल ?

त्याला मुका पाहून तीच बोलली. तिनं विचारलं,—

' किती मुली पाहिल्या तुम्ही ? '

' एकच. '

' म्हणजे मी दुसरी. '

' अंहं ! तूंच पहिली. पाहिली नि पसंत केली. '

' अजून पंधरा दिवस आहेत. नीट पाहून घ्या. '

' छे ! छे ! मी ठरवलंच होतं कीं सांगून आलेल्या पहिल्या मुलीशींच लग्न करायचं. उगीच खेळ नकोत. '

' खरंच ! मुलींचे भारी हाल होतात. मी सुद्धां मनांत म्हणत होतें कीं, पहिलाच मुलगा यावा नि--'

म्हणजे दुसरीकडे कुठंच दाखविली नाहीं तुला ?

'नाही.'

'खरंच ?'

'खरंच का विचारलंत ?

'मला आनंद झाला. मुलगी पहाणंबिहणं मला पसंत नाही. सौदा वाटतो सगळा.'

'वाटून काय उपयोग ? आपला समाजच तसा. सर्वांनाच प्रेम करण्याची संधि कुठली येते ?'

'तरीपण उगीचच फार मुली पाहूं नयेत.'

'मलासुद्धां तसं वाटतं ?

'एक विचारूं कां ?'

'विचारा.'

'आपण लग्न कसं करायचं ?'

'कसं म्हणजे ?'

'वैदिक—जुन्या कीं रजिस्टर पद्धतीनं !'

'वैदिक.'

'मला तसंच वाटतं. थोडक्या खर्चात नि वेळांत.'

'तुमच्या घरच्या माणसांचं काय मत आहे ?'

'माझ्या बाहेर नाहीत कुणी. सुधारलेले आहेत सगळे. तुला सगळी जणं आवडतील. नक्की सांगतों.'

ती म्हणाली,'—मी पण त्यांना आवडेल अशीच वागेन.'

तो म्हणाला,—'मी स्वत: अगदीं धर्मबाह्य वागतों. पण कधीं कुणी कांहीं म्हणत नाहीं.'

'असं वागणं चांगलं नाही. !'

'तसाच अगदीं वागत नाही. शनिवारीं मारुतीला जातो.'

'असं श्रद्धेचं कांहीतरी हवंच. मी पूजा करायची ठरवलंय्.'

'कर.—मी चांदीचे देव आणीन करून.'

तिला निरोप देऊन आल्यावर त्याचं मन आनंदानं फुलून गेलं. त्याच्या मनांत आलं किती विचारी मुलगी आहे ! नाहीं तर भोंवतालीं इतर मुली दिसतात. आपलं नशीब थोर.

लहान माणसांनीं केलेले बेत पार धुळीला मिळवावे, याचसाठीं देवानं मोठ्या माणसांना जन्म दिलेला असावा. त्या दोघांनीं वैदिक पद्धतीनं लग्न करायचं ठरवलं. पण इकडे घरांत काय ठरलं ? अगदीं जुन्या पद्धतीनं टामटुमीत लग्न करायचे बेत घरांत चालले होते. त्याला त्यांच्या त्या गोष्टी अगदीं ऐकवेनाशा झाल्या. पांच दिवस लग्न चालायचं ! काळ कोणता आला आहे, हेंसुद्धां या माणसांना कळूं नये ? आणि—

आणि लतेला काय सांगायचं ? तीच सारी भीति त्याला वाटत होती. ती विचारील—'काय हो ! हीच का तुमची सुधारलेलीं माणसं ? मारे नाहीं नाही तें सांगत होतां.—आपल्याविषयीं तिचं मत काय होईल ! नाराज होईल बिचारी.'

संध्याकाळीं ती आली. चहापानानंतर तिला पोंचवायला तो गेला. वाटेंत त्यानं म्हटलं,—

'आमच्या घरचे लोक वेडे आहेत.'

'आमच्या घरचेसुद्धां अगदीं रानटी आहेत.'

'जुन्या पद्धतीनं लग्न झालं पाहिजे, असं सारीं म्हणतात.'

'माझे वडील असंच म्हणाले. आपण काय करणार ?'

'मला वाटलं तूं रागावली असशील.'

'कां ?'

'मी तुला नाहीं नाहीं तें सांगितलं.'

'म्हणून तुमच्यावर का रागवायचं ?'

'दोष माझा होता म्हणून.'

'तुमच्यावर रागावण्यापेक्षां मी स्वतःवर रागावेन.'

तिचं बोलणं त्याला फारच आवडलं. किती नम्र नि योग्य ! कुठं खोडी काढायला जागा नाहीं. थोडा वेळ दोघं मुक्यानं चाललीं. मग त्यानं विचारलं,—

'पुढं शिकायची हौस आहे का ?'

‘ हौस आहे पण नि नाहीं पण. ’

‘ म्हणजे ? ’

‘ शिकूं दिलं तर शिकायचं. ’

‘ तुला उत्साह असेल तर शकि. ’

‘ पण मामंजी——’

‘ त्यांच्या परवानगीचं मी पाहीन. ’

‘ पण त्यामुळं मला घरांत भांडणं झालेलीं आवडायचीं नाहींत. त्यापेक्षां न शिकलेलं बरं. ’

तिचीं हीं सारीं समंजसपणाचीं बोलणीं ऐकून त्याला प्रेमाचा उमाळा आला. त्याला वाटलं जवळ घेऊन तिला शाबासकी द्यावी. पण दोघं भर रस्त्यावर होतीं. असा अतिरेक तिला आवडला नसता नि त्याला स्वत:लाही आवडला नसता.

लग्नाचा दिवस जवळ येत चालला होता. रोज संध्याकाळीं ती येत होती नि बोलायला मिळत होतं. पण जें बोलायचं होतं, तें इतकं होतं की महिने नि वर्षे त्याला अपुरीं पडलीं असतीं. जें मनांत सांगायचं होतं, तें थोडक्यांत सांगावं लागत होतं. ती असतांना घरांत लहानसहान प्रसंग घडत. त्यामुळं तिची समजूत भलतीच होण्याचा संभव होता. ते प्रसंग तिला समजावून सांगण्यास संध्याकाळीं मिळणारा वेळ पुरेसा नव्हता.

गम्मत म्हणून, तिनं जितक्या मैत्रिणी बोलावल्या असतील, तितके मित्र त्यानं बोलवावे असं दोघांनीं ठरवलं. भेटी घ्यायच्या नाहींत नि लग्नांत फाजील सोहाळे करूं द्यायचे नाहीत, असा त्यांनीं निश्चय केला. तसंच उखाणे न घेतां नांव घ्यायचं असं ठरलं. एकदां तिनं विचारलं,—

‘ कसं नांव घ्याल ? ’

‘ तूं कसं घेशील ? ’

‘ आधीं तुम्हीं घ्या ना. ’

‘ मग तूं घेतलं पाहिजे हं. ’

‘ घेईन. ’

‘ लतिका. ’

'श्याम.'

परस्परांची हांक ऐकून दोघें वेडीं झालीं. तिचा हात धरून तो हळूंच म्हणाला,—

'लता.'

'श्याम.'

'आज अगदीं नवा आनंद मिळाला.'

'मलासुद्धां.'

'साध्या शब्दानं हृदय इतकं फुलून येतं! स्त्रीपुरुषांसंबंधीं माझे कांहीं मित्र आचकट बोल बोलतात. पण तसं यांत कांहीं नाहीं! अगदीं पवित्र नि उच्च आहे सगळं.'

'माझ्या मैत्रिणीसुद्धां अश्लील बोलतात. त्यांना खऱ्या प्रेमाचं मर्मच माहीत नाहीं.'

तो एकदम म्हणाला,—

'तुझं नांव मी बदलणार नाहीं.'

'खरंच! अगदीं खरं?'

'आहे तें नांव कमी सुंदर का आहे?'

तिनं खालीं पाहिलं.

तो म्हणाला,—

'तूं सुद्धां काय कमी सुंदर आहेस?'

लाजेनं लाल होत ती म्हणाली,—

'इश्श! कांहीं तरीच!'

सुख स्वप्नांत रंगत तो घरीं आला. तों घर पाहुणेमंडळींनीं गजबजलेलं दिसलं. त्याचे मामा आले होते. दोन चुलतभाऊ आले होते. मोठी बहीण आली होती.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळपर्यंत तो अगदीं कामांत होता. संध्याकाळ होतांच सारीं कामं बाजूला सारून तो तिची वाट पहात घरांतच राहिला. तिची यायची वेळ टळून गेली तेव्हां अस्वस्थ होऊन त्यानं वर खालीं खेपा घालायला सुरवात केली. कुणीतरी म्हटलं,—

'हा असा कां फिरतोय् ?'

त्याची बहीण म्हणाली,—

'ती एक लघुकथा आहे.—एक तो होता नि एक ती होती. ती रोज संध्याकाळीं येत असे. एक दिवस ती आली नाहीं.—

त्यानं बहिणीकडं डोळे वटारून पाहिलं. बहीण म्हणाली,—

'डोळे काय वटारतोस ? मी काय डोळ्यांत शिरणार आहे ? हें पहा ! ती आज येणार नाहीं.'

'ती कोण ?'

'संध्याकाळीं येत असे ती.'

'वा ! म्हणजे आधींची ओळख आहे वाटतं ? मग डब्बल लाडू दिले पाहिजेत.'

ती येणार नाहीं, हें कळतांच त्याच्या साऱ्या उत्साहावर पाणी पडलं. कांहीं काम करूं नये, असं त्याला वाटूं लागलं. एका बाजूला जाऊन आरामखुर्चीवर तो पडून राहिला. त्याच्या मनांत आलं कीं तिनं एकदां येऊन जायला काय हरकत होती ? तिच्याकडे गेलं तर? पण तिथंसुद्धां पाहुण्यांची अडगळ असणारच. त्या अडगळींत आपला जिन्नस सांपडेल कीं नाहीं ? चिडून त्यानं मनाशीं म्हटलं—पुन्हां तिच्याशीं लग्न करायचं, तेव्हां दुसऱ्या लोकांची ब्याद ठेवायची नाहीं!

लग्नाच्या क्षणापर्यंत त्याला तिचं दर्शन झालं नाहीं. जे कपडे करायचे होते, ते त्याला तिच्या पसंतीनं करायचे होते. तिला न दाखवतांच पोषाख झाला, याचं त्याला फार वाईट वाटलं. लग्नसमारंभांत तिला पुरती पहाण्याची संधीसुद्धां बहिणींनीं मिळूं दिली नाहीं. मग बोलणं कुठलं ? जेव्हां मुंडावळ्या डोलत किंवा विहिणी नाचत असत, तेव्हांच तिचं ओझरतं दर्शन मिळायचं.

लग्नांतही एकंदरींत अनिष्ट प्रकारच फार झाले. नाहीं नाहीं ते सोपस्कार करून घ्यावे लागले. तिला वाटेल ते उखाणे घ्यायला सांगितले. डोळ्यांत होमाचा धूर तासन् तास घेऊन बसावं लागलं. त्यामध्येंच जेवणावळीच्या आधीं कांहीं हुच्च पोरांनीं भांगेचा कार्यक्रम केला. त्याला स्वतःला त्यांत भाग घ्यावा लागला. त्यानं थोडीशीच भांग घेतली. पण इतरांनीं मनसोक्त पिऊन जेवणाचा विचका केला.

त्यांतच एक अनाहुत पाहुणे लग्नाला आले होते. त्याच्या एका काकानं गोव्यांतील एका बाईशीं लग्न—नव्हे ती त्यांच्याजवळ रहात होती. तिला घेऊन बोलावण्याची वाट न पहातां ते आले होते. तो त्यांचा सर्वांत लाडका पुतण्या होता म्हणून अधिकारानं ते आले होते. पण त्यांचं येणं कुणाला आवडलं नव्हतं. त्या बाईसाठीं स्वतंत्र खोली दिली होती. तिच्या भांड्यांना किंवा कपड्यांना बायका कुणी शिवत-सुद्धां नसत. मात्र तिला पहाण्यासाठीं खोलीवरून हजारदां खेपा घालण्यास कुणी चुकत नसे.

लग्न लागलं, त्या दिवशीं संध्याकाळीं तो एकटा बसला असतां हे काका तिथं आले. त्यांनीं मग जें सांगितलें तें इतकें लज्जास्पद होतं! पहिल्या रात्रीबद्दल त्यांनीं सारं सांगितलं. ते मुळींच ऐकवत नव्हतं. स्वतःचे त्यांनीं अनुभव सांगितले. त्यांची पहिली बायको फार लहान होती. साधा एकादा प्रसंग सांगावा, तशी त्यांनीं ती हकीकत सांगितली नि मग समारोपाचे वेळीं म्हणाले,—

'तुला आजच काळजी घेतली पाहिजे. गोड बोल, पण फार गोड बोलूं नकोस. जरा वचक राहील, असा वाग. आतांच जरब ठेवावयची वेळ आहे. कठोर वागलास तर आदर करील ती. पण मिळमिळीत वागलास तर—तुझी देवालाच काळजी! तुम्ही हल्लींची मुलं हळूबाई आहांत—म्हणून म्हणतों...ती रडेल. पण जरी ती रडली तरी—'

त्याला हें सारं ऐकवेना. तो एकदम म्हणाला,—

'काका! मला समजलं—मी जातों.'

रात्रीं बराच वेळ सारीजणं जागत बसलीं होतीं. कांहीं बैठे खेळ झाले. कांहीं गाणीं, कांहीं नकला, अशावारी दोन वाजले.

दोन वाजतां तो आपल्या खोलीत गेला. खोली हवेशीर आणि मजल्यावर होती. खालीं लहानसा बाग होता. दोन्ही भिंतींतल्या खिडक्यांतून चांदणं आंत आलं होतं. त्यानं पलंगाकडं पाहिलं. पांढरी शुभ्र चादर नि झालरीच्या उशा. नि उशावर दोन टवटवीत हार ठेवलेले.

तें पहात असतां काकांनीं पढवलेलं सारं त्याच्या मनांत आलं. कांहीं लाज न ठेवतां काकांनीं जसं आपल्याला सांगितलं, तसं तें कुणी तिला सांगितलं असेल

कां ? तसं सांगितलं असलं, तर तिच्या मनावर त्याचा काय परिणाम झाला असेल ? छे ! त्याला कल्पनाच सहन करवेना.

इतक्यांत दरवाजा वाजला. ती आंत आली, हें तो समजला. पण त्यानं मान फिरवली नाहीं. दरवाजाला कडी घातलेली ऐकूं आली. मग तिचीं पावलं जवळ वाजलीं. मान वर करून त्यानं तिच्याकडं पाहिलं. लाजेनं चूर होऊन तिनं मान खालीं घातली.

आपल्यासारखाच तिलाही धडा दिला असल्याची त्याची खात्री झाली. आपल्याला ज्याचं इतकं वाटलं, त्याचा तिच्या मनावर तर फारच परिणाम झाला असेल. हळूच तो म्हणाला,—

‘ ये बैस. ’

ती खिडकीजवळ येऊन शेजारी उभी राहिली. तो म्हणाला,—

‘ चांदणं गोड पडलंय् नाहीं ? ’

खिडकींतल्या कुंडीमधलीं पानं खुडीत खालच्या मानेनंच तिनं... ‘ हं–हं ’ केलं.

नंतर काय बोलावं, हें त्याला सुचेना. लग्नांत जे अनिष्ट प्रकार करावे लागले, त्याबद्दल तिची क्षमा मागावी कां ? पण सुरवात कशी करायची ? दुसरं कांहीं बोलावं–तर काय बोलायचं ? तो गोंधळांत पडला. तोंच तिनं विचारलं,—

‘ भांगेमुळं त्रास नाहीं ना झाला ? ’

तिनं प्रश्न केल्यामुळें त्याला बरं वाटलं. तो म्हणाला,—

‘ छे ! मी नांवापुरती अर्धा पेला घेतली. ’

‘ वाढतांना बायकांच्या कमरा मोडल्या. ’

‘ त्या सर्वांनीं फारच घेतली. ’

‘ पण लग्नांत असले प्रकार—’

‘ मी सांगून पाहिलं–पण एकटा काय करणार ? ’

‘ आपण तरी घ्यायची नव्हती ! ’

‘ घेतली नसती तर पेल्यावर पेले पाजली असती. ’

‘ शी शी ! सारीजणं ओकत काय होती. ’

‘ मी काय केलं ? ’

‘ तुम्ही पडून होतां. पण बाकीचे ? कुणी हसत होते. ओरडत होते. ’

‘ मला सारं कळत होतं. पण हालचाल होत नव्हती. ’

‘ त्यांत गोव्याचे काका भर घायला. ’

काकांचं नांव निघतांच संध्याकाळची आठवण झाली. त्यानं विचारलं,—

‘ तुला कुणी कांहीं सांगितलं ? ’

तिनं मान हलवली.

तो म्हणाला, ‘ मला काकांनीं सांगितलं,—शी ! मला आवडलं नाहीं. ’

‘ मला मुद्धां—नि सांगितलं तें सारं—’

‘ पुस्तकांत वाचलं होतं. ’

‘ ऐकतांना अगदीं घाणेरडं वाटतं. ’

‘ बरोबर आहे. ’

तिनं विचारलं,—‘काकांबरोबर ती बाई कोण हो ? ’

‘ जवळ जवळ बायकोच म्हण त्यांची. ’

‘ फार मोकळेपणानं दोघं वागतात. ’

‘ तिची जात वेगळी आहे. ’

‘ कोणती ? ’

‘ तिला जातच नाहीं. ’

‘ पण बायकोपेक्षांही चांगलं वागवतात तिला, असं दिसतं. ’

‘ काकांचं नेहमीं असंच. थोडसं जगाविरहीत, पण जगाला धडा घालून देईल असं. ’

‘ म्हणजे कसं ? ’

‘ लग्न केलं नाहीं तिच्याशीं. पण बायकोसारखं प्रेम केलं. खरं म्हटलं तर त्यानीं लग्नच हवं करायला. ही बाई जन्मभर जवळ राहणारच. नाहीं तरी लग्न म्हणजे काय ? जन्मभर बाळगलेली बाई. ’

‘ इश्श ! कांहीं तरीच तुमचं. संस्कार नको पहायला. ’

' संस्कार ग कसले ? काका पहा तिला कशी वागतात. बायकोवर संतापणं–वैतागणं–तिच्या जवळून गुरासारखे कष्ट करून घेणं, हें सारं वगळून दोघं पतिपत्नी आहेत. '

' खरंच असं वागतात ते ?'

' हो. '

' तुम्ही असेच वागाल ना ? '

' हो. '

' कधीं रागवायचं नाहीं. '

' नाहीं. '

' कधीं वैतागायचं नाहीं. '

' नाहीं. '

' वैराग्य आणायचं नाहीं. '

' नाहीं. '

' प्रतारणा करायची नाहीं. '

' नाहीं. '

' हंसतखेळत संसार करायचा. '

' कबूल. '

' मी पण माझी कबुली देते. मी कष्ट करीन. दागिनें वगैरेंची फाजील हाव ठेवणार नाहीं. हंसतखेळत वागेन. '

तिचे दंड धरून तिला हलवीत तो आवेगानं म्हणाला,—

' किती चांगली आहेस तूं ! '

' आपण माझ्याहून चांगले आहांत. '

तिचा ' आपण ' शब्द त्याला फार आवडला.

मग त्यानं लग्नाला आलेले पाहुणे–घरांतील नेहमींचीं माणसं–एकंदर घराण्याची माहिती–अशी सगळी हकीगत तिला सांगितली. घर केव्हां बांधलें, आर्थिक स्थिति काय आहे, कर्ज किती आहे वगैरेसंबंधीं माहिती दिली. तिनं पण

आपले लहानपणचे दिवस–शिक्षणाचे दिवस–माहेरची माणसं इत्यादीविषयीं सारं सारं सांगितलं.

तोंच तिचं लक्ष पलंगावरच्या हाराकडं गेलं. त्याचीही नजर तिकडे वळली. तो म्हणाला,—

' चल ! हार घालूं. '

पुढं होऊन एक हार त्यानं तिच्या हातीं दिला नि दुसरा आपण घेतला व तिच्या गळयांत घातला. तिनंही खालच्या मानेनं, कटाक्ष टाकीत त्याच्या गळयांत घातला.

त्यानं तिला डोळे भरून पाहिलं. तिचं कोरं लुगडं. डोळ्यांतलं काजळ. हळदीच्या आंघोळीनें कातडीवर आलेला तजेला. ती फारच सुरेख दिसत होती. त्यांत गळयांतल्या हारानं आणखी मजा आणली होती. तिचा हात धरून तो म्हणाला,—

' किती सुंदर दिसतेस तूं. '

' तुम्ही सुद्धां फार सुंदर दिसतां. '

' खिडकीशी चल. चांदण्यांत आणखी सुरेख दिसशील. '

तिचा दंड धरून त्यानं तिला खिडकीशीं आणली. हारामधलीं पांढरीं फुलं चांदण्यांत अधिक शोभा देऊं लागलीं. परस्परांचं चांदण्यांतलं तें रूप पाहून दोघं वेडावून गेलीं. त्यानं हळूच हांक मारली,—

' ल ता ! '

' श्या म ! '

इतक्यांत खिडकीखालीं बागेंत कांहीतरी वाजलं. तो म्हणाला,—

' कुणी तरी आहे वाटतं ? '

' इतक्या रात्री ? '

निरखून त्यानं खालीं पाहिलं. अंगणांतला माणूस दिसतांच तिचा दंड धरून त्यानं तिला खिडकीजवळून मागं ओढली. आंतल्या आवाजांत तो म्हणाला,—

' काका आहेत ते ! मागें हो.'

' काका !!'

‘ दोघं जणं दिसताहेत.’

‘ म्हणजे ती दोघं ? ’

‘ होय. ’

इतक्यांत एका झुडपाआडून काकांनीं बरोबर आणलेली बाई धांवत बाहेर आली. तिचा पदर अर्धवट गळला होता नि काका तिच्या माग धांवत होते. कांहीं वेळानं ती दमली नि उभी राहिली तेव्हां काकांनीं तिला उचलून जवळच्या गवताळ जागेंत ठेवली.

वरून तो नि ती पहात होतीं. ती म्हणाली,—

‘ इश्श ! हें काय काकांचं ? ’

‘ थांब.’

काकांनीं त्या बाईचं डोकं मांडीवर घेतलं. बराच वेळ त्यांच्याकडे या दोघांनीं पाहिलं. मग हळूंच ती म्हणाली,—

‘ हें काय–हें भरल्या घरांत.’

‘ मला काकांचं करणं बरोबर वाटतं ! ’

‘ कसं काय ? ’

‘ आनंद कसा लुटावा, हें त्यांच्याजवळून शिकावं.’

‘ कसा हो ? ’

‘ आपल्याच घरांत काय पण कुणाकडेही पहा, नवराबायकोंत असा खेळकर-पणा कधीं दिसतो ? बायको मुलाबाळांत गुंग, नवरा व्यवसायांत दंग. कोण किती वेळां हौसेनं जोड्यानं फिरायला जातात ? शहरांत जाऊं लागले आहेत. पण खेडेगावांत ? संसारांत दोन्ही भोगलं पाहिजे. असला आनंद मिळत असल्यावर कितीही दुःखं भोगतां येतील. काकांचं आयुष्य पहा. त्यांनीं मनसोक्त मजा केली. मनसोक्त कष्टही केले.’

एकदम मधेंच तिनं विचारलं,—

‘ ती विधवा बाई कोण हो ? ’

त्याचा चेहरा जरा उतरला. कारण त्याच बाईशीं साऱ्या लग्नसमारंभांत त्याचे वडील जरा अघळपघळ बोलत होते. उगीचच जरूर नसतांना तिला

नको, हवं नको, तें पहात होते. त्याला वाटलेली शरम तिच्या लक्षांत आली. वरमून ती म्हणाली,—

'त्या तशा ध्यानं मी विचारलं नाही.'

तो म्हणाला,–' बाबा अयोग्यच वागत होते.'

'तुमची आई केव्हां वारली ?'

'दहा वर्षं झाली.'

'तुमच्या वडिलांनी पुन: लग्न केलं ?'

'नाही, एक तर वय जास्त होतं नि सावत्र आई आणून आम्हां मुलांवर जाच.'

ती म्हणाली,–' एकंदर आपल्याकडे सारं विचित्रच झालं आहे.'

'कसं ?'

'चाली–रीति–पद्धति यांचा माणुसकीशीं बेबनाव झाल्यासारखा वाटतो.'

त्यानं विचारलं,–'तुला माझ्या वडिलांचं करणं आवडलं ?'

'आवडलं कसं म्हणूं ? पण आवडलंच. नावडल म्हणण्याचा अधिकार नाहीं आपल्याला. त्या विधवेकडे पहा ! तिनं सुखासाठीं कां धडपडूं नये ? मी तुम्हाला सांगते की–पुष्कळ वेळां माणसाचं असमाधान–दु:ख हीं बोलून नाहींशीं होतात. पारखी झालेली ममता–आपलेपणा–सहवास–प्रेम सारं बोलून मिळतं. तुमच्या वडिलांकडे पहा—'

'त्यांनीं आमच्यासाठीं फार कष्ट घेतले आहेत.'

'झालं तर मग. त्यांना सुख मिळायला नको ?'

'पण कसं मिळायचं हें सुख–समाधान ?'

'खरं आहे ! सुखाचा प्रश्नच आपल्याकडे विचित्र झाला आहे.'

'बरं ! काकांचं धाडसही त्यांच्यांत नाहीं.'

'धाडस असून काय करणार बिचारे ! तुम्ही मुलं होतांना ! तुमच्या बहिणींची लग्नं व्हायचीं असतील.'

'तेंही खरंच.'

सुखदुःखाच्या या प्रश्नानं दोघंही दुःखी झालीं. दोघांची मनं विषण्ण झालीं. हळवीं हृदयं दुखावलीं गेलीं. परस्परांशी न बोलतां खालीं मान घालून दोघं बसून राहिलीं.

चंद्र मावळूं लागला होता. त्याचा फिकट उजेड खोलीच्या भिंतीवर पडला होता. त्या फिकट प्रकाशामुळं वातावरण हळवं नि कुंद झालं होतं. बाहेर दूरवर सारं धूसर दिसत होतं. हवेंत उकाडा भासत होता. इतक्यांत घड्याळांत सहाचे ठोके पडले. दचकून दोघांनीं वर पाहिलं. तो म्हणाला,--

' चल ! झोंपूं या. '

तिचे डोळे जड झाले होते. तिनं गळ्यांतला हार काढला. त्यानंही आपला हार काढून ठेवला. त्यानं आपला सदरा काढून खुंटाळ्यावर टाकला. तिनं हुश्श करीत म्हटलं,--

' उकडतंय् किती बाई ! '

' हो जरा जास्त उकडतंय्. '

त्याच्याकडे पाठ फिरवीत ती म्हणाली,--

' पाहूं नका इकडे. '

' कां ? '

' मी पोलकं काढते आहे. '

त्याच्याकडं पाठ करून तिनं पदर तोंडांत धरून पोलकं काढलं. पोलक्याच्या आंत पांढरी बॉडीस् पाठीला खिळून बसली होती. काढलेलं पोलकं ठेवण्यासाठीं तिनं मान वळवली तेव्हां बॉडीसूखालीं दबून बसलेले स्तन त्याला ओझरते दिसले. त्याची नजर लक्षांत येतांच एक कटाक्ष टाकून तिनं झरकन् पलंगावर अंग टाकून पांघरूण ओढलं. तो पुढें पलंगाकडे जाऊन तिच्या तोंडावर वांकला.

तोंच--बाहेर दाराची कडी वाजली. दचकून् ती बसली नि खालीं ठेवलेलं पोलकं तिनं अंगात घातलं. त्यानं जाऊन दार उघडलं.

दाराबाहेर ठोठावणारा एकजण नव्हता. सारं घर जमा झालं होतं. सर्वांचे पुढारी काका होते. सर्वजण आपल्याकडे पाहून मिष्कीलपणं हंसत असल्याचें त्याला दिसलं.

इतक्यांत काकांनीं पुढं होऊन त्याच्या खांद्यावर थोपटीत त्याला झकास डोळा घातला नि ते म्हणाले,—

' जिंकली पठ्ठ्यानं '

इतक्यांत बायका पोरी पुढं झाल्या. त्यांनीं लतेला बाहेर ओढली. तेवढ्यांत एक वयस्क बाई तिच्या कानांत म्हणाली,—

' काय ग ! मी सांगितलं तसं—'

थट्टा करीत साऱ्या जणी तिला ओढून नेत असतां तिची व त्याची नजरभेट झाली. दोघंही परस्परांकडे पाहून हंसलीं. त्या हंसण्यांतून त्यांनीं एकमेकांना सांगितलं कीं आपण या सर्वांहून वेगळे आहोंत. लोक समजतात तसं आपलं मीलन झालं नसलं, तरी त्याहून अगदीं वेगळं असं मनांचं मीलन झालं आहे. हे सगळे लोक मात्र रानटी आहेत.



## रात्र संपली दिवस उजाडला !

खळ्यांखळ्यांतून शेतकरी भातं झोडीत होते.— " ये देवा भात " च्या ललकाऱ्या चहूकडून उठत होत्या. एकाद्या दमदर शेतकऱ्यानं चवड्यावर शरीर तोलून शिवाळ्यावर धपकन् भारा आपटला कीं छातींत कसं धस्स होत होत.

सराईचेच दिवस होते ते. खळ्यांत भाताच्या राशी लागत होत्या. त्याबरोबरच सावकारांची वसुलीही जोरांत चालू होती. रोज त्यांच्या गाड्या खळ्यावर जात येत होत्या. मुढामुढा भाताची ओझीं वाहतांना त्यांच्या बैलाला उसंत नव्हती. त्यांच्या घरांतील प्रत्येक माणूस कामाखालीं दबलं होतं. चोवीस तास चुलीवर चहाचं पाणी उकळत होतं नि भाताचं भांडं खदखदत होतं.

गणू सावकारांनीं एक दिवस आपल्या बायकोच्या भाच्याला एका नाठाळ शेतकऱ्याकडे भाताचा मक्ता वसूल करण्यास पाठवलं. भऱ्या पहांटे, पोतीं, फरी नि गाडी घेऊन भाचा त्या शेतकऱ्याकडे गेला.

दुपारचे बारा वाजेपर्यंत गणू सावकार कामांत होते. नतर ते आंघोळीला गेले. तेव्हां पत्नीनं भाचा आला नसल्याचं त्यांच्या कानावर घातलं. भाच्याच्या नालायकपणाचा उद्धार करून गणू सावकारांनीं आंघोळ नि देवपूजा आटोपलीं. जेवण केलं. दोन वाजले, तरी भाचा आला नाहीं. तेव्हां एका गड्याला त्यांनीं त्या खेड्याकडे पिटाळलं.

थोड्याच वेळांत त्या गाडींत बसूनच तो गडी परत आला. गाडी रिकामी परत आली होती. खडखडतच ती आवारांत शिरली. गाडी रिकामी पाहतांच गणू सावकार संतापानं ताडकन् उठले !

‘ काय रे ! काय झालं ?

भाचा हळूंच म्हणाला,—‘भात घालीत नाहीं तो. ’

वेडावत ते म्हणाले,—

‘ भ्यात घ्यालीत न्याहीं—मग तुम्ही कशाला गेलां होतां ? तुम्ही जाऊन केलं काय ? तुमच्या मनगटांत जोर नव्हता ? घराबाहेर खेंचलं नाहीं त्याला ? घरांतलं भात उकरून काढलं नाहीं त्याच्या ? .काय रे शिवा ! तूं होतास ना बरोबर ? ’

‘ मी म्हनत होतों—पन साहेब म्हनाले—जाऊं दे. ’

‘ ज्याऊं दे ! ज्याउंदे काय ? काय उपकाराचं धान्य घालीत होता ? कीं तुम्ही भीक मागायला गेलां होता ? गेल्या वर्षीचा सारा मक्ता, यंदाचा मक्ता—नि तुम्ही एक दाणा आणला नाहीं ? ’

मग गणू सावकार तणतणत आंत गेले नि बायकोजवळ जाऊन गर्जले—

‘ पहा ! हा तुझा दिवटा भाचा पाहा ! याला दत्तक घ्या म्हणतेस ! चांगलं कुळ उजळील आपलं ! बाहेर शब्द बोलतां येत नाहीं साधा ! घर दार विकील ! लोक डोळ्यांदेखत दिवसाउजेडीं लुबाडतील. नाटकांत जाऊं दे. तीच लायकी दिसते. ’

अर्धा तास गणू सावकार येरझारा घालीत होते. मुठी आंवळीत होते—ओंठ चावीत होते. सारं घरदार चुप् झालं होत. अर्ध्या तासानंतर एकदम ओरडून ते म्हणाले,—

‘ गाडी जुपा रे ! कोण आहे तिकडे ? मक्ता घालीत नाहीं म्हणजे काय ? संध्याकाळच्या आंत मक्ता घेऊन येतों. दीड मुडा भात आहे. आम्हाला उपाशीं मरायचं नाहीं. अरे हशा ! कुठं गेला हा ? हशा ! गोठ्यांतली नवी जोडी काढ नि गाडी जूप. फरी पोतीं. सगळं व्यवस्थित आहे कीं नाहीं पाहा—धांव. ’

जिकडेतिकडे धांवाधांव सुरू झाली. हशा बैल आणायला बेड्यांत गेला. एका गड्यानं गाडीचं तोंड वळवलं. दुसरा गाडींत पेंढा टाकूं लागला. हशाची बायको तिथंच उभी होती. नवरा बेड्यांत जातांच त्याच कुडतं द्यायला ती पण तिकडे धांवली.

हशानं आपल्या बायको–पोरांसह बेड्यांतच बिऱ्हाड केलं होतं. दोन मुलं होतीं त्याला. हशाची बायको जेव्हां बेड्यांत जाऊं लागली, तेव्हां मुलं बाहेरच धुळींत खेळत होतीं. खेळतां खेळतां एक पोरगा तिच्या पायांत येऊन अडकला. त्याच्या पाठीवर एक जोरदार रपाटा देऊन स्वतःचा तोल सांवरीत ती बेड्यांत चढली. मुलानं थोडंसं रडवं तोंड केलं नि तो धुळीमध्यें पुन्हा पायानं रेघोट्या ओढूं लागला.

बेड्यांत हशा बैलांचीं दावी सोडीत होता. आंत शिरतांना तिनं त्याला म्हटलं,—

‘ सावकाराला पैशाचं इचारायला इसरूं नका.’

‘ नाय्. ’

‘ म्हंगा–सत्नारायन हाय. धा रुपये द्या.’

‘ व्हय्. ’

‘ तो नाय म्हंगेल. पन सोरू नका. पाया परा.’

‘ व्हय्.’

‘ ये कुरतं घ्या तुमचं.’

हशानं कुडतं अंगांत घातलं. मग बैलांना कासरे जोडून तो बाहेर घेऊन आला.

इकडे घरामध्यें गणू सावकार येरझारा घालीतच होते. इतक्यांत त्यांची पत्नी दरवाजांत आली नि तिनं हळूंच विचारलं,—

‘ खरंच कां जाणं होणारय ? ’

‘ खरंच म्हणजे ! माझा बाप का करील वसुली ? ’

आपल्या नवऱ्याच्या आवाजापुढं तिचा आवाज अधिकच नम्र झाला. तिनं म्हटलं,—

‘ मी म्हणते आपण उद्यां जावं. हवा वाईट पडली आहे. हशाची बायको म्हणत होती, ढग आले आहेत. वादळसुद्धां होईल.’

‘ आकाश कोसळलं, तरी चालेल.’

‘ आपल्याला खायला काय करूं ? ’—

‘ खायला ? वसुली झाल्याशिवाय एक घांस तोंडांत टाकणार नाहीं ! ’

‘ लांब जायचंय, परतायला रात्र होईल. लाडू देतें. ’

‘ नको म्हणून सांगितलं ना. ’

‘ चहा ठेऊं ? ’

‘ चुलीत घाल चहा. हशा ! ए हशा गाडी झाली कां तयार ? ’

गाडी जोडून बैलांच्या तोंडासमोर कासरे धरून हशा उभा होता. गणू सावकार बाहेर येऊन गाडींत बसले. हशा गाडीवर चढला.

तोंच हशाची बायको गडबडीनं अंगणांत आली. तिनं हातावर एक घोंगडी आणली होती. आपल्या घरधन्याला ती म्हणाली,—

‘ पानी परेल—घोंगरी घेऊन जा. ’

तिला पाहतांच गणू सावकार कडाडले,—

‘ अग, जा ग पानीवाली. होतेस कीं नाहीं आंत ? निघायच्या वेळीं शकून करायला आली. ’

हशाच्या बायकोनं हातांतली घोंगडी कशी तरी नवऱ्याच्या अंगावर टाकली नि ती आंत पळाली.

गाडी गांवाबाहेर आली. संध्याकाळचा मोकळा वारा सुरू झाला होता. घुश्शांत इतका वेळ ताठरपणं बसलेले गणू सावकार आतां जरा मोकळे बसले. इतका वेळ वाटेंत भेटलेल्या कुळांचे रामराम किंचित् मान हलवून त्यांनीं स्वीकारलें. आतां कुळांनं रामराम म्हणतांच तें पण उलट रामराम म्हणून त्यांची विचारपूस करूं लागले.

थोडा वेळ गेला समोरून डोक्याला कोरा तांबड्या काठाचा रुमाल बांधून एक शेतकरी आला. सावकारांना पहातांच त्यानं रामराम केला. सावकारांनीं विचारलं,—

‘ राघो ! कुठं निघालास ? ’

‘ शहरांत जातोंय्, काका. ’

‘ काय रे ! त्या दिवशीं बोलावलं, पण फिरकला नाहींस. कसली मस्ती आली रे तुम्हाला ? ’

‘ माझ्या पाठीं काम होतं, काका. ’

‘ कसलं काम. ’

‘ पोराचं लगीन काढलंय्. ’

‘ बऱ्या सबबी सुचतात तुम्हाला वेळेवर; हाकल रे गाडी. ’

गाडी चालू झाल्यावर गणू सावकार स्वत:शींच हंसले. ते हशाला म्हणाले,—

‘ पाहिलंस हशा ! या राघोनं लग्नासाठीं भरभक्कम मणीभार्ती पैसे काढले असतील. जमीन झोपडंही लिहून दिलं असेल.—जमीन झोपडं हा घालवून बसणारच आणि त्या पोरीचं जन्माचं नुकसान करणार. तूं पण तसचं केलंस. तुझ्या बापानं सारं कांहीं घालवलं. त्यानंतर तूं व्यवस्थित राहतास, तरी ठीक होतं. पण लग्नाचं वेड डोक्यांत शिरलं तुझ्या नि त्यासाठीं पैसे घेतलेस ते अजून फेडतो आहेस. काय रे ! त्यापेक्षां लग्नं केलीं नाहींत, तर काय बिघडेल ? ’

हशानं कांहीं उत्तर केलं नाहीं, तेव्हां गणू सावकारांना अधिकच जोर आला. ते म्हणाले,—

‘ तुम्हीं कुणबी सगळेच वेडे. दारू प्यायला लागतां. मग घरदार, बायको कांहीं पहात नाहीं. लग्न म्हटलं कीं पुढचा मागचा विचार करीत नाहीं. जें असेल नसेल, तें देऊन पोरगी घरांत आणतां. भांडणं करूं लागलांत कीं तडजोड वगैरे तुम्हांला ठाऊकच नसते. खून करून मोकळे होतां. अशानंच ही स्थिति आलीय तुमची.’

इतक्यांत एक म्हातारा कुणबा समारून आला.

‘ रामराम सावकार ! ’

‘ रामराम. काय रे गोंद्या ! आतांच तुझा पोरगा गेला नि तूं मागोमाग ? ’

‘ लगीन काढलाय पोराचं. कापडचोपड आनायला शहरांत चाललोय. म्हंगलं, राघो इसरेल.’

‘ पैसे कुणाचे काढले रे ? ’

‘ इच्यारूं नकोस काका ! जमीन लिवून दिली. ’

‘ जमीन लिहून दिलीस ? छान ! मग तूं काय खाणार ? त्या पोरीला काय घालणार ? त्यापेक्षां लग्नं नाहीं केलीं तर ? ’

‘ ह्ये पाहा काका ! जमीन आज ना उद्यां तुम्ही सावकार घशामंधी लोटणार. मंग लगीन करून संसार होऊं द्या. जमीन जानार, मग संसारभोग भोगून जाऊं द्या. ’

‘ काय रे ! सावकार तुमच्या जमिनी तुमच्याकडं मागायला येतो वाटतं ? ’

‘ रागावूं नका काका–आमची कुणब्याची जात मूर्खाची आहे. ’

गणू सावकार घुश्शांतच म्हणाले,—

‘ हाकल रे गाडी ! ’

गाडी चालूं लागली, तरी गणू सावकार बोलतच होते.—

‘ चोर साले ! सावकाराला शिव्या द्यायला बरं. काय रे हशा ! मीं तुझं काय वाईट केलं ? तुझ्या बापानं माझं किती तरी देणं बुडवलं. मीं तुला कांहीं म्हटलं ? तूं माझ्याकडं आलास. म्हटलं ये ! कांहीं झालं तरी तूं आमचं पिढीजाद कूळ आहेस. तुझा बाप कसाही वागला असला, तरी त्याची शिक्षा तुला काय म्हणून ? ’

‘ तुम्ही मायबाप आहांत माझे, काका ! ’

‘ तूं मला असं काय दिलंस ? तुझी चंद्रमौळी झोपडी. त्याची किंमत ती काय ? पण आज दोन वर्षं तुझं कुटुंब पोसतोंय मी. ’

‘ तुमचीच कुरपा आहे काका. ’

‘ मग हे हलकट कुणबी असं कां बोलतात ? ’

‘ आमची जातच खराब. खाल्लेलं खाल्लं म्हणायची नाहीं नि वर थुंकल बी. ’

‘ कसं बरोबर बोललास ! ’

गाडी खडखडत चाकोरींतून ठेंचाळत होती. सूर्य डोंगराच्या माथ्याकडे कलला होता. माळरानावरचं गवत सोन्यासारखं चकाकत होतं. वारा मोकळा

वहात होता नि गवतावर एकामागून एक मोड लाटा उमटत होत्या. गणू सावकारांनीं विचारलं,——

‘ काय रे! किती वेळ लागेल पोहोंचायला ? ’

‘ सांज होईल, काका. ’

‘ जरा लौकर हाकल मग. ’

गळ्यांतले घुंगूर वाजवीत खालीं माना घालून बैल आवेशानं धांवूं लागले. तक्क्याला ऐसपैस रेलत गणू सावकारांनीं चंची बाहेर काढली आणि ते विडी वळूं लागले.

बैलांचा धांवण्याचा दम संपला. त्यांनीं पुन्हा संथ चाल सुरू केली. हशानं कासरा जोकडावर टाकला आणि मान न वळवतांच तो म्हणाला,——

‘ काका ! ’

‘ काय रे ? ’

‘ कांहीं नाहीं. ’

‘ अरे, बोलना. ’

‘ थोरे पैसे हवेत. ’

‘ पैसे ! कशाला रे ? ’

‘ घरधनीण सतनारायण बोलली हाय ! ’

‘ सत्यनारायण ? ’

‘ धाकलं पोरगं सीक होतं तवा. ’

‘ ठीक ! पण मागच्या पैशाचं तूं काय करणार ? ’

‘ ते बी दीन् नि ह्ये बी. ’

‘ पण देणार कसे ! ‘

‘ दरोबस्त काम करीन. ’

‘ दरोबस्त कामानं काय होणार ? ’

‘ माझी बाय पण खपेल. ’

‘ अरे ! दोघांनीं दोन जन्म घेतले, तरी पैसे फिटणार नाहींत. पांचशें रुपये झाले आहेत. शिवाय या महिन्याचं व्याज. ’

दोनशेंचे पांचशें कसे झाले हा हिशेब हशाला कळला नाहीं; तसा थोडासा सुद्धां संशय त्यानं तोंडावर दाखवला नाही. त्याला आज आणखी पैसे हवे होते ना ! तेव्हां अशा गोष्टी काढायची ही वेळ नव्हती. तो म्हणाला,—

' जें हिशेबानं निघेल ते. तुमी काय जादा घेणार हात् ? '

' हिशेबानंच सांगतोय मी—दमडी जास्त नको तुझी. पण जें घेतलं तें घेतलं म्हणाल कीं नाहीं ? '

' काका ! धा रुपये द्या. '

' दहा आणखी एक वर्ष वाढलं. '

' चालेल. '

' पण तुला इतकीं वर्षं आहेत कुठं ? मेल्यावर कां काम करणार आहेस ? आतां तूं जगणार किती ? हें शरीर पाहा. दारू पितोस कीं नाहीं हल्लीं ? '

' सोरली—काका. '

' अरे ! मासा पाणी सोडील, पण तुम्हीं कुणबी दारू सोडणार नाहीं. '

' तुमची शपथ काका—पार सोरली. '

' परवां तुझी बायको म्हणत होती कीं—— '

' तशी सणासुदी घेतों. पण तशी नाहीं. '

हशानं कासरा हातीं घेतला, त्याबरोबर बैलांनीं दौडण्यास सुरवात केली. वारा जोराचा सुटला होता. आकाशांत काळे ढग वेगानं धांवत होते. गणू सावकारांनीं विचारलं,—

' काय रे ! भिलवडी आली वाटतं ? '

' होय. '

' गांवांतनंच गाडी घे. जरा बैलांना विसांवा दे. पाटलाला भेटायचं आहे. त्या नथ्यानं पेंढा घातला का रे ? '

' नाय. '

' मग पाटलाच्या दारांत गाडी सोडल्यावर त्याला बोलावून आण. '

भिलवडींत गाडी शिरली नि पाटलाच्या दारापुढं उभी राहिली. पाटील घरांत होता. पाटलाच्या मुलाला हांक मारून गणू सावकारांनीं त्याला बैलापुढं पेंढा टाकण्यास सांगितला. मग पाटलाला हांका मारीत ते ओटीवर चढले,—

‘ ए शित्या पाटील— ’

‘ कोन ? सावकार ! कुणीकडं ? ’

‘ अरे, वानवडीला जातोय. ’

‘ इतक्या सांजचं ! ’

‘ पायाखालचा रस्ता आहे. ’

‘ पन परतायला अंधेर होईल. नका जाऊ तुमी. ’

‘ गेलंच पाहिजे. तो विठ्या आहे ना चोर साला. आतां गेलों नाहीं तर भात हातोहात जाईल. पत्ता लागायचा नाहीं. ’

‘ तें ठीक; पण लई आभाल आलंय. इज पन कडाडते नि म्होर सारं जंगल हाय. ’

‘ असूं दे. ’

‘ चहा करून घ्येता का इवला ? चा साखऱ्या कान्हून देतों. पोराला चूल पेटवायला सांगतों.’

‘ चहा नको. उशीर होईल.’

बैलांना पेंढा घालून पाटलाचा मुलगा आंत आला. त्यानं विचारलं,—

‘ काका पुरं कऽऽ जाता ?

‘ सावकारांना सांगतोय् पुरं जाऊं नका म्हंगून.—रात हाय नि वादलबी.’

‘ होय काका ! जंगलांत वाघरू पन सुटलाय्.’

गणू सावकार मनांत विचार करूं लागले कीं शेतकरी शेतकऱ्याला मिळणारच. हा पण त्याच्याचसारखा चोर. हा त्याला सामील नसेल कशावरून ? भात पळविण्यासाठीं हा मला थांबवीत असेल. पण म्हणावं, मी बाप लागलोंय् तुमचा.

‘ हशा ! ’

हशा हीं बोलणीं ऐकत बाहेरच उभा होता. हाक ऐकून तो पुढें आला. वाघरू सुटल्याचं ऐकून त्याला कांपरंच भरलं होतं. आंत येऊन तो म्हणाला,—

‘ काका ! पावसाचा शिरकाव होतोय. आपुन परतूं या.’

‘ काय रे ! धनी तूं कीं मी ? ’

‘ तुम्ही. ’

‘ मग गाडी जूप. पावसाचं पाहतो मी. बराय् पाटील, बसा ! ’

सावकार खालीं उतरले. त्यांच्या पाठीकडे पहात मान हलवीत पाटील पुटपुटला,—

‘ बामन पैशाच्या मागं लागलाय्. ’

आतां अंधार पडूं लागला होता. दूर डोंगरांच्या माथ्यावर चमकणारं सोनेरी गवत आतां काळं पडूं लागलं होतं. पिवळा हिरवा दिसणारा डोंगर काळी कभिन्न भिंत होऊन समोर उभा ठाकला होता.

गणू सावकारांची गाडी कुळाच्या गांवीं पोहोंचली नि त्याच्या दारासमोर उभी राहिली. गाडी उभी राहतांच खालीं उतरत गणू सावकार गरजले,—

‘ कुठं आहे तो हरामखोर ? हशा ! उभा काय राहिलास ? फरीं नि पोती बाहेर काढ ! ’

ती ओळखीची गर्जना ऐकून त्या कुळाचे शेजारी आपापल्या झोंपड्यांतून बाहेर येऊन त्याच्या दाराशीं आले. त्यांना पाहातांच सावकार ओरडले,—

‘ काय रे ! तुम्ही उभे कां ? चला सारे आंत जा नि कणगा उपसायला लागा त्याचा. गेल्या वर्षींची बाकी–यंदाचा मक्ता–घेतलेलं मणी भात सारं पुरे केल्याशिवाय माप थांबवूं नका. ’

इतक्यांत कुळाची आई रडत बाहेर आली,—

‘ मायबाप ! पाठीवर मारा, पण पोटावर नका मारूं. ’

‘ थांब ! पाठीवर पण मारतों नि पोटावर पण. मस्तवाल झालांत काय रे ? कुळला माज आलाय् ? वहाण पायाशींच हवी. एक दाणा न देतां पोराला घालवलास ? तुझ्याजवळ भात आहे कीं नाहीं तें समजेल आतां. पाहतां काय ! चला, व्हा आंत. कणगा फोडा. माळ्यावर चढा. जमीन खणा–टोपल्या, हारे, पोतीं जिथं जिथं भात दिसेल, तिथून बाहेर काढा. ’

म्हणतां म्हणतां आंतून भात बाहेर येऊं लागलं नि बाहेर अंगणांत रास वाढूं लागली. हशा फरी घेऊन पुढं झाला नि त्यानं मापाला सुरुवात केली. विठ्या नि त्याच्या घरांतली माणसं नि:शक्त होऊन बाजूला उभीं होतीं. पुरं मुठाभर भात मोजून पोतीं भरलीं. त्या पोत्यांकडं पहात गणू सावकार हंसत म्हणाले,—

' पहा पहा ! हिच्याजवळ खायला दाणा नव्हता. '

कुळाच्या आईनं एकदम् ऊर बडवायला सुरुवात केली. रडत ओरडत ती म्हाणाली,—

' दादा ! साफ बुडालों अमी. बिज्या सावकाराला काय देऊं ? '

' दुसऱ्या सावकाराचं मला काय विचारतेस ? माझं पुरं केलंस ना ? बस्. मात्र पुन्हां पुढच्या वेळेस लक्षांत ठेव. पाळण्यांतलं मुल आलं, तरी मक्त्याचा दाणा न् दाणा दिला पाहिजे. '

भरलेलीं पोतीं गाडींत चढवण्याचं काम सुरू झालं. गणू सावकार आपल्या कुळाच्या झोंपडीच्या आसपास हिंडू लागले. इतक्यांत त्यांचं लक्ष पोपयीच्या झाडाकडं गेलं. वर टोंकाला एक पिवळसर फळ दिसत होतं. सावकारांनीं कुळाला बोलावलं.

' विठ्या ! ही आपलीच ना पोपई ? काढ पाहूं दोन. '

' अजून कच्चीं आहेत, काका. '

' कच्ची तर कच्ची. भाजी होईल. बरेच दिवसांत हिरवी भाजी खाल्ली नाहीं. काय रे ! पापये-वाल-शेंगा इतक्या होतात, पण कधीं सावकाराला आणून द्यायची बुद्धि होत नाहीं ना ? बरोबर आहे. शहरांत नेत असाल. पैसे येतात ना ! '

' इतकं कुठं पिकतंय, काका. आम्हींच भाताबरोबर खातों. '

' बरं ! शिवा काठी घेऊन पाड पाहूं दोनचार. '

पोपये पाडून गाडींत टाकले. पोतीं गाडींत चढलींच होतीं. गणू सावकार गाडीवर चढले. जातांना कुळाला म्हणाले,—

' तुला भातबीत लागलं, तर ये हं. व्यवहाराला चोख असावं. पुढच्या वर्षी नीट वाग. बरं, बस आतां.'

गाडी चालूं लागली. तोंच गांवचा पाटील आला.

'काय पाटील ! कसं काय ?'

'ठीक हऽ ! पन काका, अंधकारांत कुठं निघालां ?'

'मग काय इथंच राहूं ?'

'तसं नवं. तुमी जा—पण गाडी इथं राहूं द्या. पाऊस नि वादळ बी सुरू व्हायचा रंग दिसतोय. भरली गाडी कुटं न्याल. पार भिंगेल.'

'पाऊस कसला येतोय—अरे विठ्या ! चार पेंढे आण या पोत्यांवर टाकायला.'

पेंढे गाडीवर पसरले नि गाडी चालू झाली.

गाडी गांवाबाहेर पडली. तेव्हां चांगलाच काळोख पडला होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना करवंदीच्या दाट जाळ्या पसरल्या होत्या. चाकोरी दिसत होती-नव्हती.

गणू सावकार पोत्यांवर रेलून बसले होते. एक काम पुरं केल्याचं समाधान त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होतं. त्याच वेळेला त्यांच्या मनांत भाच्यासंबंधीं विचार येत होते. ज्याला ही वसुली करतां आली नाहीं, त्याला सावकारी नाहीं झेपणार ? छे ! त्याला दत्तक घेऊन उपयोग नाहीं.

कांहीं वेळ गेला. बैल ओझं ओढीत संथपणं चालले होते. इतक्यांत एक वाऱ्याची झुळूक आली नि तिच्याबरोबर ओल्या मातीचा खमंग वास नाकांत शिरला.

'हशा ! पाऊस पडलाय कुठं तरी.'

'मी काय म्हंगालो. मांगं वलायचं ?'

'चल, हाकल पुढं ! बडबड करूं नकोस.'

हशा नाखुषीनं गाडी हाकूं लागला. बैलांचीं अंगं बाजूच्या झाडांना नि करवंदीना घांसून जात होतीं नि त्यांचा खस्‌खस् आवाज होत होता. हशाच्या पोटांत धस् होऊं लागलं. वाघरू जंगलांत सुटलं आहे, हें तो विसरला नव्हता. वाघरू तर नसेल ना हें ?

इतका वेळ विजांचा लखलखाट फक्त क्षितिजावर दिसत होता. आतां त्या अगदीं डोक्यावर चमकूं नि कडाडूं लागल्या. मग एक वाऱ्याचा झोत आला

नि त्याबरोबर भले मोठे थेंब अंगावर येऊन आपटूं लागले. वाऱ्याचा जोर वाढला नि फांद्या लवूं लागल्या. त्याबरोबरच झाडांमधून वेडेवांकडे आवाज येऊं लागले.

गणू सावकारांनीं आपली टोपी काढून कोटाच्या आंतल्या खिशांत टाकली. हशाला ते म्हणाले,—

' खरंच पाऊस आला. गाडी उभी कर. '

हशानं झाडाखालीं गाडी उभी केली. झाडं अजून पुरतीं भिजलीं नव्हतीं, त्यामुळं गाडी कांहीं वेळ सुरक्षित राहिली. पण थोड्याच वेळांत झाड पानापाना-मधून गळूं लागलं. गाडीवरचा पेंढा भिजला. गणू सावकाराचे कपडे ओले झाले. इतक्यांत त्यांना हशाच्या घोंगडीची आठवण झाली.

' घोंगडी आणली आहेस ना ? आण इकडे ती. '

घोंगडी घेऊन त्यांनीं पोत्यांवर अंथरली. तेवढंच पोत्यांत पाणी कमी शिरेल. भाताचा नाश कमी होईल. भात कांहीं तरी नीट राहील, या कल्पनेनं त्यांना बरं वाटलं. ते म्हणाले,—

' चल, गाडी हाकल. भिजलोच आहों, तर पुरते भिजूं ! '

पण हशाच्या मनांत वेगळंच होतं. तो म्हणाला,—

' काका ! मांगं जाऊं या. मोर वाट कलत नाय्. '

' पुढं चल सांगितलं ना ? तुम्ही कुणबी म्हणजे मुलखाचे भित्रे. '

गाडी चालूं लागली. तोंडावर येणारा पाऊस टाळण्यासाठीं बैलांनीं खालीं माना घातल्या आणि पाठीवर पडणारं पाणी दूर करण्यासाठीं ते शेपट्या हलवूं लागले. मधूनच मोठी वीज चमकतांच पाण्यानं झाडं चकाकत आणि पावसाचे जाड थेंब कोसळतांना दिसत. बैल अगदींच संथ चाललेले पाहून हशानं पराणी काढली नि एकेकाला एकेक गोदा दिला. त्यासरशी उसळी घेऊन बैलांनीं चाल वाढविली.

अर्धा तास गाडी चालत होती. पण गांवाचं चिन्ह दिसेना. आतांपर्यंत वानवडी टाकून गाडी पुढं जायला हवी होती. पण जंगल आणखी दाट होऊं लागलेलं दिसत होतं. वाऱ्यानं पाडलेल्या वाळलेल्या फांद्या रस्त्यावर येऊन

पडल्या होत्या. बैलांच्या पायांत अडकत होत्या किंवा चाकाखालीं कडाकड मोडत होत्या. त्यावर आकाश धुंद झालं होतं. त्यांत दाट झाडीचा काळोख. वीज चमकून गेली कीं अजगरासारखा अंधेर साऱ्या पृथ्वीभोंवतीं लपेटून जाई. त्यांत झाड दिसत नव्हतं कीं, दोन हातांवरचा गाडीवान दिसत नव्हता.

गणू सावकारानं विचारलं,—

' अजून वानवडी आली नाहीं ? '

' आपुन वाट चुकलों. '

' गद्ध्या ! तूं काय करीत होतास ? '

' बैलं वळलीं. मागं जंगलाकडे वाट फुटते तिकरं आपण आलों. '

' आपण जंगलांत आलों तर ! '

' व्हय. '

' चल, मागं फीर. आधीं मागं फीर. सोडलेला रस्ता मिळेल. '

तेवढ्यांत एक मोठी वीज चमकली. त्या प्रकाशांत मागचा पुढचा जो रस्ता दिसला, त्यावरून तिथं गाडी वळवतां येणं शक्य नाहीं, हें लक्षांत आलं. रस्त्याच्या दोन्ही अंगाला गळयाइतकी उंच दरड होती. गणू सावकार म्हणाले,—

' खालीं उतरून पाहा. कुठं गाडी वळवायला जागा मिळेल. '

हशा खालीं उतरला. बराच वेळ वीज चमकली नाहीं. हशाही बराच वेळ परतला नाहीं. पावसाचा आवाज मात्र वाढता होता. गणू सावकारांना क्षणभर वाटलं, कीं पावसाचं चिन्हं असतांना निघालों, हें कांहीं बरं केलं नाहीं. पण पुन्हां विचार आला, छे ! छे ! थोडं भिजावं लागेल, इतकंच; बाकी कांहीं बिघडलं नाहीं.

हशा अजून परत आला नव्हता. गणू सावकारांनीं हाक मारला,—

' हशा ! '

पण ती हांक पावसाच्या आवाजांत विरून गेली. घसा साफ करून गणूकाकांनीं आणखी मोठ्यानं हांक मारली. पण त्याच वेळेला एक मोठी वीज कडाडत खालीं कोसळली. गणू सावकार अगदीं शहारून गेले.

पाणी अंगावरून धबधब्यासारखं कोसळत होतं आणि थंडी वाजूं लागली होती. गणू सावकारांच्या मनांत आतां हशाविषयीं संशय येऊं लागला. हा आपल्याला एकट्याला टाकून तर गेला नसेल? मी इथंच कुडकुडून मरावं, असं त्याच्या मनांत असेल. खून न करतांच काम होईल. त्याला पंचवीस रुपये हवे होते. त्यांनीं फिरून हशाला हाक मारण्यास आरंभ केला.

'हशा ! हशा ! '

पण त्या हाका जंगलांत कांहीं फुटापर्यंतसुद्धां उमटल्या नाहींत. गणू सावकारांनीं एकदां आजूबाजूला पाहिलं. मग तोंडावर निथळणारं पावसाचं पाणी हातानं पुसून खालीं तोंड करून ते बसून राहिले. कांहीं वेळानं गाडीजवळ पावलं वाजलीं. मग हशाची हांक आली.

'काका ! '

'हशा ! '

'कुटं पन सपाट जागा नाय्. '

'ये तूं गाडीवर बैस—कुठं जाऊं नकोस. तशीच गाडी वळव. '

हशा गाडीवर चढला. उजव्या बैलाचा कासरा ओढून त्यानं डाव्याला पराणी लावली. हळुहळूं बैल वळूं लागले. त्याबरोबर गाडी पण वळूं लागली. बैल वळत वळत दरडीवर चढले, तसतशी गाडी उलट होऊं लागली. दरडीच्या उंच भागाशीं येऊन बैल थांबले. जूं त्यांच्या वशिंडांशीं आलं होतं नि जुपण्या फांसाच्या दोराप्रमाणं मानेवर आंवळल्या होत्या. गाडीची साठी उलाल होऊन जमिनीला टेकणार, असं वाटत होतं. हशानं पुन्हा पराणी काढली आणि डाव्या बैलाच्या कुशीवर ठोसा दिला. त्याबरोबर सारा जोर करून बैल एकदम् वळले. पण त्या हिसक्यासरशीं गाडीचं एक चाक वर उचललं गेलं आणि धाडकन् एका बाजूला सारी गाडी उपडी झाली. वर बसलेले गणू सावकार लांब फेकले गेले.

गणू सावकार स्वत:ला सांवरून उठले. त्यांनीं हशाला आईमाईवरून शिव्या देण्यास सुरुवात केली. हशा पण फेंकला गेला होता. करवंदीचे कांटे त्याच्या हातापायांत घुसले होते. ते बाहेर काढण्यांत तो गुंतला होता. सावकारांच्या शिव्या ऐकून तो उसळून उभा राहिला. पलीकडे तुटलेलं जोकड खांद्यावर घेऊन बैल

संथपणें रवंथ करीत उभे होते. त्यांचा तो संथपणा पाहून हशा अधिकच खवळला. त्यानं जवळच पडलेला चाबूक उचलला नि बैलांना फोडून काढण्यास सुरुवात केली. दहा पंधरा रट्टे बसतांच दोनही बैलांनीं दोन दिशांना पळण्याचा यत्न केला. त्याबरोबर जोकड मध्येंच तुटलं. एक बैल दरडीपलीकडे गेला नि दुसरा अंधारांत दिसेनासा झाला.

बैल पळून जातांच गणू सावकार भयंकर खवळले हशावर. ते कडाडले—

' जा ! बैल शोधून आण. बैलांची किंमत तुझ्यावर लावीन. तूं काय समजलास ? जा, जा आधीं. '

हशा अंधारांत दिसेनासा झाला. पाऊस जोरांत होता. आतां जिकडे तिकडे पाणी वाहूं लागलं होतं. ज्या रस्त्यावर गाडी पडली होती, तो पावसाळ्यांतील एक ओहोळच असावा. कारण वरून एकसारखं पाणी येत होतं आणि रस्ता लहानसा ओढाच दिसूं लागला होता.

तोंडावर ओघळणारं पाणी धोतराच्या पिळलेल्या सोग्यानं पुशीत गणू सावकार एका दगडावर बसले. इतक्यांत दचकून त्यांनीं आजूबाजूला काळोखांत डोकावून पाहिलं. कसला तरी विचित्र आवाज त्यांच्या कनावर आला. तेव्हांच त्यांना आठवलं. कुणी तरी सांगत होते, जंगलांत वाघरू सुटलं आहे.

आतां मात्र डुरकावणी स्पष्ट आली. पावसाच्या आवाजांतसुद्धां ती वाघाची डुरकावणी स्पष्ट घुमली. गणू सावकारांनीं डोळे ताणून पाहिलं. वाघाचे डोळे कुठं जवळपास दिसत नाहींत ना ? ते ताडकन् उभे राहिले नि झरकन् धांवत जाऊन गाडीच्या साठीखालीं लपले.

मिनिट तासासारखं जाऊं लागलं. चाकांच्या आऱ्यांमधून गणू सावकार कानोसा घेऊं लागले.

हशाचीं पावलं वाजत नव्हतीं कीं त्याचा कसला आवाज येत नव्हता. गणू सावकारांना आतां संशय येऊं लागला. तो बैल घेऊन तसाच गेला कीं त्याला रस्ता सांपडला आणि आपल्याला सोडून तो घराकडे चालता झाला ? किती तरी आधीं आपण घरीं पोहोंचायला हवं होतं. घरीं बायको आपली वाट पहात असेल खरंच ! वादळ होणार, असं तिनं सांगितलं तरी आपण ऐकलं नाहीं. तिनं

खायला घ्यावं म्हणून प्रेमानं विचारलं, आपण तिला झिडकारलं. इतर कामावरचा राग आपण नेहमींच तिच्यावर काढीत आलों आहोंत. रात्रंदिवस ती घरांत खपत असते. कितीएक वर्षांत ती गांवाबाहेर कुठं गेली नाहीं. मूल नसल्यामुळं तिच्या मनासारखे कधीं सणसमारंभ घडले नाहींत. तिनं हौसेनं भाच्याला आणला नि आपण तिरसटपणानं तिच्याविरुद्ध गेलों. आपल्याला तिच्यापेक्षां संपत्तीचीच जास्त काळजी वाटली.

वाघाची पुन्हा एक आरोळी आली. ती अगदीं जवळ आली. आरोळी येतांच गणू सावकारांचं अवसान पार गळालं. घशांतल्या घशांत त्यांनीं हांक मारली,—

' हशा ! '

पण हशाची हांक आली नाहीं कीं तो आला नाहीं. गणू सावकारांना डोकं वर काढण्याची हिंमत होईना; पाय अंगाशीं घेऊन पाऊलभर पाण्यांत ते तसेच पडून राहिले. घशांतून हांका येत होत्या.

' हशा–हशा–हशा ! '

आणि एकीकडे मनांत विचार येत होते कीं हशानें दहा रुपये मागितले, पण ते देण्याची आपण टाळाटाळ केली. आपणच हशाच्या बापाची जमीन सावकारींत घेतली. मग हशाला लग्नाला पैसे देऊन आपण त्याला घरीं राबायला आणला. त्याची झोपडी घेऊन आपल्या बेड्यांतल्या कोंपऱ्यांत राहायला जागा दिली. आज आपण एक गाडी भात वसूल केलं. त्या कुळाचं घर धुवून घेतलं. थोडं त्याला पोटाला ठेवलं असतं तर ? नाहीं तरी पावसांत सारं भिजून गेलं. एक गाडी भातासाठीं आपण अवेळीं निघण्याचा आततायीपणा केला आणि आतां ह्या प्राणसंकटांत सांपडलों.

कांहीं वेळ गेला. कांहीं अंतरावर पाण्यांत पावलें खळखळलीं. धीर करून गणू सावकारांनीं मान वर केली. तेवढ्यांत वीज चमकली. शरीराचे झोक सांवरीत हशा येत होता. त्याचं सारं अंग चिखलानं माखलं होतं. हात ताठरले होते. हशाला पाहतांच सावकारांना धीर आला. हशा जवळ केव्हां येतो इकडे त्यांचं सारं लक्ष लागलं,

पाण्यांत आणखी चार पावलं खळखळ वाजलीं. मग मात्र तीं पावलं थांबलीं. एकदम धपकन् कांहीं तरी पाण्यांत पडलं.

वीज चमकण्याची वाट पहात गणूकाका त्या दिशेकडं पहात राहिले. वीज चमकली. हशा जिथं चालतांना दिसत होता, तिथंच बैठक मारून बसला होता. त्यानं आपली मान गुडघ्यांत खुपसली होती आणि हात गुडघ्याभोंवतीं लपेटले होते. त्याच्या कपड्यांवर कांटेरी फांद्या लोंबकळत होत्या आणि अंगाखालून पाणी वहात होतं.

गणू सावकारांनीं हांक मारली,—

' हशा ! '

पण हशानं मान वरही उचलली नाहीं. इतक्यांत अगदीं डोक्याशीं वाघ असावा इतकी जवळ डरकाळी ऐकूं आली. क्षणभर तो आवाज घुमला नि शांत झाला. कानांत प्राण आणून वाघाचीं पावलं कुठं वाजत आहेत तें गणू सावकार ऐकूं लागले. मग तोंड वर करून त्यांनीं हळूच म्हटलं,—

' हशा ! डरकाळी ऐकलीस ना ? '

हशा स्तब्धच होता. वरून येणारं पाणी त्याच्या अंगाखालून वाहत होतं. गणू सावकार पुन्हां म्हणाले,—

' वाघाची आरोळी होती ती. तूं जंगलांतला आहेस, हशा ! वाघ आला तर अडवशील ? '

हशा कांहीं तरी म्हणाला असा सावकारांना भास झाला. ते म्हणाले,—

' कसा अडवूं म्हणतोस ? काठी घेऊन तुम्हीं वाघ मारतां. काठी घेऊन पुढं हो. त्याला माझ्या अंगावर येऊं देऊं नकोस. '

हशा उठेल म्हणून गणू सावकारांनीं वाट पाहिली. मग थोड्या वेळानं अस्वस्थ होऊन ते म्हणाले,—

' हशा उठ ना रे. तूं काय म्हणाला होतास ? तुला दहा रुपये हवे होते ना ! उद्यां तुला पंचवीस रुपये देतों. शिवाय माझा जुना कोट आहे तो देईन. बायकोला एखादं लुगडं द्यायला सांगेन; ऊठ—काठी घे—वाघ आला रे ! '

वाघाचं गुरगुरणंसुद्धां आतां ऐकूं येत होतं. गणू सावकार थरथरत्या ओठानीं म्हणाले,—

' हशा ! माझ्या मागं माझा संसार उघडा पडेल रे. मला संतान नाहीं, मला गति मिळायची नाहीं. एवढा व्याप केला, त्याचं काय होईल ? मला वांचव–वांचव. '

मोठ्या हिंमतीनं हशाकडे पाहण्यासाठीं गणू सावकारांनीं डोळे उघडले. तोंच पलीकडे वाघाचे हिरवेनिळे डोळे चमकल्याचा त्यांना भास झाला. डोळे मिटून त्यांनीं म्हटलं,—

' ऊठ हशा ! मी तुझा अपराधी आहे. मी कबूल करतों. तुझ्या बापाकडून खोटी प्रॉमिसरी करून तुमचं घरदार, शेत सारं घेतलं. मी सारं कबूल करतों. '

या कबुलीचा हशाचा मनावर कांहींच परिणाम झालेला दिसला नाहीं. तो मुका बसला होता. गणू सावकार काकुळतीनं म्हणाले,—

' हशा ! तुला सुद्धां मीं फसवलं. पन्नास रुपये तुला दिले नि तीनशेंच्या कागदावर तुझा आंगठा घेतला. वर व्याज लावलं नि त्याचे पांचशें केले. तुझी झोंपडी मीं फुकट गिळली. तुला आमच्या वेड्यांत राहायला देऊन फुकटचा राबवायचं ठरवलं. बायकोसह तुला राबवला. हशा ! तुझी प्रॉमिसरी फाडून टाकतों. आणखी काय सांगू ? तुझं झोंपडं तुला परत देतों, पण मला वांचव. '

एकाएकीं वाघाची डरकावणी आली. क्षणभर पाऊससुद्धां थांबला असं वाटलं. गणूकाका अगदीं काकुळतीनं म्हणाले,—

' हशा ! कशी रे दया नाहीं तुला माझी ? इतका निर्दय होऊं नकोस. तुझा सत्यनारायण मी करतों. तुला दोन शेतं देतों. तुझ्या मुलाचं लग्न लावून देतों. तुझ्या बापाकडून आंबराई लुबाडली ती परत देतों. तुमचं बोरीचं खाचर तुझ्या नांवं करतों. बघ अजून ऊठ ! तुला दया येऊं दे. एवढं ऐक माझं. मी तुला धाकटा भाऊ समजतों. तुझी सारी जमीन तुला देऊन इस्टेटींतला हिस्सा देतों. माझ्या घरासारखं घर बांधून देतों. ऊठ ना रे ! माझ्या नि वाघाच्या मधें पड. मला तो फाडून खाईल रे ! '

वाघाचं गुरगुरणं आणखी जवळ येऊं लागलं. एक वीज चमकली. त्या उजेडांत दरडीवर वाघाचं भलं मोठं धूड दिसलं नि विजेचा उजेड नाहींसा होण्यापूर्वींच गणूशकांनीं वाघानं मोठी उडी घेतलेली पाहिली. ती झेप पाहतांच उरलासुरला सारा धीर गळून गणू सावकार बेशुद्ध पडले.

हळु हळू--

रात्र संपली--दिवस उजाडला.

वर आकाश इतकं निळं दिसत होतं कीं रात्रीचा पाऊस नि वादळ स्वप्नासारखं वाटावं. झाडीमधून कुत्र्याचं भुंकणं ऐकूं येत होतं. गणू सावकारांनीं हळूंच डोळे उघडले. गाडीच्या चाकामागं स्वतःला पाहून क्षणभर त्यांना आश्चर्य वाटलं. मग सारं आठवलं. कांहीं अंतरावर कुठल्या तरी खेड्याचीं उडवीं दिसत होतीं. गांव इतक्या जवळ असून आपण उगीचच भ्यालों ! एखादी आरोळी ठोकली असती, तरी दहा वीस गांवकरी सहज धांवून आले असते. पण गांव इतक्या जवळ असून ह्या साल्या हशाला कसं समजलं नाहीं ? आहे कुठं तो ?

' तो साला हशा ' छातीशीं गुडघे घेऊन डोकं जमिनीवर टेकून निजला होता. त्याचं कुडतं रक्तानं भरलं होतं नि पलीकडेच वाघाचं भलंमोठं धूड पसरलं होतं !

गणू सावकारांना तें दिसलं. ते थोडेसे चकित झाले. ' म्हणजे हशानंच वाघाला ठार करून आपला प्राण वांचवला तर--' क्षणभर ते तसेच विचार करित उभे राहिले. नि मग मनाशीं कांहीं तरी निश्चय करून संतापानं त्यांनीं डोकं वर केलं.

जवळच उडालेला चाबूक पडला होता, तो हातांत घेऊन ते हशाजवळ आले. त्याच्या पाठीवर एक जोराचा फटका ओढून ते ओरडले,

' ऊठ साल्या ! तुझा बाप का गाडी जोडायला येईल ? '



# निरोप !

ती मुंबई सोडून जात होती.

मी तिला निरोप दिला. निरोप घेतांना ती काय म्हणाली मला आठवत नाहीं.

खरं सांगायचं म्हणजे ती कांहींच म्हणाली नाहीं. नि मी पण कांहीं बोललों नाहीं. कारण माझा गळा दाटून आला होता. मी प्लॅटफॉर्मवर उभा होतों.—— अगदीं अंधुक प्रकाश पडला होता. मला अगदीं एकटं वाटूं लागलं होतं. मनांत येत होतं, प्रत्येक माणूस माझ्यापासून असंच कां दूर जाणार ? जातांना कधींच का कुणी हात धरून म्हणणार नाहीं कीं,——' चल तूंही चल ! आपण दोघं मिळून हा प्रवास करूं. '

खरंच, मला त्यावेळीं असं वाटलं कीं कुणीसुद्धां मला तसं म्हणणार नाहीं. अगदीं राग आला मला. जो तो स्वत:च्या सुखदु:खांत गर्क अं ! बरंय् ! पाहून घेईन. माझी पण वेळ येईल.

सगळी हकीकत जरा सुसंगत सांगतो.

त्या दिवशीं ऑफिसांत तिचा फोन आला.

' हॅलो ! जयवंत का ? '

मी म्हटलं, ' जी हाँ ! आपण कोण ? '

' आपणबिपण कुणी नाहीं. एक गरीब मुलगी आहे मी. '

‘ अस्सं अस्सं ! गरीब मुली ! बोल ! ’

‘ एक काम आहे माझं. ’

‘ एकच कां ? दोन सांग ! ’

‘ तुमच्या कोट्या पुरे करा ! ’

वाचकहो ! मी कांहीं फार कोट्या करीत नाहीं. पण मी विचारतों, कोट्या केल्या म्हणून काय बिघडलं ? व्यवहारांत काय शब्द मोजून वापरायचे असतात की त्यांचा अर्थ कोशावर घांसून घ्यायचा असतो ? हंसत खेळत बोललें–हंसत खेळत समजलं, बस्स ! शब्दांचं काम संपलं.

पण या मुलीच्या बाबतींत हात टेकले आहेत मी. जरा वेडावांकडा शब्द तोंडांत आला, की तिनं तडाखा दिलाच. माझ्या वाचकांनों ! अशा एखाद्या मुलीशीं तुमची गांठ पडली आहे का ? असली तर मी तुमची कींव करितों.

अर्थात् मी माझी स्वतःची कींव करतोंच आहे. पण झालेल्या गोष्टीला उपाय नाहीं. या मुलीशीं माझी नुसती गांठच पडली नाहीं तर निरगांठ पडली आहे. थोडक्यांत–तिच्यावर प्रेम बसलं आहे माझं.

हो ! आमचा टेलिफोनवरचा संवाद राहिलाच कीं.

ती म्हणाली, ‘ माझं एक काम आहे. ’

मी विचारलं, ‘ काय काम आहे ? ’

‘ मी गांवाला चाललें आहे. ’

‘ गांवाला ? ’

‘ भले ! तुम्हांला कळलंच नाहीं का ? अहो महाशय ! म्हटलं आम्ही नोकरी सोडली ! ’

‘ काय म्हणतेस काय ? ’

‘ नोकरी सोडून गांवाला चाललें आहे आतां. ’

मला धक्काच बसला. हें काय ! नोटीस नाहीं–कांहीं नाहीं ! साधा भाडेकरूसुद्धां महिन्याची नोटीस देतो आणि मित्रामित्रांनीं फक्त चोवीस तासच आगाऊ कळवावं ? मी काकुळतीनं म्हणालों,

‘ खरं का ग हें ? ’

' काय म्हणालांत ? ' तिनं दरडावून विचारलं.

माझ्या 'ग'वर तिचा आक्षेप असावा. मी म्हटलं,

' कांहीं नाहीं. सांगतें आहेस तें खरं का ? '

' अगदीं शंभर टक्के ! '

' बरं ! तुझं काम काय आहे तें सांग पाहूं ! '

' स्टेशनावर निरोप द्यायला या मला. मेला एक भुरटा पुरभय्या चालला की चाळीस भय्ये स्टेशनावर येतात. मी एवढी निघालें, काय, मला ' सेंड ऑफ ' द्यायला कुणीच येणार नाहीं ? '

मी मनांत म्हटलं, ' कुणीच कां ? तूं बोलावलंस तर ऑफीसचा सारा स्टाफ येईल कीं. ' पण उघड मात्र बोललों नाहीं. तिला असला विनोद रुचायचा नाहीं. मी म्हटलं,

' कुणीच कां ? मी येईन. '

' याल ना ? '

' येईन. '

' कुठं भेटाल ? '

' कुठं भेटूं सांग. '

तिनं पत्ता दिला. गाडी सांगितली. फोन ठेवतांना ती म्हणाली,

' याल ना ? '

' येईन. पण नोकरी कां सोडलीस सांग. '

' भेट होईल तेव्हां सांगेन. '

' तुझ्या कामगारांचं आणि शेतकऱ्यांचं कांहीं काम आहे वाटतं ? '

' भेट झाल्यावर कळेल. '

' कीं लग्नबिग्न ठरलयू ? '

' भेटूं तेव्हां सांगेन. '

मी पुन्हा कांहीं बोलणार तोंच तिनं फोन खालीं ठेवला. मी तिच्यावर चिडलों. पण खरं सांगूं ? पटायचं नाहीं तुम्हांला तें. मला जें तिच्यांत आवडलं तें हेंच. ती नेहमी कांहींतरी गुपित ठेवते.

ठरलेल्या वेळेवर आम्ही स्टेशनवर आलों. गाडींत चढलों. चांगलीशी जागा पाहून तिची वळकटी पसरली. ती खिडकीशीं बसली नि मी प्लॅटफॉर्मवर उभा राहिलों. तिनं विचारलं,

' पुन्हां भेटलांत तर ओळखाल कीं नाहीं ? '

काय निष्ठुर असतात पोरी पहा ! मी अगदीं संतापलों. म्हटलं, ' थांब ! तुला कल्याणपर्यंत पोंचवायला येतों म्हणजे चांगली लक्षांत राहशील. '

ती म्हणाली, ' वा ! छानच ! या, आंत या. '

मी गाडींत शिरलों. गाडी चालू झाली. तिनं पसरलेल्या लहानशा वळकटीवर मी पण बसलों.

मग गाडींतले सोबती पाहूं लागलों. पलीकडेच एक मद्रासी जोडपं बसलं होतं. त्यानं नि त्यांच्या अवलादीनं दोनही बाजूचीं बांकं अडविलीं होतीं. दुसऱ्या हाताला चारपांच खलाशी बसले होते. त्यांनीं आपल्या टोप्या बांकावर काढून ठेवल्या होत्या. त्या टोप्यांवर आर. आय. एन्. कीं टी. आय. एन्. अशीं अक्षरं होतीं.

ती माझ्याकडे पाठमोरी बसली तिनं एकदम मान वळविली. नि विचारलं,

' तुमचे किती पैसे द्यायचे मी ? '

आश्चर्यानं मी म्हटलं, ' कसले पैसे ? '

' व्हिक्टोरियाचं भाडं-हमाली-'

' छे ! छे ! कांहीं नाहीं. '

' पहा हो मी द्यायला तयार आहे. '

पैशाचा हिशेब करायची का ती वेळ होती ? मुंबई सोडून ती कायमची चालली होती. —मला सोडून दूर निघाली होती. मी म्हटलं,

' मी कांही एक घेणार नाही. '

' मग म्हणाल—हिनं लुबाडलं ! '

मी म्हटलं, ' छे ! असं कधीं होईल का ? '

हंसत तिनं पाकीट मांडीवर टाकलं. मी म्हटलं,

' पाकीट जपून ठेव, नाहीं तर हरवेल. पैसे पुरेसे आहेत ना ? '

'हो.'

'आणखी हवे असले तर सांग.'

'तुम्ही देणार आहांत कां ?'

'हो ! प्रवासांत अडचण करून घेऊं नकोस.'

'पण परत मिळायचे नाहींत हं ! माझी नोकरी गेलीय् आतां.'

'नको देऊं.'

'मग द्या पांच रुपये.'

मी पांच रुपये काढले नि दिले. मी शंभर रुपये दिले असते. मनुष्याचं मन असं असतं. ती कायमची दूर जात होती. मला वाटत होतं, तिला हरतऱ्हेनें मदत करावी. एखाद्या राणीसारखा तिचा प्रवास व्हावा. या वेळेला जें घडेल तीच आपली जन्मभर जवळ बाळगण्याची आठवण !

पण ती–ती मात्र प्रत्येक शब्द ठोकठोकून घेत होती. प्रत्येक वेळेला मला बजावीत होती,– पहा बरं ! भावनेच्या आहारीं जाऊन तुम्ही हा सारा मूर्खपणा करीत अहांत. त्यांत माझं कांहीं नाहीं. मी तिऱ्हाईत आहें. तुम्ही दिलं मी घेतलं.

तिच्या या असल्या वागण्यानं मी मनांत खूपच चिडलों. पण चिडून काय बोलणार ? भावना नसलेल्या माणसाला का भावना समजावून सांगतां येतात ? मी स्वत:शीच म्हटलं, 'पोरी ! मी जें तुला देत आहें तें राजखुषीनं नि अक्कलहुषारीनं देत आहें. माझं स्वत:च त्यांत समाधान आहे. सारं पापपुण्य माझं.'

गाडीनं दादर स्टेशन सोडलं. मी विचारलं,

'आतां सांग,–नोकरी कां सोडलीस ?'

'कंटाळा आला.'

'म्हणजे ?'

'म्हणजे असं,–वरिष्ठांशीं भांडल्यें.'

'कां ?'

'मी अगदीं वाईट, भांडणारी मुलगी आहें. प्रत्येकाशीं माझं भांडण होतं. तुमच्याशींसुद्धां भांडेन.'

'बरं बरं ! वरिष्ठांशीं कां भांडलीस तें सांग आधीं.'

' पटलं नाहीं आमचं. नि नोकरीवांचून माझं थोडंच अडलंय् ? घरीं बसेन. वडिलांना सांगेन–मुलगाच बेकार झालाय् असं समजा. '

' खोटं बोलतेस तूं. तिकडे काय करणार सांग ? '

' झोंपा काढणार ! '

' साफ खोटं. मी सांगूं ? '

' सांगा पाहूं ? '

' लग्न करायचा बेत असेल ? '

' लग्न तर करायचंच आहे. पण घाई नाहीं त्याची. '

' कां बरं ? '

' लग्न होणारच–कुठं तरी नवरा आहेच माझा–माझ्या आधीं जन्माला आलेला. '

खरं होतं तिचं म्हणणं.

माटुंगा स्टेशन गेलं,–शीवही ओलांडलीं गाडीनं. मी विचारलं, ' तुझ्या त्या कामगारांच्या नि शेतकऱ्यांच्या पक्षानं तुला पाठवलं असेल–'

' हो ! आमच्या पार्टीचं काम आहे ना. '

' काय काम करणार तिथं ? '

' प्रचार. '

' पार्टीतर्फे पगार मिळतो तुला ? '

' पगार कसला तो–किरकोळ खर्च. '

' एकंदरीत म्हणूनच निघाली आहेस तूं. '

' म्हणूनच नव्हे. जायचं म्हणून तें काम घेतलं इतकच.

एकदम भावनाकुल होऊन मी विचारलं,

' मग माझी आठवण राहील ? '

स्वत:शींच बोलावं तसं तिनं म्हटलं,

' तुमची ?—तुमची का ? राहील. '

' किती दिवस ? '

' पुष्कळ दिवस. '

' पुष्कळ म्हणजे किती ?

' तें कसं सांगूं ? '

' बरं, मी पत्र पाठवूं ? '

' पत्र ! ! '

मी चाचरत म्हटलं, ' नाहीं—म्हणजे असं—

ती एकदम म्हणाली, ' नका पाठवूं. '

मी थंड पडलों. कांहींतरी बोलायचं म्हणून म्हटलं, ' पुन्हा कधीं आलीस तर आठवणीनं भेट. '

दोघं मुकीं झालों. माझं हृदय अगदीं जड झालं होतं. आणखी दोन स्टेशनं गेलीं. मीं मनाला सांगितलं, छे ! असं चालायचं नाहीं. जरा हंसतखेळत बोललं पाहिजे. मी म्हटलं,

' तूं तिकडे गेलीस कीं तुझं राष्ट्रकार्य बाजूला राहील. पण वडील मात्र तुझं कार्य उरकतील ! '

' उरकतीलही. '

' तुला चांगलं ठिकाण मिळेल. '

' मिळेलही. '

' मग मात्र थोडे दिवससुद्धां माझी आठवण रहायची नाहीं तुला. '

' नाहींही रहाणार ! '

तिची ही उत्तरं ऐकून अगदीं उद्वेग आला. थट्टा करायला गेलों, पण सारं उलटं झालं. खरं प्रेम असलं कीं नाटक करतां येत नाहीं हेंच खरं. गप्प बसायचं ठरवून गप्प बसलों.

इतक्यांत माझ्या लक्षांत आलं कीं पलिकडे बसलेला मद्रासी आमच्याकडे जरा जादा लक्ष देत आहे. मग असाही संशय आला कीं, बेटा माझ्याकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत आहे. आपला चेहरा फारच पडेल दिसत असला पाहिजे हें माझ्या तत्काळ ध्यानांत आलं. म्हटलं, छे ! चेहऱ्यावर जरा उजाळा आणलाच पाहिजे.

रुमालासाठीं मी खिशांत हात घातला तोंच त्या मद्राशानं इंग्रजींत विचारलं,

' कुठं चाललांत तुम्हीं ? '

मी म्हटलं, ' सोलापूरम्.--आपण ? '

तो म्हणाला, ' मद्रासम्--'

मी विचारलं, ' फार लांबचा प्रवास असेल नाहीं ? '

तो म्हणाला, ' तीन दिवसम् '

मी म्हटलं, ' ठीकम् ठीकम्. '

मान वळविली. ती पुन्हा पाठमोरी झाली होती. माझं अगदी हृदय अधु झालं. वाटलं, हळूच तिच्या खांद्यावरून डोकावून अगदी आर्त स्वरानं तिला हांक मारावी. पण मनांत विचार आला कीं माझ्याबद्दल तिच्या मनांत अणुरेणुएवढी भावना नाही. जाऊं द्या !

तोंच तिनं मान फिरवून विचारलं,

' ठाणं गेलं वाटतं ? '

मी सहजच म्हणालों,

' गेलं असेल. '

ती एकदम खुदकन् हंसली. ती कां हंसली हें लक्षांत येऊन मी पण हंसलों. ती म्हणाली,

' माझे दिवस असे मजेंत जातील तिकडे. '

मी म्हटलं, ' जातीलही. '

अगदीं बेपर्वा होण्याचं मी ठरवलं. तिनं म्हटलं,

' आमच्या गांवीं मोठी नदी आहे. '

मी म्हटलं, ' असेलही. '

' आतां कॉलेजचीं मुलं सुट्टींत आलीं असतील. '

मी म्हटलं, ' असतीलही. '

' आम्ही सगळे नदीवर पोहायला जाऊं. '

मी दचकून ओरडलों,

' काय म्हणालीस ? '

' कांहीं नाहीं ! म्हटलं, तिथं पोहायला अशी मजा येते. आम्ही सारी गम्मतीनी धमाकल घालतों '

ती बोलत असतां माझ्या डोळ्यांसमोरचा गाडीचा डबा दिसत नाहींसा झाला. तिथं एक भली मोठी नदी वाहूं लागली. वाळवंटावर नंग लंगोट नेसून गोरेगोमटे कॉलेज–कुमार दिसले नि ती–ती त्यांच्याजवळ हंसतांखेळतांना दिसूं लागली. मनांत मी अगदीं चिडलों. ती अशी त्या पोरांशीं हंसतखिदळत असतां मी मात्र हिंदु कॉलनीच्या एका गल्लींत काळोख्या कोपऱ्यांत रडत बसलेला असेन. जगांत प्रेमाला कांहींच कां किंमत नाहीं ? चंगीभंगी लोकांनीं तिच्याशीं मनसोक्त गप्पा माराव्या आणि तिच्यावर प्राणासारखं ज्यानं प्रेम केलं तो मी–त्याला पत्र लिहायला बंदी ? वारे दुनिया ! अच्छा ! पाहून घेईन. माझेही दिवस येतील.

ती सांगत होती त्यांतलं मला कांहीं ऐकूं येत नव्हतं. मी जागा झालों तो तिच्या दुसऱ्याच प्रश्नानं.

' तुम्हाला परतायला गाडी कोणती ? फार वेळ नाहीं ना बसावं लागणार ? '

' जो लागेल तो. '

' तुम्हांला त्रास पडला. '

' जो पडला तो. '

' तुमचे आभार मानतें. '

मी मनांत म्हटलं, संपलं ! तिऱ्हाइतासारखे तिनं आपले आभार मानले. तिला मी कुणी नाहीं. अच्छा ! ती पण मला कुणी नाहीं. नमस्ते.

मनांत नमस्ते म्हणत होतों, पण जें दुःख होत होतं त्याच्या वेदना, गाडी अंगावरून गेली असती तरी हलकी वाटावी इतक्या भयंकर होत्या.

बाहेर पाहिलं. कल्याणच्या आवारांत गाडी शिरत होती. आजपर्यंत गांठीभेटी झाल्या, गोष्टी केल्या. पण त्यांत प्रेमाच्या शब्दाशिवाय बाकीचे सारे शब्द होते. आणि म्हणतां म्हणतां आज हें कल्याण आलं. वाटा फुटल्या. ती दूर जाणार. मी खालीं उतरेन नि कुठंतरी भटकत राहीन. संपलं–सारं संपलं–आयुष्य संपलं. लघुकथा संपली.

जड हृदयानं उठलों. थरथरणारा हात निरोप घेण्यास पुढें केला. डोळ्यांत अश्रूंच्या रूपानं प्राण आले. मनांत आलं–हा स्पर्श शेवटचा–हें पाहणं शेवटचं–

ही आठवण शेवटची. मी नमस्ते म्हणणार तोंच त्या मद्राशाला पुन्हां बोलण्याची लहर आली. त्यानं एकाएकी विचारलं,

'तुमची बायको वाटतं ही ? '

चमकून मी तिच्याकडे पाहिलं. क्षणभरच आमच्या नजरा भिडल्या. दुसऱ्या क्षणाला लाजेनं लालबुंद होऊन तिनं मान खालीं घातली.

मी ताडकन् उडी मारली. किती मूर्ख मी ! जें ढोंग एका मद्राशाच्या लक्षांत आलं तें इतका वेळ माझ्या लक्षांत येऊं नये !

गाडी स्टेशनांत उभी रहात होती. चटकन् तिचा हात धरला नि ठणठणीत पुरुषी आवाजांत ओरडलों,—

' ऊठ ! उतर खालीं. '

बावळटून ती उभी राहिली. ती उभी रहातांच मी तिची वळकटी गुंडाळली, 'खांकेला मारली. तिची बॅग हातांत घेऊन दुसऱ्या हातानं तिचा दंड धरला नि प्लॅटफॉर्मवर उडी टाकली.

वाचकहो ! त्या मद्राशाला नि खलाशांना घेऊन गाडी सोलापुरमकडे जात आहे. प्लॅटफॉर्मवर दोघां तरुण स्त्री–पुरुषांना जितक्या जवळ जवळ उभं राहतां येईल तितक्या जवळ आम्ही उभे आहोंत. तिला निरोप दिला असं मी सुरवातीला तुम्हांला सांगितलं, पण तें खरं नव्हे. लघुकथेच्या तंत्रांतील ती एक आपली गम्मत होती झालं,——अच्छा ! नमस्ते !



## तिचा नवरा !

पहिल्या चार सासुरवासिणींची निवड केली तेव्हां तीस माणसांच्या रगाड्यांत मुलगी टिकावी इतकीच दृष्टी होती. पण धाकट्या भावाच्या लग्नाचा विचार सुरू झाला तेव्हां सर्वांनीं ठरवलं कीं मुलगी शिकलेली हवी. घरांत अगदींच कुणी शिकलेलं नाहीं.

धाकट्या भावानं तें ऐकलं मात्र नि त्यानं निक्षून सांगितलं कीं—लग्न माझं होणार आहे, शिकलेली मुलगी करून जर डोक्यावर बसली तर मी चिरडून जाईन—तुम्ही नाहीं. मुलगी बाळबोध वळणाची नि निकोप हवी. त्यांतून तिला लिहितां वाचतां येतच असलं तर चालवून घेईन.

त्या बरहुकूम सासुरवासिण आली. ती आली नि पडेल तें काम करूं लागली. बोलल तें ऐकून घेऊं लागली. या दोन गुणांनीं तिनं कुटुंबांतील साऱ्या माणसांचीं मनं आपलीशीं करून घेतली.

पण कुटुंबांत जसजशी ती आवडती होऊं लागली तसतशी नवऱ्याला नावडती होत आहे असं दिसूं लागलं. कारण जे नसतील ते दोष तो तिच्यामध्यें काढूं लागला नि विनाकारण वेडंवाकडं बोलूं लागला. त्याबद्दल जेव्हां वडिल माणसांनीं एकदा कानउघडणी करण्याचा यत्न केला तेव्हां अगदी तऱ्हेवाइकपणानं संतापून त्यानं सांगितलं कीं—ती माझी बायको आहे. मी वाटेल तें बोलेन.

ज्या दिवशीं हा प्रसंग घडला तो सारा दिवस त्या मुलीनं रडून काढला. रात्रीं खोलींत गेल्यावर मुद्धां तिला हुंदके आवरतां येत नव्हते. एका कोपऱ्यांत मिणमिणता धुराचा दिवा जळत होता नि दुसऱ्या कोपऱ्यांत उभी राहून ती अश्रू ढाळीत होती. त्याचं तऱ्हेवाइक संतापणं तिच्या डोळ्यासमोर येत होतं. तिला वाटलं कीं खोलींत तो तसाच संतापूं लागेल. मग तिच्या मनांत आलं कीं याच संतापांत त्यानं आपल्याला मारलं तर——

पण तो खोलींत शिरला तो हंसतच. हंसतच तो म्हणाला,

' मी संतापतो असा कधीं कधीं ! तूं घाबरलीस होय ? '

ती कांहीं बोलली नाहीं तेव्हां तो म्हणाला,

' मी एक गोष्ट सांगणार आहे—नीट ऐक. '

त्यानं तिचा हात आपल्या हातीं घेतला नि कुरवाळीत विचारलं,

' मी हें घर सोडलं तर माझ्याबरोबर येशील ? '

पण तिनं कांहींच उत्तर दिलं नाहीं, तेव्हां धरलेला हात रागानं खालीं सोडून त्यानं म्हटलं,

' ठीक आहे, रोजचं असं तुला रांधावं लागेल मग ? '

तरीसुद्धां ती गप्प राहिली. तेव्हां तिच्या पाठीवरून हात फिरवीत ममतेनं तो म्हणाला,

' मी तुला बोलत असतो, पण तुझ्यावर माझा राग नाहीं. मी माझ्यावरच संतापतो. का तें विचारलं नाहीस ? '

तिनं फक्त मान हलविली.

' कुठंतरी अडगळीच्या खोलींत धुराच्या उजेडांत आपण झोंपतों. माझ्या राणीला मला थोडंसं सुद्धां सुख देतां येत नाहीं. आपण बाहेर जावं, स्वतंत्रपणं रहावं, असं तुला नाहीं वाटत ? पहा बुवा. '

तिचे अश्रू आतां थांबले होते. तिचे ओले झालेले गाल पुशीत तो म्हणाला,

' बोल, येणार कीं नाहीं माझ्याबरोबर ? '

' घर सोडून काय करायचं ? '

' नोकरी–धंदा–हमाली–वाटेल तें. पण इथं सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारं आयुष्य तीस माणसांची सेवा करीत काढायचं नाहीं. काय ? येणार ना ? '

तिनं एक आवंढा गिळला नि म्हटलं,

' आपण जाल तिथं मला गेलंच पाहिजे. इथं राहून मी काय करूं ? '

यानंतर तीन दिवस शांततेंत गेले. चवथ्या दिवशीं दुकानांतून नवरा दुपारीं जेवण्यासाठीं घरीं आला, तेव्हां तिनं त्याला वाढलं. जेवण चालूं असतां तिचा मोठा दीर घाईनं आंत आला नि त्यानं तिच्या नवऱ्याला विचारलं,

' बंडू, पेठेंत भरणा करायला पांचशें रुपये दिले होते ते दे पाहूं. बाहेर रमणलालचा माणूस आलाय्. '

नवरा कांहींच बोलला नाहीं तेव्हां तिला वाटलं त्याला ऐकूं आलं नसावं. वाढतांना तिनं हळूच म्हटलं,

' भावजींनी काय विचारलं तें ऐकलं का ? '

तिच्या अंगावर खेकसून तो ओरडला,

' नीट वाढ जरा—शुद्धीवर आहेस ना ? '

तिनं ओळखलं कीं स्वारी मुद्दामच मुकी झाली आहे. धाकटा भाऊ बोलत नाहीं असं पाहून मोठ्या भावानं ओरडून विचारलं,

' ऐकूं आलं कां रे ? '

तिच्या नवऱ्याच्या कपाळावर आंठ्या पडल्या. तो म्हणाला,

' जेऊंसुद्धां देणार नाहींस का स्वस्थपणानं ? '

' जेव कीं सावकाश—पण पैसे कुठं आहेत सांग. मी घेऊन जातों. '

' माझं जेवण होऊं दे. '

' त्याचा माणूस खोळंबलाय्. '

' येईल तो पुन्हां. '

' बंड्या, आधीं ऊठ नि पैसे आण. '

तिच्या नवऱ्याच्या कपाळावरची शीर ताडकन् फुगली. डोळे तारवटून त्यानं पुढलं अन्नानं भरलेलं ताट भिरकावलं नि तो ओरडला,

' दिवसभर मर मर मरतों त्याचं कांहीं नाहीं. दोन घांस खाऊं देऊं नका. पांचशें रुपयांची रक्कम ती काय नि गहजब तो किती–जा–जा–'

' ऊठ, नि रक्कम दे. '

' मी सांगितलं ना— '

' काय ? '

' पैसे हरवले ! '

' हरवले ? '

' हो ! '

' असे कसे हरवले ? '

' ते ठाऊक असतं तर काय ? '

' तूं खोटं बोलतो आहेस. '

' छान्, मरेमरेतो काम करून वर हीं बोलणीं ! पांचशें रुपड्याचं तुम्हांला अधिक वाटतं–माणसाचं नाहीं. ठीक आहे. हा मी चाल्लों घराबाहेर. काय ग, तूं येतेस कीं नाहीं ? '

क्षणभर सारं कुटुंब गोंधळलं, तो आपल्या बायकोला हातानं धरून घराबाहेर पडला. मागाहून आई ओरडली,

' अरे थांब ! तिला दुसरं लुगडं तरी घेऊं दे. '

स्टेशन दोन मैल लांब होतं. बैलगाडींतून जात असतां दोघांपैकी कुणीहि बोलल्ं नाहीं. आगगाडींत बसल्यावर तो हंसत हंसत म्हणाला,

' हें पाहिलंस ? '

तिनं पाहिलं. नोटांचं एक भलंमोठं पुडकं त्याच्या हातांत होतं. पुडकं खिशांत घालीत तो म्हणाला,

' मी सांगितलं नव्हतं आपण घर सोडणार ! '

दोघं शहरांत आलीं. नि एका मोठ्या हॉटेलांत उतरलीं, एवढं वैभव तिनं कधीं पाहिलं नव्हतं. ती म्हणाली,

' इथं रहाणार आपण ? '

' सध्यां राहूं या. इतके आयुष्याचे दिवस कष्टांत घालविले, आतां थोडे दिवस मजेंत घालवूं. '

तीन महिने त्यांनी अगदीं मजेंत काढले. कष्टाचा अणूसुद्धां कुणी उचलला नाहीं. सकाळ–संध्याकाळ मुंबई पाहिली, चित्रपटांना भेटी दिल्या, कापड खरेदी

केलं, तीन महिन्यानंतर खिशांत पाऊणशें रुपये राहिले तेव्हां हें सारं सुख सोडणं प्राप्त आलं. त्यानं दोन खोल्यांची एक जागा घेतली. भांडींकुंडीं आणली. संसार चालू केला.

आणखी महिना गेला. सकाळीं उठून नोकरी शोधण्यास तो बाहेर जाई. दिवसभर ती एकटी असे. ' मी अगदीं एकटी असतें—' असं जेव्हां कंटाळून तिनं त्याला म्हटलं, तेव्हां तो म्हणाला,

' भावाकडं का जात नाहीं ? '

ती म्हणाली,

' तीन महिने इथं काढले तेव्हां त्याला भेटलोंसुद्धां नाहीं, नि आतां तो काय म्हणेल ? '

' तरी तुला जावं लागणारच ! '

' कां ? '

' नोकरीसाठीं. अग, ओळखीशिवाय नोकरी मिळत नाहीं. आपण इथं नवे आहोंत. शिवाय पैसेही संपत आले. आहेत ! '

पैसे संपत आल्याचं ती पहातच होती. त्या दिवशींच ती भावाकडे गेली. ती गेली ती नोकरी घेऊनच आली. नवीन निघालेल्या रेशन दुकानांतून जमा झालेला गल्ला गोळा करून मुख्य ऑफिसांत भरणा करण्याचं काम त्याच्याकडे आलं.

तो कामावर जाऊं लागला. चांगला महिनाभर कामावर गेला. महिन्याचा पगार हातीं आला, तेव्हां तिला खूपच उत्साह आला. संसाराला लागणाऱ्या कितीतरी लहान लहान वस्तू तिला आणायच्या होत्या. प्रत्येक महिन्याला थोड-थोडी खरेदी करायची, असं तिनं ठरवलं. तिला वाटलं खरंच इथं किती स्वतंत्र आहोंत आपण, कितीतरी गोष्टी मनाप्रमाणं करितां येतात. किती मजा आहे !

अगदीं नकळत दिवस उगवून मावळूं लागला. एक दिवस अचानक तिचा भाऊ आला नि त्यानं विचारलं,

' तुझा नवरा कुठं आहे ? '

' कां ? '

‘ घरांत नाहीं कां ? ’

‘ छे, ते कामावर गेले आहेत. ’

‘ कामावर ? आज आठ दिवस तो कामावर नाही. ’

‘ म्हणजे ? ’

तेंच विचारून पहा आला कीं. ’

‘ संध्याकाळीं नवरा घरीं आला तेव्हां तिनं विचारलं,

‘ कामावर जात नाहीं वाटतं ? ’

‘ तुला कळलं ना शेवटीं ? ’

‘ कळलं म्हणजे ? ’

‘ कळणार तें ठरलंच होतं—मी नोकरी सोडली आहे ! ’

‘ कां ? ’

‘ कां ? अग, तुझ्या भावानं मोठ्या गौरवानं नोकरी दिली. आम्हांला परस्पर जेलमध्यें पाठविण्याचें धंदे आहेत स्वारीचे. साठ रुपये पगार नि काम किती ! रोज हजार रुपयांची जोखीम घेऊन हिंडावं लागतं. परवांच्या दिवशीं आमच्या-पैकीं एकाला चोरांनीं मारलंसुद्धां. बोल ! हजार रुपये गेले, तर आणायचे कुठले ? शेवटीं कोठडींतच बसायचं ना ? ’

ती गप्प राहिली, तेव्हां जवळ जाऊन म्हणाला,

‘ मी धंदा सुरू करणार आहे. धंद्यांत आज खरी किफायत आहे. वस्तू घेऊन ठेवायची फक्त. किंमत आपोआप वाढते. माझा सारा कल धंद्याकडे आहे बघ ! ’

मग सकाळपासून रात्रपर्यंत तो बाहेर राहूं लागला नि घरीं आल्यावर धंद्याच्या गोष्टी बोलूं लागला. व्यापारी कशा हिकमती करितात नि एका रात्रींत लक्षाधीश कसे होतात—आज कसलं दुकान चांगलं चालेल, नि त्यासाठीं भांडवल किती लागेल, अशा गप्पा सांगत असतांच एक दिवस कशानं तरी भरलेलं एक टोपलं त्यानं घरी आणलं नि जमिनीवर ओतलं. आंतून मातीची खेळणीं बाहेर पडली. खाकेंतील रंगाचे डबे तो खालीं ठेवीत असतां तिनं विचारलं,

‘ हें कशासाठी ? ’

‘ तसं कांहीं विशेष नाहीं. खेळणीं आहेत हीं. रंगवून द्यावयाचीं आहेत.

फावल्या वेळांत करायला माझ्यासाठीं काम आणलंय हें. जमलं तर तूं हातभार लाव थोडा !'

हें काम आपणासाठीं आणलं असं तो म्हणाला खरा, पण दुसरे दिवशीं त्याला जरूरीचं काम निघालं नि त्यानंतर रोज जरूरीचीं कामं निघूं लागलीं. आणलेलं काम साहजिकच तिला पुरं करावं लागलं. तें पुरं होतांच त्यानं कारखानदाराकडं पोहोचतं केलं. पण आधीं तो शब्द देऊन बसला होता. त्यामुळं येताना आणखी दोन टोपल्या खेळ रंगविण्यासाठीं घरीं आणावे लागले. तें नवं काम आल्यावर मात्र तिच्या लक्षांत आलं कीं काम जें आणलं जातं तें खरं आपणासाठींच. आणि तें पुरं केल्याशिवाय मिळकतीचा दुसरा उपाय नाहीं.

काम कायमचं गळ्यांत आलं तेव्हां तिला वेगळीच भीति वाटूं लागली. तिच्या मनांत येऊं लागलं कीं आपलं काम चालूं असतां भाऊ आला नि त्यानं विचारलं तर ? तिनं खोलींतच एक पडदा केला नि त्याच्या आड ती बसूं लागली.

आपली करामत तिच्या ध्यानांत आली हें तिच्या नवऱ्याला समजलं, तेव्हां तो तिच्याजवळ रडला. तो म्हणाला,

' मी नीच आहें. मी तुला कष्ट देत आहें. पण मला नोकरीच मिळत नाहीं सध्यां—नाहीं तर—'

अशा रीतीनं मनावरचं जें विवेकाचं दडपण तें काढून टाकल्यावर तो नवीं नवीं कामं आणून टाकूं लागला, नि ती तीं कामं पुरीं करूं लागली. स्वयंपाक लौकर आटोपावा—संध्याकाळपर्यंत हें काम करावं—मग पुन्हा स्वयंपाकाला लागावं.

लहानसहान गोष्टीसाठीं स्त्रिया हवे तेवढे कष्ट करायला तयार असतात. ती तर आपला संसार चालविण्यासाठीं धडपडत होती. तिच्या मनांत येई—कुणी तरी काम करायचं—कुणीतरीं मिळवायचं. मींच काम केलं तर काय बिघडलं ? उद्यां त्यांना नोकरी लागेल—

पण चार महिने गेले तरी तो बेकारच राहिला. तशी आतां नोकरीची जरूरहीं नव्हती. फक्त मधून मधून तिला पडणाऱ्या कष्टांबद्दल त्याला रडवं तोंड करावं लागे इतकंच ! चार महिने गेले. तिचे डोळे ओढलेले दिसूं लागले होते नि कातडी फिकट झाली होती. एक दिवस तिला ताप आला.

त्यानं चार दिवस वाट पाहिली. औषध दिलं पण ताप हटेना. तेव्हां त्याला चिंता पडली. आलेलं काम परत करून तिचा ताप उतरण्याची तो वाट पाहूं लागला.

त्याच्या नशिबानं तिचा ताप गेला, पण अशक्तता राहिली. त्यांतच तिला ओकाऱ्या येऊं लागल्या. पूर्वीसारखं काम होत नाहीसं झालं. ती वारंवार आजारी पडूं लागली.

त्या आजारीपणांत त्याच्या लक्षांत आलं कीं तापाची झळ लागून तिचे दागिने काळे पडले आहेत. उजाळा देण्यासाठीं आस्थेनं त्यानं ते तिच्याजवळून काढून घेतले.

तिच्या आजारीपणांत त्याची चांगलीच आबाळ झाली होती. बाहेर लोक चैन करीत होते नि हा पहात होता. नवीन नवीन वस्त्रांचीं लेणीं ते अंगावर चढवीत होते. पण कितीएक वर्षे एक लोकरीचा कोट करायचा त्याच्या मनांत होतं तरी अजून जमत नव्हतं. शिवाय हातांत एखादी अंगठी हवी होती. घड्याळाची तर फार जरूर होती.

जरूर असलेल्या गोष्टी लवकरच पुऱ्या झाल्या. आपल्या दागिन्यांचं हें नवं रूप ओळखायला तिला उशीर लागला नाहीं. पण ती कांहीं बोलली नाहीं, तोही कांहीं म्हणाला नाहीं. पण त्याची नजर मात्र वारंवार तिच्या मंगळसूत्राकडे जाऊं लागली. विनाकारण दोन तोळे सोनं तिथं अडकून पडलं होतं नि कितीतरी गोष्टी संसारांत हव्या होत्या. त्याची ही नजर तिच्या लक्षांत आली. मग एक दिवस तो अधाशीपणें पहात असतां तिनं मंगळासूत्रावर हात ठेवला नि डोळे वटारून मान हलविली.

तसा तो शहाणा होता. बायकांची जातच हट्टी असं म्हणून तो नाद त्यानं सोडला. पण त्यामुळं अडचणी दूर झाल्या नाहींत. सारं काम तिच्यामुळं अडलं होतं नि ती तर बरी होत नव्हती, रोजचा प्रश्न अधिकच बिकट होत चालला होता.

मग तो विचार करूं लागला. बरं होण्यासाठीं आपण तिला पुष्कळच सवड दिली. आतां कांहीं तरी वेगळा उपाय काढला पाहिजे.

उपाय शोधायला त्याला फार वेळ लागला नाहीं. एक दिवस तो तिला म्हणाला,

' तुझ्या प्रकृतीला मानवेल असं काम तुला हवं, तूं जर शिकलेली असतीस तर सोपं काम तुला मिळालं असतं. इतर पोरीप्रमाणें रेशन ऑफिसमधें तूं लागून गेली असतीस. '

तिला वाटलं—खरंच ! मी शिकलेली असते तर ! तो पुढें म्हणाला,

' म्हणूनच मी एक गोष्ट करणार आहे. '

तिनं विचारलं,

' काय ती ? '

' पण तुला आवडेल कीं नाहीं ? '

' आपल्याला आवडलय् ना ? '

' आवडली तर आहेच—दुसरा इलाजच नाहीं. '

' मग करा. '

' छे ! छे ! आधीं तूं ऐकावंस हें चांगलं. '

' मग सांगा. '

' मला तर नोकरी मिळत नाहीं. आपली दैना तूं पहातेच आहेस, मी उपाय काढलाय्—'

' सांगा ना— '

' दुसरं लग्न करणार मी. '

तिनं डोक्याकडे हात नेला. दुसरं लग्न ! !

तो म्हणाला,

' छे ! छे ! अशी घाबरूं नकोस. अग, लग्न म्हणजे खरं लग्न नाहीं. आपलं नांवाला. माझं प्रेम तुझ्यावरच आहे. '

ती बोलली नाहीं तेव्हां त्यानं विचारलं,

' आवडलं नाहीं माझं बोलणं ? '

' मला काय आवडायचय् ? '

' खरंच सांगतों मी. माझं प्रेम तिच्यावर नाहीं. तिचं रूप पहा म्हणजे समजेल. एकदा आणतो भेटायला. गव्हर्मेंट सर्व्हिस आहे तिला. पगार ठाऊक आहे तिचा ? दीडशें रुपये !'

ती स्वत:शींच पुटपुटली—दीडशें !

‘ अग, ती दिवसभर काम करील नि आपण राजाराणीसारखे राहूं. तिच्याशीं अधून-मधून गोड बोलावं लागेल. पण तें केलें पाहिजे.—आपल्याला बाळ होणार आहे ना ?—’

तो सारा दिवस काम करीत असतां ती विचार करीत होती कीं दीडशे रुपये कमवणारी ही सवत कशी असेल ? त्याच्या बरोबरच ती येणार या कल्पनेनं रोज संध्याकाळीं ती बाजूच्या खिडकींतून रस्त्याकडं पहात बसे. पण आठ दिवस गेले तरी तो एकटा घरी येत होता. नववे दिवशीं तो आला तेव्हां त्याचा चेहरा अगदी मलूल झाला होता. डोळे तारवटले होते. आंत येतांच जगाला दोन तीन शिव्या देऊन तो म्हणाला,

‘ हलकट साले—माझं भाग्य पहावत नाहीं यांना ! ’

तिनं विचारलं,

‘ काय झालं ? तिला आणली नाहींत ? ’

चिडखोरपणानं ओरडून तो म्हणाला,

‘ ती येणार नाहीं—लग्न होणार नाहीं. ’

‘ कां ? ’

‘ कुणीतरी तिला माझं लग्न झालेलं आहे म्हणून सांगितलं ! ’

‘ म्हणजे ? ’

‘ लग्न झाल्यावर मी तिला सारं कांहीं कळविणार होतोंच ! ’

त्यानं धाडकन् खुर्चीवर अंग टाकलं. त्याचा तो काळवडलेला भकास चेहरा पाहून तिला खरंच वाटूं लागलं कीं ती मुलगी यांना मिळाली असती तर बरं झालं असतं. आपल्या हातीं असतं—आपण सांगून ती ऐकणारी असती तर आपण जाऊन सांगितलं असतं !

तिचे दिवस आतां भरत आले होते. मधून मधून पोटांत कळा येत नि ती अस्वस्थ होई. घराबाहेर जाण्यास तो आतां उत्सुक दिसत नव्हताच. त्यांतूनच तो जाऊं लागला तर ती त्याला राहवून घेई. तेवढं निमित्त त्याला पुरेसं होतं.

पण घरांत रहायची इच्छा असून घरांत राहणं आतां त्याला जड जाऊं लागलं. कारण भाडं थकलं होतं नि रोज खेप मारण्यास भैय्या चुकत नव्हता. शिवाय घरांतलं धान्य संपलं होतं नि खिशांत दिडकी नव्हती.

त्याला नोकरी हवी होती पण जबाबदारीशिवाय कुणी नोकरी देत नव्हतं. धंदा करायचा होता, पण एका रात्रींत पैसे मिळविण्याची युक्ती सांपडत नव्हती. दुसरं लग्न करायचं होतं पण मिळवती बायको मिळत नव्हती. सारं जग जणूं त्याच्यावर उलटलं होतं. नवल नव्हे तो वैतागून गेला ! एक दिवस त्या वैतागांतच त्यानं तिला म्हटलं,

‘ मी घरीं जाणार आहे ! ’

भिंतीला टेकून ती बसली होती. ती एकदम सरळ झाली. तिनं विचारलं,

‘ काय म्हणालांत ? ’

‘ घरीं जाणार आहे मी ! ’

तीक्ष्ण स्वरांत ती म्हणाली,

‘ जा. तुम्ही जा ! मी मात्र येणार नाहीं तुमच्या बरोबर. जिथून मानान निघाले तिथं रडत परत जायचं ? मी इथंच मरेन ! ’

तो म्हणाला,

‘ मर मग—’

तासातासाला तिची अवस्था आतां कठीण होऊं लागली. पोटांतल्या वेदना वाढूं लागल्या. त्या सहन न होऊन ती जमिनीवर लोळूं लागली. वेदना मनस्वी झाल्या तेव्हां उताणी पडून दोन्ही पाय भिंतीवर टेकून ती भिंतीला रेटूं लागली.

भोंवताली जमिनीवर केर तसाच होता. स्वयंपाकघरांत खरकटी भांडीं तशींच पडली होती. दारावर नि भिंतीच्या कोपऱ्यांत कोळ्याचीं जाळीं झुलत होती.

मधून मधून ती आपल्या नवऱ्याकडे पहात होती. दोन्ही हात मानेमागं ठेवून तो उताणा तक्तपोशीकडे पहात पडला होता. तिला वाटत होतं कीं अजून हा उठेल नि आपल्याला धीर देईल. अजून हा उठेल नि डॉक्टर किंवा नर्स आणण्याची व्यवस्था करील.

डॉक्टर काय किंवा नर्स काय—कुणालाही बोलावण्यास पैसे लागतील नि ते आपल्याजवळ नाहींत हे तिला कळत होतं. तरीसुद्धां—बोलावण्यास जातो—एवढंच

त्यानं म्हणावं असं तिला वाटत होतं. त्यानं तसं म्हणावं मग डॉक्टर आला नाहीं किंवा सुटका झाली नाहीं तरी चालेल.

पण आपल्या जागेवरून तो उठेल असं चिन्ह दिसेना. पोटांत एकाहून एक वेदना येत होती नि चिरफाड करून जात होती. दांत ओठ दाबून—डोळे ताठ करून—मुठी आवळून ती पडली होती. एकदम पडल्यापडल्याच किंचाळली,

‘ जा उठा ! कुणाला तरी बोलावून आणा ! जा ! ’

तिच्या शब्दासरशीं तो उठला नि कोट चढवून बाहेर पडला. त्याच्या चपलांचा आवाज तिनं ऐकला.

क्षण जाऊं लागले नि त्यांचीं पळं झालीं. पळांच्या घटिका झाल्या. वेदना होतच होत्या. कांहीं वेळानं ती उठली. तो अजून आला नव्हता. तिनं दूरवर पाहिलं. तो कुठं दिसला नाहीं, दार लोटून ती परत भिंतीशीं येऊन बसली.

दुपारचं ऊन आंत आलं नि साऱ्या भिंती अन् जमीन तापवून निघून गेलं. खिडकींतून संध्याकाळचा कोवळा कवडसा तिच्या अंगावर पडला. सकाळपासून सोसलेल्या यातनांनीं तिला ग्लानी आली होती. तोंड पांढरं पडलं होतं. नि डोळ्याभोंवतालचीं वर्तुळं उठून दिसत होती.

आपल्याला भूक लागल्याचं तिच्या लक्षांत आलं. पण उठून कांहीं करावसं वाटत नव्हतं नि केलंच तर खायची इच्छा नव्हती. रात्र पडूं लागली. तिनं डोळे मिटले नि ती पडून राहिली. नवरा आला तर दरवाजा लोटलेलाच होता.

पण सकाळ झाली तरी तो आला नाहीं. आतां मात्र ती सारं कांहीं समजली. भिंतीच्या आधारानं उठून तिनं पदर बांधला.

त्याच वेळेस तिचा नवरा तीस माणसांच्या रगाड्यांत येऊन पडला होता. भल्या पहांटे तो गावांत शिरला नि आपल्या घराशीं आला. अजून दार उघडलं नव्हतं. वळचणीला लपून तो वाट पहात बसला. कांहीं वेळानं त्याची मोठी भावजय बाहेर आली नि तिनं अंगणांत सडा घातला. सारवणाचं भांड घेऊन ती आंत गेली तेव्हां तो झटकन् घरांत शिरला. मग एका अंधाऱ्या खोलींत शिरून डोक्यावरून पासोडी ओढून तो पडून राहिला.

तो तसा गुपचुप आंत आला. पण रांगोळीचं भांडं घेऊन भावजय बाहेर येत

होती, तिनं त्याला पाहिलं. थोड्याच वेळांत भावजी परत आल्याची बातमी घरांत पसरली.

तो एकटाच परत आलेला पाहून सर्वांना विचित्र वाटलं. त्याच्या आईनं त्याला उठवलं नि विचारलं,

' गोदू कुठं आहे ? '

तो बोललाच नाहीं. त्याच्या भावजयीनं आर्जवें केलीं—मोठ्या भावानें दरडावलं—आई रडूं लागली, तेव्हां तो म्हणाला,

' तिनं मला सोडलं. '

' कुठं गेली ती ? '

' एकदां सांगितलं ना पळून गेली. मी कुठं कुठं तपास करणार ? '

मग हातवारे करीत तो म्हणाला,

' अहाहा, काय पण बायको पाहून दिली ! खरंच आहे ! तुम्हाला थोडीच हवी होती स्वत:ला ! तिला रूप तरी आहे ! बरं, शिक्षण तरी ? निदान तिचा बाप श्रीमंत असावा ! तो तिचा दळभद्रा भाऊ ! काय बोलूं काय ? माझ्या जन्माचं पुरं नुकसान केलं. माझं आयुष्य वायां घालविलं ! '

' मधेंच भावजयीनं विचारलं,

' अहो, पण गोदू कुठं आहे ? '

' गेली–ती गेली–मेली असं समजा. विचारूं नका–पुन्हां विचारूं नका मला. '

सकाळ झाली तेव्हां चहा घेण्यासाठीं त्याच्या हातापाया पडावं लागलं. मग जेवणासाठींहीं त्यानं आणखी विशेष आढेओढे घेतले यांत नवल नाहीं. जेवण झाल्यावर आदल्या दिवसापासून झालेल्या कष्टानं त्याला झोप आली. तो झोंपला. पण आज जग उलटलच होतं त्याच्यावर. वामकुक्षी सुखानं होणार नव्हती.

कारण दुपारच्या सुमारास रस्त्यावर घरापुढं बैलगाडीचा आवाज आला. अंगणाजवळ येऊन एक गाडी उभी राहिली. गाडीवान खालीं उतरला. नि घरांत येऊन त्यानं सांगितलं कीं, मूल घेऊन एक बाई गाडींत आली आहे. नि ती बोलावीत आहे.

सासरे डोक्यावर टोपी घालून बाहेर आले. गाडीचा पडदा बाजूला करून त्यांनीं आंत डोकावलं. वळकटीला टेकून त्यांची धाकटी सून आंत पडली होती. कुशींत एक कोवळा लाल जीव होता.

म्हातार्‍याच्या डोळ्यांत पाणी आलं. थरथरता हात पुढं करून ते पुढं करून म्हणाले,

'मुली ! ऊठ घरांत चल !'

मुलीनं उठल्यासारखं करून म्हटलं,

'मुलाला देण्यासाठीं आलें आहे. मी घरांत येणार नाहीं.'

म्हातार्‍याचा गळा दाटून आला. घोगर्‍या शब्दांत ते म्हणाले—

'असं काय बोलतेस बरं सूनबाई ! घर तुझं आहे आम्हांला असं सोडून कुठं जाणार तूं ?"

'अशा तशा ठिकाणीं मी जाणार नाहीं. जिथं मी जाणार तिथं कुणाला येतां यायचं नाहीं. चालले मी—जातें हं !'

सासर्‍याच्या हातीं पोटचा गोळा देऊन ती मागं गाडींत पडली. तिची मान बाजूला कलली. एक कण्हण्याचा सूर तिच्या घशांतून निघाला.

एकदम घरांतून एक मोठा हंबरडा ऐकूं आला. धप्‌धप्‌ पावलं वाजवीतं तिचा नवरा बाहेर आला. एकीकडं ऊर बडवीत होता नि मुठी चावीत होता. धांवत येऊन त्यानं बायकोच्या शरीराला कवटाळलं नि तो जोरजोरानं विव्हळू लागला.

"कशी गेलीस ग मला टाकून ? माझी राणी ती ! बोल ना ग—माझी छकुली."

एकीकडे त्याची बोटं तिच्या हातावरून फिरत होती. हळूहळू ती खांद्यावर चढली. नि मग खांद्यावरून तिच्या गळ्यावर विव्हळूं लागली. बोटं गळ्यावर विव्हळूं लागली नि दुसर्‍याच क्षणाला तो किंचाळत उठला.

'कैदाशीण !—कैदाशीणनं मंगळसूत्र विकलं—दोन तोळ्यांचं मंगळसूत्र विकलं—दोन तोळे सोनं विकलं !'

आतांपर्यंत शेजारीपाजारी भोंवताली जमा झाले होते. नि ऐकत होते. त्याचा निर्लज्जपणा पाहून सर्व थक्क झाले काय बोलावं हें कुणालाच सुचलं नाहीं.

तोंच त्यानं आपलं शरीर वडिलांच्या पायाशीं फेकलं नि जमिनीवर डोकं घाशीत तो म्हणाला,

'मला क्षमा करा. हें घर सोडून मी जाणार नाहीं. ती डाकीण होती. तिनं भूल घातली मला. तिच्याच चिथावणीनं मी घराबाहेर पडलों. तिला शहरांत मजा करायला हवी होती.–मला क्षमा करा—'



## स्वतःला विसर !

एका शहरांत एक उनाड मुलगा रहात होता. एकवीस वर्षं त्यानं दुसरं कांहीं केलं नाहीं. एकवीस वर्षं त्यानं पतंग उडविले. एकवीस वर्षं तो जुगार खेळला नि पोरींच्या मागं शीळ घालीत हिंडला.

त्याला वडील नव्हते; आठ वर्षांपूर्वी वारले होते. आई होती नि धाकटीं भावंडं होतीं. आई दिवसभर गिरणींत काम करून मुलांची गुजराण करीं. पहांटे गिरणींत जाण्यापूर्वी मुलांसाठीं खायलाप्यायला करून ठेवावं—शेजाऱ्या-पाजाऱ्याला मुलांवर लक्ष ठेवायला सांगून आपण कामावर जावं—सायंकाळीं थकून भागून आल्यावर मुलांना खाऊपिऊं घालून कुशींत घेऊन झोपीं जावं—असे त्या माऊलीचे दिवस जात होते.

तिचा हा एकवीस वर्षांचा मुलगा गळ्याभोंवतीं रंगीबेरंगी रुमाल बांधून वावड्या उडवीत होता नि पैशाची अडचण येतांच अडून-रडून आईजवळून मागून घेत होता.

त्या दिवशीं आकाश अगदीं निळं होतं. मधूनच एकादा पांढरा स्वच्छ ढग दिसत होता. वाऱ्याची मंद झुळूक वहात होती. पतंग खेळायला हवा फारच सुरेख होती. संध्याकाळपर्यंत त्यानं खूप पतंग उडविला. पुष्कळसे पतंग काटले. इतक्यांत त्याची धाकटी बहिण घाबऱ्या घाबऱ्या धांवत तिथं आली. त्याचा [illegible] ओढीत ती म्हणाली,—

" दादा ! लवकर घरीं चल. आई पहा कशी करते आहे रे ! "–तिचं बोलणं त्यानं ऐकलं पण आपल्या नादांतच तो म्हणाला,—

' जा ! मी येतो. '

पण त्याची बहीण त्याला अधिकच ओढूं लागली. तेव्हां तिला लोटून तो ओरडला,—

" चल हट ! घरीं चालती हो. "

हिरमुसलं तोंड करून बहिण गेली. पतंग गावरीत असतां तो मनांत म्हणत होता–आईचं तें नेहमींचंच आहे. छातींत कळ यायची–घाबरायचं–नि सगळीं पोरंबाळं शेवटचा निरोप घेण्यासाठीं भोंवतालीं गोळा करायची ! नि मग पुन्हां जिवंत होऊन कामाला लागायच !

तासाभरानं त्यानं पतंग खालीं उतरवला. थकवा घालवण्यासाठीं हॉटेलांत चहा घेतला. जुगाराच्या अड्ड्यावर अमुक वाजतां येतो, म्हणून दोस्ताला खूण केली. मग तो घराकडं वळला. वाटेमधें एका घराच्या दारांत एक मुलगी उभी असे, तिच्याकडं पाहून त्यानं डोळे मिचकावले–शीळ घातली–ती पोरगी हंसली तेव्हां अगदीं खूष होऊन तो आपल्या घराकडे निघून गेला.

त्यानं घरांत पाऊल ठेवलं नाहीं तोंच एकदम बहिणीनं येऊन त्याला मिठी मारली. मोठ्यानं हुंदके देत ती म्हणाली,–" दादा ! आई बोलतसुद्धां नाहीं रे ! "—

तो दचकला. बहिणीला उचलून घेत तो आईजवळ आला. आईचा चेहरा काळा पडला होता. ओठ उघडे नि निर्जीव झाले होते. मान बाजूला कलली होती. हात बाजूला लोंबकळत होते.

तो खाली वांकला.

आईचा प्राण गेल्याचं त्याच्या लक्षांत आलं. आपल्या हातून घडलेला भयंकर अपराधही त्याच्या लक्षांत आला. तो उनाड मुलगा होता पण त्याचं हृदय नि मन सरळ होतं. त्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. आईच्या छातीवर डोकं टेकून तो लहान मुलांप्रमाणं रडूं लागला. डोळ्यांतल्या अश्रूमधून त्यानं आईच्या तोंडाकडे पाहिलं. पूर्वी कधीं न दिसलेल्या गोष्टी त्याला दिसूं लागल्या तिच्या डोळ्याभोंवतीं काळीं वर्तुळं झालीं होती. कातडी फिकी पडली होती.—

केस पिकले होते. हातपाय काडीसारखे दिसत होते. याच हातपायावर बारा तास गिरणींत धडपडून तिनं त्या सर्वांना जिवंत ठेवलं होतं.

जसजसे असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले तसतसं आपलं दुःख त्याला आवरेनासं झालं. तो हुंदके दे–देऊन रडूं लागला. भावाला रडतांना पाहून बहिणीनं हंबरडा फोडला नि भावाच्या अंगावर अंग टाकून ती रडूं लागली.

कांहीं वेळानं शोक आवरल्यावर तो उठला. वहिणीला मांडीवर घेऊन त्यानं तिचे डोळे पुसले. हुंदके देत बहिण म्हणाली,—

" दादा ! आईला बोलायला सांग ना रे ! आईनं तुझी किती वाट पाहिली रे ! तूं आलास तरी ती बोलत नाहीं. तिनं तुझ्यासाठीं कांहींतरी कागदावर लिहून ठेवलंय बघ. "

आईच्या मुठींत असलेला कागद त्याला दिसला. कागद काढून घेऊन त्यानं वाचला. आईनं लिहलं होतं,

" बाळ ! स्वत:ला विसर–म्हणजे सुखी होशील. "

त्यानं तिथंच निश्चय केला कीं, आईनं सांगितलंय तसंच करायचं.

पण आईनं लिहिलेलं पुन्हा पुन्हा वाचून पहात असता त्याला प्रश्न पडला–स्वत:ला विसरायचं खरं ! पण काय करतांना स्वत:ला विसरायचं ? कुणाकरतां स्वत:ला विसरायचं ? आणि कां ?

आपण पतंग उडवले–जुगार खेळलों–तेव्हां तेव्हां आपण स्वत:ला विसरतच होतों. त्या नादांत दिवसच काय पण एकवीस वर्षे नकळत गेलीं. आईनं कांहीं त्या नादांत स्वत:ला विसरायला सांगितलं नाहीं ! मग कशांत विसरायचं स्वत:ला ?

असंच असलं पाहिजे. एकवीस वर्षे आपण उनाडलों. मवाली म्हणून लोकांकडून दूषणं घेतलीं. एक पैसा कधीं कमावला नाहीं. आईला त्याचं किती तरी दुःख झालं असेल. कामधंदा करून स्वत:ला विसर, असंच तिचं सांगणं असावं.

मग ! उठूं या ! कुठं तरी कामधंदा पाहूं या.

गिरणीतला एक जॉबर ओळखीचा होता. त्याच्याकडे जाऊन त्यानं नोकरी मागितली. जॉबर या मुलाला ओळखून होता. हंसत त्यानं म्हटलं,—

" तूं नोकरी केलीस, मग पतंग कोण उडवील ? "

" नाहीं साहेब ! मी सोडलं तें सगळं. आई वारली माझी. "

जॉबरला वाईट वाटलं. तो म्हणाला, " गिरणींत ये ! कामाला लावीन, मनापासून काम कर. "

तो गिरणींत नोकरीला लागला. मनापासून काम करण्याचा त्यानं निश्चय केला होता. सर्वांशीं गोड बोलून आपलं काम स्वतःला विसरून तो करूं लागला.

घरांत पैसे येऊं लागले. धाकट्या भावंडांना त्यानं शाळेंत घातलं. त्यांना चांगले चांगले कपडे घेतले. आईचा फोटो मोठा करून घेऊन त्यानं त्याला हार घालायला सुरुवात केली. मोवतालचे लोक म्हणूं लागले—मुलगा निवळला हं—मार्गावर आला. आज आई असती तर..

गिरणीमधें तो मनापासून काम करीत होता नि दुसऱ्यांचीं करून देत होता. खालच्या माणसाला त्रास देत नव्हता नि वरिष्ठाला खूष करीत होता. असं वर्ष गेलं. वर्षानंतर बढतीची वेळ आली, तेव्हां नेमका तोच वगळला गेला. ज्यांनीं पैसे चारले त्यांना बढती मिळाली. ज्यानं ताडी पाजली, त्याला बढती मिळाली —! तो होता तिथंच काम करीत राहिला.

संतापानं तो जळूं लागला. इतकी मेहनत घेतली—आपलीं कामं चोख केलीं—दुसऱ्यांची करून दिलीं. शेवटीं काय झालं ? छे ! नोकरी सोडावीच ही !

इतक्यांत आईनं लिहिलेलं वाक्य आठवलं. स्वतःला विसर म्हणजे सुखी होशील. नोकरी करण्यांत स्वतःला विसरायला आईनं सांगितलं असेल ? छे: ! छे: ! जिथं लांच आहे—जिथं अनीति आहे—तिथं आई स्वतःला विसरायला कसं सांगेल ? आईच्या मनांत कांहीं वेगळंच असलं पाहिजे. काय बरं असेल तिच्या मनांत ? कुणासाठीं मी स्वतःला विसरायचं ?

कुणासाठीं म्हणतांच त्याला सारं आठवूं लागलं. आईच्या मनांत आपण लग्न करावं, असं फार होतं. बायकोवर प्रेम करावं, संसार करतांना स्वतःला विसरावं, असंच आईच्या मनांत असावं. त्याला आपले वडील आठवले. मग तर त्याचं मन नक्की झालं. वडिलांनी कामधंदा फारसा केलाच नाहीं. ते दारू प्याले. त्यांनी आकडे लावले. आईला मारून तिनं कमावलेले पैसे उधळले. तो स्वतःशीं म्हणाला,—

छेः ! माझ्या बायकोवर मी प्रेम करीन. तिला थोडसंसुद्धां दु:ख देणार नाही. तिला कामधंद्यास लावणार नाही. मी दु:ख भोगीन तिला सुख देइन. आई ! शपथ घेऊन मांगतों की आमच्या संसारांत मी स्वत:ला विसरेन.

लग्न करायचं ? पण कोणत्या मुलीबरोबर ? दारांत उभं राहून आपल्याकडं हंसणारी मुलगी त्याच्या डोळयापुढें आली. तिलाच लग्नाबद्दल विचारायचं त्यानं ठरवलं.

ती पाण्याला गेली असतां त्यानं तिला गाठलं नि विचारलं,—

" ओळखलंस "— ?

ती मुलगी त्याच्यावर रुसलीच होती. घुश्शांत ती म्हणाली,—

" मला काय विचारतां ? एका माणसाला विचारा. "

तिचा राग त्याच्या लक्षांत आला. पण त्याला कांहीं उत्तर देतां आलं नाही.

पूर्वीचा आपला बोलकेपणा कुठं गेला, याचं त्याला आश्चर्य वाटलं. त्याला मुका पाहून ती म्हणाली,—

" हल्लीं दिसत नाहीं तुम्ही ? "

" नोकरीला असतो. "

तिचे डोळे आनंदानें फुलले. तिनं म्हटलं,—

" खरंच ! "

तिच्या डोळ्यांत पहात तो म्हणाला, " खरंच म्हणजे ? "

तिनं मान खालीं घालीत म्हटलं,—

" कांहीं नाही. "

जरा वेळ काय नि कसं बोलावं त्याला सुचलं नाही. मग एकदम त्यानं विचारलं,—

" माझी बायको होशील ? "

खालच्याच मानेनं तिनं एक कटाक्ष त्याच्याकडं फेंकला नि ती म्हणाली,

" कांहीं तरीच. "

मग एकदम पाठ फिरवून ती घराकडं चालूं लागली. तिच्या कमरेवर भरलेली घागर तिच्या चालण्याच्या घाईत ओसंडत होती. तिचं तें चालणं—तिच्याशीं झालेलं बोलणं—सारं पुन्हा पुन्हा आठवीत तो अतिशय आनंदात घरीं आला.

लौकरच त्याचं लग्न झालं. नंतर दिवसांमागून दिवस जाऊं लागले पण त्याचं प्रेम कमी न होतां वाढतच गेलं. कामावरून घराकडे येतांना कुठं क्षण मोडणं त्याच्या जीवावर येई. काम तो इतक्या तत्परतेनं नि ओढीनं उरकून टाकी कीं आपल्या मित्राच्या थट्टेचा तो विषय होऊन बसला. बायकोला त्यानं उंची कपडे आणावे, नवे दागिने करावे, सिनेमाला घेऊन जावं, फिरायला न्यावं. त्याचं बायकोशी वागणं पाहून भोंवतालच्या बायका तिचा हेवा करूं लागल्या नि आपल्या नवऱ्यांना टोंचून बोलूं लागल्या.

अशीं दोन वर्षे गेलीं. त्यांना मूलबाळ कांहीं झालं नाहीं. त्याची बायको आतां कांहींशी स्थूल झाली. तिचं शरीर सुटलं. त्यामुळें तिच्यांतली पूर्वीची चपळाई उरली नाहीं. त्याबरोबर तिचा स्वभाव बदलला. आपल्या दिरांना आणि नणंदेला ती भावाबहिणींप्रमाणं करीत होती. पण आळस अंगांत आल्यावर ती बसून त्यांना कामं सांगूं लागली. आपण बसावं नि नणंदेकडून स्वयंपाक करून घ्यावा. आपण बसावं नि दिराकडून नवऱ्याचीं कामं करून घ्यावीं. आपलीं कामं त्यांनीं केलीच पाहिजेत, असं तिला हक्कानं वाटूं लागलं. कारण तिचा नवरा पैसे मिळवीत होता.

त्याचीं भावंडं गरीबपणानं सांगितलेलं सारं करीत—तिचं बोलणं सहन करीत. पण मोठ्या भावाजवळ त्यांनीं कधीं तक्रार केली नाहीं. रडूं आलं तर बाजूला जाऊन रडावं नि डोळे पुसून हसऱ्या चेहऱ्यानं भावासमोर यावं, असंच तीं करीत.

पण आपल्या धाकट्या भावडाचं दुःख त्याला कळत होतं. एक दिवस धाकट्या भावाला त्यानं रडतांना पाहिलं. त्यानं विचारलं,—

" काय झालं रे ? "

भाऊ म्हणाला " कांहीं नाहीं—तूं जा ! "

त्यानं त्यानंतर घरांत जास्त लक्ष दिलं. बायकोची वागणूक पाहिली. त्याला फार वाईट वाटलं. घर प्रेमावर उभं असतं. एकदा कां एकजण दुसऱ्याचा द्वेष करूं लागला—दुसऱ्यावर अन्यायानं सत्ता गाजवूं लागला—हट्ट करूं लागला—दुसऱ्यां-कडून कामं घेऊं लागला—कीं तिथं भांडणं आणि अश्रु येण्यास वेळ लागत नाहीं.

त्यानं बायकोला समजावून पाहिलं. पण तिच्या डोक्यांत कांहीं वेगळ्याच गोष्टी खेळत होत्या. त्याच्या समजावून सांगण्यामुळं बायको पण त्याच्यावर नाखूष झाली नि त्याच्याशी मनमोकळेपणं बोलण्याचं तिनं सोडून दिलं.

तो अतिशय कष्टी झाला. आईचं वाक्य त्याला पुन: आठवलं. स्वत:ला विसर म्हणजे सुखी होशील. लग्न केलं–बायकोवर जीवापाड प्रेम केलं–संसारासाठीं कष्टांकडे पाहिलं नाहीं. नि आज हें काय झालं ? आईच्या मनांत असंच असेल कां ? छे: ! आईला स्त्रियांचा स्वभाव ठाऊक असणारच. बायकोच्या सुखांत स्वत:ला विसर असं ती सांगायची नाहीं. तिला काय बरं सांगायचं असेल ?

त्याच वेळेस त्याची बायको गर्भार राहिली. तिला ओकाऱ्या होऊं लागल्या. डोहाळे सुरू झाले. पण तसतसा तिचा स्वभाव जास्त बिघडत चालला. ती आतां दिवसरात्र निजून राहूं लागली. तो कामावरून दमून आला कीं नणंद–दिराच्या कागाळ्या सांगूं लागली. स्वत:च्या तब्येतीबद्दल त्याला त्रास देऊं लागली. नि दुसऱ्याला तापदायक वाटेल इतकी स्वत:ची काळजी घेऊं लागली.

तिला नऊ महिने भरले. शहरांतल्या चांगल्या सूतिकागृहांत त्यानं तिला ठेवलं. दोन दिवस रजा घेऊन तो तिला हवें नको तें पहायला लागला.

एक दिवस तिच्या पोटांत कळा सुरू झाल्या. तो सूतिकागृहांत बसला होता. होणाऱ्या वेदनांनीं ती किंचाळत होती. त्या ऐकूनच त्याचा चेहरा मलूल झाला.

प्रसूति झाली. मूल मेलेलं निघालं. तो तिला भेटायला आंत गेला. पांढऱ्या कापडांत ती निर्जीव होऊन पडली होती. तिच्या डोळ्यांभोंवतीं मोठालीं काळीं वर्तुळं उमटलीं होतीं. ओठ सुकलेले दिसत होते. पलंगावर बसून त्यानं तिच्या केसावरून हात फिरवीत विचारलं,

" बरं वाटतयं ना ? "

पण त्याच्या हाताचा स्पर्श होतांच ती जोरजोरानें रडूं लागली, त्याचा हात हातांत घेऊन डोळ्यांतील पाणी ती पुसूं लागली. तिचं तोंड कुरवाळीत तो म्हणाला,

" उगीं उगी ! देवाचं होतं तें देवानं नेलं. "

तो तसं म्हणाला, पण तिचं समाधान झालं नाहीं. बाळंतपणानं तिला खाऊन टाकलं होतंच. त्यांत हें दु:ख आलं. सूतिकागृहांतून क्षयी बनूनच ती घरीं आली. तिनं घरांत येऊन गादीवर जें अंग टाकलं, तें पुन्हां वर उचललं नाहीं दोन महिन्यांत सारा खेळ संपला.

तिच्या मरणानं तो अतिशय कष्टी झाला. त्याच्या वागणुकींत वैराग्य वाढूं लागलं. पूर्वीसारखं हसणं त्यानं सोडलं. मजा करणं सोडलं.

बरेच दिवस तो कामावर गेला नाहीं. त्याच्या मित्रांनीं त्याला कसा तरी घराबाहेर काढला. गिरणींत आणला. सुरवातीस त्याचं काम त्या सर्वांनीं मिळून केलं. कामानंतर आळीपाळीनं त्याला सिनेमाला नेलं. आपल्या घरीं जेवायला नेलं. त्याच्या भावंडांची काळजी वाहिली.

मित्रांच्या या वागण्यानं त्याच्या मनावर फारच परिणाम झाला. त्याला कळलं कीं, आईचं प्रेम—बायकोचं प्रेम जसं आपली काळजी घेतं—तसंच मित्राचं प्रेमही आपली काळजी घेतं. आपली दुःखं हलकीं करतं.

आतां तो आपलं काम आपण करूं लागला. त्यानं मित्रांमध्यें मिसळण्यास सुरवात केली. हळुंहळू त्याचा मित्रपरिवार वाढूं लागला. त्याचा स्वभाव सरळ होता. बोलणं गोड होतं. जो तो त्याची मैत्री चाहूं लागला. अशा माणसाला मग जी संवय जडते, ती त्याला जडली. ज्याचं पडेल त्याचं काम तो करून देऊं लागला.

गिरणीतल्या लोकांत तो मोकळ्या मनाचा—समतोल—म्हणून गणला जाऊं लागला. त्या त्याच्या कीर्तीमुळंच एक दिवस एक मुलगी त्याच्याकडे आली. कामगार युनिअनचा बिल्ला तिनं पदरावर लावला होता. तिनं त्याला म्हटलं,—

"तुमचं नांव आम्हीं फार ऐकलं आहे. सगळ्या कामगारांना तुम्हीं आवडतां. कामगार तुम्हांला आवडतात. कामगारांचीं कांहीं कामं तुम्हीं करून देतां. आम्हींही कामगारांचींच कामं करतों. तुम्हीं आमच्यांत येऊन काम करा. आम्हाला मोठी मदत होईल."

त्यानं विचारलं,—"तुम्ही काय करतां ?"

तिनें सांगितलें,—"आम्हीं कामगारांचं हित होईल, असं पहातों. एखाद्या कामगारावर अन्याय झाला, तर गिरणी मालकाशीं आम्हीं भांडतो त्यामुळं एखाद्या कामगाराला कारणाशिवाय कुणी काढूं शकत नाहीं. आम्ही कामगारांना त्यांच्या हक्कांची जाणीव करून देतों. त्यांच्या परिस्थितीची जाणीव देतों. त्यांच्या पुढच्या भवितव्याची ग्वाही देतों. त्यांना साक्षर करतो. मजूर म्हणून त्यांची

शक्ति वाढवितों अन् भांडवलदारांशीं झगडा करायला आम्हीं त्यांना जास्त बळकट करतों."

तिचं काम त्याला फार आवडलं. त्यानं विचारलं,–" मला काय करतां येईल ?"

" पुष्कळ पुष्कळ करतां येईल. तुम्ही आमच्या कामाची पद्धति शिका. मग आमची एक शाखाच तुमच्या ताब्यांत देऊं. तुमच्यासारखीं माणसं आम्हाला हवीं आहेत."

तो युनिअनमध्यें जाऊं लागला. तिथलं काम त्यानं समजावून घेतलंच. पण त्यांची तत्वंहि त्यानीं समजाऊन घेतलीं. आतांपर्यंत मनाशीं धरून ठेवलेल्या किती एक समजुती खोट्या ठरल्या. श्रीमंत गरीब देवानं उत्पन्न केले, असं तो नि त्याचे कामगार मित्र मानीत आले होते; तें तसं नाहीं, हें त्याला कळलं. गरिबी घालवण्याला उपाय नाहीं, असं त्याला वाटत होतं; पण तेंही खोटं ठरलं. पैसा कसा तयार होतो–तो एकाजवळ कसा सांठतो नि दुसरा कसा कंगाल होतो,- हें त्याला समजलं.

आपल्याला जें समजलं, तें तो आपल्या कामगार बंधूंना समजावून सांगूं लागला. आपण जें शिकला, तें तो त्यांना शिकवूं लागला नि ज्या मुलीनं त्याला हें शिकवलं तिला तो गुरू मानूं लागला.

त्यानंतर एकदां गिरणी मालकांत नि कामगारांत तेढ आली. संप सुरू झाला.

संपामुळं कामाचा बोजा पण वाढला. कामगारांत पत्रकं वाटणं, निरुत्साही होणाऱ्या कामगारांना प्रोत्साहन देणं, प्रसंगीं गिरण्यांपुढं निरोधन करणं; या कामांत त्याला क्षणाची फुरसत मिळेनाशी झाली.

एक दिवस बरेचसे कामगार पकडले गेले. त्यांत त्याची गुरू झालेली मुलगी पण पकडली गेली. तो तिला भेटायला गेला. त्यानंतर तिच्यावरच्या खटल्याचा निकाल लागेपर्यंत तो रोज तिच्यासाठीं जेवण, फळफळावळ—पुस्तकं घेऊन जाऊं लागला.

ती निर्दोष सुटली. पण तो पकडला गेला. आतां तिनं त्याच्या मदतीची सव्याज फेड करायचं ठरवलं. ती पण त्याला रोज भेटूं लागली—जेवण आणूं लागली–त्याला पुस्तकं नेऊन देऊं लागली.

दोन महिन्यानंतर तो तुरुंगांतून सुटला. त्याचे कामगार मित्र त्याला मिरवीत घेऊन गेले. मालक नि मजूर यांत तडजोड झाली होती. युनिअनचं काम पुनः सुरू झालं.

अशी भराभर वर्षं जाऊं लागली. एक गेलं, दुसरं वर्ष गेलं, पंधरा वर्षं गेली.

तो आतां चांगला नांवाजलेला कार्यकर्ता झाला होता. त्याचे केसही पांढरे झाले होते. ती मुलगी पण मोठी बायको झाली होती. तिच्या केसांतही पांढरा केस डोकावूं लागला होता. तो आणि ती यांच्यासारखे युनिअनचे जे कार्यकर्ते होते, त्यांचं आयुष्य म्हणजे यूनिअनचं आयुष्यं होतं. त्यांचं चरित्र म्हणजे यूनिअनचा इतिहास होता.

एक दिवस तीं दोघं बोलत असतां तो म्हणाला,—

" आजच वीस वर्षांपूर्वी आपली भेट झाली, आठवतंय ! "

त्याला आठवत होतं. त्याच्याहून तिला कितीतरी आठवत होतं. त्याचं जेलमध्यें जाणं, मजुरांची त्यानं सोडवलेली भांडण, निरुत्साही मजुरांना त्यानं दिलेला उत्साह.

त्यालासुद्धां कांहीं कमी गोष्टी आठवत नव्हत्या. तिनं आपल्याला नवीन मार्ग दाखवला. ती आपल्याला भेटली, म्हणून आपल्या आयुष्याला हे उदात्त वळण मिळालं त्यानं तिला गुरू केलं.

तो स्तुति करीत असतां ती झरकन् म्हणाली,–

" छे: ! छे: ! जें केलें, तें आपण दोघांनीं मिळून केलं. "

' दोघांनीं मिळून ' हा शब्द ऐकत असतां तो तिच्याकडेच पहात होता. पहातां पहातां एकदम त्याच्या मनांत आलं—वीस वर्षं आपण बरोबर काम केलं—आतां आपण लग्न केलं तर !

पण मनांत आलेला विचार योग्य आहे कीं अयोग्य आहे, हे त्याला ठरवतां येईना. त्यामुळं तो प्रश्न तिला विचारण्याचं धाडस त्याला होईना. अशा बावचळलेल्या मनःस्थितींत असतां त्याची नजर आपल्या आईच्या तसबिरीकडे गेली. झटकन् पुढें होऊन तो तसबिरीसमोर उभा राहिला नि नमस्कार करून त्यानं विचारलं,–" आई ! माझ्या मनांत आलेला विचार वाईट आहे का ग ? "

पण हें विचारीत असतांच आज वीस वर्षांनीं आईची आपल्याला आठवण झाली हें त्याच्या लक्षांत आलं. आईचं वचन वीस वर्षं आपण पार विसरून गेलों होतों हेंही त्याला आठवलं. आईनं सांगितलं होतं--बाळ, स्वत:ला विसर म्हणजे सुखी होशील. या कामकऱ्यांच्या कामांत स्वत:ला विसरायचं आपण विसरलों असं पाहून त्याला पश्चात्ताप झाला. त्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहू लागले. तो आईला म्हणाला,--

" आई ! क्षमा कर ! स्वत:ला विसरायचा मी पुन्हां एकदां प्रयत्न करून पहातों. "

पण आईकडं पहात असतां ती हळुहळु हंसत असल्याचं त्याच्या ध्यानांत आलं. तिचे ओंठ हलल्याचा भास झाला. मग तिचे शब्द ऐकूं आले,--

" बाळ, कष्टी होऊं नकोस ! माझ्या सांगण्याप्रमाणंच तूं वीस वर्षं वागला आहेस. स्वत:ला विसरायचं म्हणत होतास, तेव्हां स्वत:ला विसरतां आलं नाहीं. मग गरिबांच्या सेवेला लागलास नि स्वत:ला विसरलासच, पण स्वत:ला विसरायचं हें देखील विसरलास. माझं सांगणं पुरं केलं आहेस. आतां जरा स्वत:कडं पहा.--जरा मागं नजर टाक. "

त्यानं मागं नजर टाकली. वीस वर्षं त्याच्या बरोबर काम केलेली ती मुलगी हात जोडून डोळे मिटून उभी होती. त्यानं कौतुकानं तिच्याकडं पाहिलं. तिनं डोळे उघडले. तिच्या डोळ्यांत त्याला आपल्या आईचं तेज दिसलं. नि तिच्या हळू हंसण्यांत मित्राचं प्रेम दिसलं--पुढं होऊन तिचे हात धरीत त्यानं विचारलं--" माझी बायको होशील ? "



## तिची भीति !

लांब लांब सावल्या रस्त्यानं धावत होत्या. त्या इतक्या लांब होत्या कीं त्या ट्रामच्या आहेत, व्हिक्टोरियाच्या आहेत कीं माणसांच्या आहेत हें ओळखणं कठीण होतं.

सिनेमागृहाजवळ तिची वाट पहात तो उभा होता. अस्वस्थतेनं त्याची नजर फिरत होती. जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक वाहनांतून ती उतरेल असं त्याला वाटत असावं. ठरलेल्या वेळेवर काटा येतांच तो कमालीचा अस्वस्थ झाला.

एक मिनिट गेलं. नि तो संतापला. त्याला वाटलं जाणूनबुजून तिनं आपला अपमान केला, कबूल करून ती आली नाहीं. दुसऱ्या मिनिटाला त्याचा राग उतरला. त्याला वाटूं लागलं, कांहीं अडचण आली असेल म्हणूनच येतां आलं नसेल तिला. तिसरं मिनिट झालं नि तो निलज्ज बनला. त्यानं ठरवलं—पाहिजे तितका वेळ उभं रहायचं, तिला भेटायचंच.

चवथ्या मिनिटाला ती आली. क्षणभर तिच्याकडे तो पहातच राहिला. ती गोल पातळ चापचोपून नेसली होती.—कानांतले डूल मानेबरोबर डोलत होते नि डोळे हंसत होते.

तिचा हात धरल्यासारखा करून तो सिनेमागृहांत शिरला. आंतील हॉटेलांत उंच स्टुलावर बसून त्यांनीं आइस्क्रीम खाल्लं. त्यानं 'आणखी हवं का ?' विचारलं, तिनं नाहीं म्हटलं. मग त्यानं 'सिगारेट ओढूं का ?' विचारलं. तिनं मानेनं होकार दिला.

दोघं आंत येऊन बसली. सिगारेट ओडतां ओढतां तिनं नाक मुरडलं असं त्याला वाटलं त्यानं सिगरेट पायाखाली टाकली नि विझवली. तिनं विचारलं 'हें काय ?' तो म्हणाला 'कांहीं नाहीं.'

मग तो बोलला नाहीं नि ती पण बोलली नाहीं. लोक आंत येत होते. पडद्याआडून रेकार्ड वाजत होत्या. तो ताठ बसून पहात होता नि ऐकत होता.

चित्रपट चालू झाला. अंधारांत तिचा हात कधीं कधीं आपल्याकडे आल्या-सारखा त्याला वाटला. क्वचित् तिच्या हाताला लागलेला आपला हात दचकून त्यानं मागेंही घेतला.

चित्रांत जास्त उजेड आला कीं तिचे डोळे लकाकत किंवा एखादा प्रसंग पाहून त्याचा अभिप्राय घेण्यासाठीं तिनं त्याच्याकडं पाहिलं कीं तिचे हंसरे ओठ दिसत. मग तोही स्मित करी. तो पुन्हा पडद्याकडे पाहूं लागे नि ती पण. मधल्या विश्रांतींत तीं दोघं बाहेर न जातां आंतच बसून राहिलीं. तिनं नटीविषयीं कांहींतरी म्हटलं. तो कथानकाविषयीं कांहीं तरी म्हणाला. पुन्हा चित्रपट सुरू झाला.

चित्रपट संपतांच दोघं बाहेर आलीं. रस्त्यावर येतांच ती म्हणाली.

'थंडी आहे, नाहीं ?'

त्यानं इकडं तिकडं पाहिलं. मग तो म्हणाला.

'चल चहा घेऊं तिथं.'

चहा घेऊन दोघं हॉटेलबाहेर आलीं. थोडीं पावलं चालल्यावर ती म्हणाली.

'मघा मला थंडी वाजत नव्हती.'

'मग ?'

'भीति वाटत होती.'

'भीति !!'

'हं ! खरंच भीति वाटत होती.'

'कसली ?'

'कसली कुणास ठाऊक ?'

'कसली सांग ना.'

'कसली नाहीं.'

कांहींशा काकुळतीनं तो म्हणाला.

'हें काय बरं?'

किंचित् वेळानं ती म्हणाली.

'आपली कालच ओळख झाली नि आपण आज सिनेमाला आलों—

'कुणि पाहिल याची भीति वाटली?'

'अंह. आमचं कुणीच इकडे रहात नाहीं. तुम्ही काय करितां?'

'नोकरी.'

'कुठं?'

'सेल्समन होतों एका जर्मन फर्ममध्यें.'

'आतां?'

'हल्लीं बेकार.'

'शिल्लक टाकली असेल पुष्कळ.'

तो हंसला तिनं विचारलं—

'कां हसलांत?'

'तुला कसली भीति वाटते तें ओळखलं.'

'कसली?'

'मी मिळवता आहे कीं नाहीं याची! नाहीतर माझ्याबरोबर हिंडून—ओळख वाढून लोकं कुजबुजायला लागलीं कीं'

ती कांहींच बोलली नाहीं. त्याला वाटलं, आपण कांहीं तरीच बोललों. त्यानं विषय बदलून म्हटलं—

'तूं शिकतेस हल्लीं?'

'होय. शाळेंत जातें.'

'कितवींत?'

'सहावींत.'

'मग कॉलेजांत जाणार असशील.'

'मॅट्रीक तर पास होऊं द्या.'

'अं—त्याचं काय—-"

'म्हटलं—तितकं सोपं नव्हे तें. मला भावंड किती आहेत, ठाऊक आहे ?'

'किती ?'

'पांच. तीन बहिणी—दोन भाऊ. तो सुद्धां सर्वांत लहान. कसंबसं चालतं आमचं.'

'त्या आठवणीनं तर तुला भीति वाटली नाहीं ना ?'

'त्यांत भीति कसली ?

'तुम्ही पांच भावंडं—तूं—-'

एकदम तो गप्प राहिला. त्याला गप्प झालेला पाहून तिला वाटलं, आपण गरिबींतील आहों नि आपल्याला भावंडं आहेत, हे त्याला आवडलं नाहीं. मग तिला वाटलं त्याला वाटतंय तेंच बरोबर आहे. माझ्याबरोबर हिंडून मी गळ्यांत पडलें की भावंडं आलींच.

जिकडे तिकडे दाट काळोख होता. मोटरी मोठमोठे आवाज करीत हत्तीप्रमाणं पुढें सरकत होत्या. मधूनच ब्रेकस् लावल्याचा कर्कश आवाज येत होता. भुताप्रमाणं एखादा पांढरट पोशाख जवळून जात होता.

ती म्हणाली.

'काय काळोख हा !'

त्यानं विचारलं.

'काळोखाची भीति वाटली.'

'छे ! रोजचाच आहे हा.'

एकदम तिनं विचारलं.

'काय हो ! या लढाइचं काय होणार ?'

'लढाईची भीति वाटते वाटतं ?'

'भीतिचं वेड लागलय तुम्हांला.'

पुन्हा दोघं गप्प झाली. किंचित् वेळानं तिनं म्हटलं.

'मला कधीं कधी वाटतं, अगदीं असंच उभ्या उभ्या मरून जावं.'

'का बुवा ?'

'सांगतां येत नाहीं.'

'अगदी विचित्र मुलगी आहेस.'

'माझं बोलणं आवडलं नाहीं तुम्हांला ?'

'छे ! छे ! तसं नाहीं.'

गाल फुगवून तिनं म्हटलं.—

'नॉहींच ऑवडलं तुम्हांला.'

'भांडणार वाटतं ?'

'हं ऽ ऽ'

'भांडलों तर काहींच हरकत नाहीं. पुन्हा आपण भेटणार, असं थोडंच आहे.'

'हं.'

'पुन्हा भेट होणार नाहीं म्हणून तर भ्यायली नाहींस ना मघाशीं.'

'छे ! कल्पनासुद्धां नव्हतीं मनांत.'

त्याची पावलं जड पडूं लागली. तो म्हणाला.

'माझं काय होणार हें सुद्धां मला कळत नाहीं.'

'कां ?'

'नोकरी नाहीं.

'बरं मग ?'

'स्वतःचं घर नाहीं. शेती भाती नाहीं. कुणावर अवलंबून रहावं असं वडील माणूसही नाहीं.'

ती हसूं लागली.

'कां हंसतेस ?'

'स्वतःचा सगळा इतिहास सांगितलात कीं-नि काल आपली नीटशी ओळख सुद्धां नव्हती, नि उद्यां भेटही होणार नाहीं.'

ती अधिकच हसूं लागली. तोहि हंसला. नि म्हणाला—

'मी फार बडबडतों नाहीं ?'

'अं हं.'

'मग ?'

'कांहीं नाहीं'

त्यांचा रस्ता चौपाटीच्या रस्त्याशीं मिळाला. समुद्रावरचा वारा एकदम् तोंडावर घुसला. तिंनं पदर सावरला. केस सावरले. त्यानं कॉलर वर केली.

पलीकडे अंधुकशा उजेडांत स्टेशन दिसत होतें. एखादं लबाड कोल्हं लपून बसावं तसं तें वाटत होतं, ती म्हणाली.—

' स्टेशन आलं ? '

त्यानं विचारलं

' पुन्हां केव्हां भेटशील ? '

' तुम्ही म्हणाल तेव्हां. '

तिचं उत्तर वस्तादपणाचं होतं. निदान त्याला तसं वाटलं. आपल्या तोंडून आपल्या मनांतलं तिला काढायचं आहे. त्यांनंही तसंच उत्तर दिलं.

' मी बेकारच आहे. तू म्हणशील तेव्हां. '

एकमेकांचीं लबाडी ओळखून दोघंजणं हंसूं लागलीं. हंसूं थांबतांच दोघंही गंभीर झालीं. ती म्हणाली—

' आपण टाळतों आहोंत एकमेकाला. '

' अं हं ! प्रयत्न करीत आहोंत. '

' नाहींतरी टाळलंच पाहिजे. '

' हं. '

' आपण भेटायचं नाहीं आतां. '

' बरं. '

' पहिली नि शेवटची भेट. '

' होय. भेटून तरी काय उपयोग ? माझी ही अशी स्थिती. '

' छे ! छे ! दोष माझा—आमची गरीबी. '

तो कांहींसा हसून म्हणाला.

' मुलींच्या गरीबीचं काय मोठसं ? '

ती म्हणाली,

' नि मुलांच्या तरी काय ? '

तो म्हणाला,

' संसाराला लागलं कीं—

ती हळूंच म्हणाली,

' मुलांवर जबाबदारी पडते असच ना ? '

तो म्हणाला,

' होय. '

तिनं झटकन् म्हटलं—

' मला पुष्कळ कामं येतात. मी शिकवण्या करितें. '

बोलण्याच्या ओघांत त्यानं ' अं—ह ' केलं.

त्यानं ' अ—हं ' करितांच तिनं मान खालीं घातली. स्वत: लग्नाला तयार असल्याचं आपण सांगितल. स्वत:कडं आपण कमीपणा घेतला. आपला अपमान आपणच केला. सारं तिच्या झटकन् लक्षांत आलं. अपमानाच्या या जाणिवेनं तिची मान अधिकच खालीं गेली. घशाशीं हुंदके दाटून आले. ते बाहेर पडूं नयेत म्हणून तिनं पदराचा बोळा तोंडांत कोंबला.

आपल्या ' अं हं ' मुळें झालेला अनर्थ त्याच्या लक्षांत आला. क्षणभर काय केलं पाहिजे हें त्याला सुचलं नाहीं.

मग त्यानं दोन पावलं टाकलीं नि तिच्यापुढं तो उभा राहिला. तिचे तोंडावरचे हात काढून त्यानं आपल्या खांद्यावर घेतले. मग आपले हात तिच्या कमरेभोंवतीं घालून त्यानं तिला जवळ ओढली नि तिच्या ओंठावर आवेगानं आपले ओठ टेकले.

प्रथम तिचे हुंदके वाढले. मग कमी झाले. किंचित वेळानं ती म्हणाली.

' मला कसली भीति वाटत होती सांगू ? '

त्यानं पुन्हा तिचं चुंबन घेत म्हटलं

' सांग पाहूं. '

' तुम्ही असं कांहीं कराल, याचीच. '



# माणसाला किती पैसा लागतो ?

गांवाच्या सीमेवर एक शंकराचं देऊळ होतं. त्या देवळासमोर येतांच शिवा पायांतील वहाणा बाजूला करी नि हात जोडून म्हणे,—

"देवबाप्पा ! माणगांवचा शिवा घाटगा तुला साद घालतो आहे. तो कांहीं फार मागत नाहीं. त्याला रोजगार मिळवून दे ! देवबाप्पा ! एवढं मागणं दे !"

रोज रोज शिवा रोजगार मागत होता. पण देवबाप्पा मात्र त्याला रोजगार देत नव्हता. अशीं कैक वर्षं गेली तरी शिवाच्या पाठची पोटाची काळजी सुटली नाहीं. बिचाऱ्याजवळून सावकार फुकट काम करवून घेई नि शेजारी गोड गोड बोलून त्याला जेवणावारी राबवीत. माणसाच्या सहन करण्यालासुद्धां सीमा असते. हळूहळू शिवाचा स्वभाव चिडखोर झाला. कमाईतलं जें थोडंफार शिल्लक राही तें तो ताडीमाडींत खर्च करूं लागला. ताडीनं बेहोष होऊन झिंगत झिंगत घरीं येऊन स्वारी मारहाण करूं लागली. लोक म्हणूं लागले,—शिवा आयुष्यांतून उठला, फुकट गेला.

एके दिवशीं एक कुडमुड्या ज्योतिषी शिवाच्या गांवांत आला. आपलं भविष्य जाणून घ्यायला कोण उत्सुक नसतं ? गांवांतले लोक ज्योतिषाभोंवतीं जमा झाले,—ज्योतिषानं पाटलाचा हात पाहिला,— पाटलिणीचा पाहिला. गांवांतील सुखवस्तू शेतकऱ्यांचे हात पाहिले. शिवा तिथंच रेंगाळत उभा होता. गरीबाची थट्टा करण्याची संधी कुणी वाया घालवीत नाहीं. कुणीतरी शिवाचा हात ज्योतिषापुढं धरून म्हटलं,—

"ज्योतिषबाबा ! आमच्या गांवांतला हा राजा माणूस आहे. याचा हात पहा ना !"

ज्योतिषबुवानं शिवाचा हात हातीं घेतला. निरखून पाहिला नि म्हटलं,—

"हा हात फार भाग्यवान् आहे. लाखों माणसांना हा पोटाला लावील. लाखों माणसांचा दुवा घेईल."

ज्योतिषाचं बोलणं ऐकून सारे गांवकरी हंसूं लागले, सर्वांना ती थट्टाच वाटली. ज्या माणसानं स्वतःचं शेतभुईं कधी मनापासून कसलं नाहीं, तो लाखों माणसांना पोटाला लावणार ! !

एखादी लहानशी गोष्ट घडते नि आपलं आयुष्य उलटं पालटं करून जाते. ज्योतिषाचं भविष्य ऐकल्यापासून शिवा बेचैन झाला. ज्योतिषानं सांगितलेलं खरं ठरणार असं त्याला निश्चित वाटूं लागलं. बायको पोरं नि गांवकरी यांजवर तो अधिकाधिक चिडूं लागला. त्या सर्वांनीच आपल्याला इथं डांबून ठेवलं अशी त्याची ठाम समजूत झाली. डोक्यांत राख घालून सर्वांना तो शिव्या देऊं लागला. मग एके दिवशीं आपलं घर सोडून तो पळून गेला.

पंचक्रोशीच्या बाहेर येईपर्यंत तो थांबला नाहीं. भोंवतालचीं माणसं नि प्रदेश नवखा नवखा वाटूं लागतांच वाटेंत एका गांवी त्यानं मुक्काम केला.

या गांवांत घरोघर हातमाग होते. लोक शेती करीत, हातमागावर कापड विणीत नि सुखांत रहात. स्वतः पुरतं कापड प्रत्येक घरट्यांत निघे नि जास्त राहिलेंच तर विकायला जाई.

शिवा जेव्हां गांवांत शिरला तेव्हां हिंवतापाची जोराची साथ गांवांत पसरली होती. सारं गांव उदास वाटत होतं. घरटीं एखाददुसरं माणूस उभं होतं नव्हतं. सूत ताणून ठेवलेले माग तसेंच पडले होते. माणसांचा तुटवडा होता.

शिवा भुकेनं नि तहानेनं व्याकुळ झाला होता. एका घरासमोर येऊन त्यानं पाणी मागितलं. घरवाल्यानं पाणी घालतां घालतां कोण कुठला वगैरे चौकशी केली. पोटापाण्यासाठी शिवा बाहेर पडला आहे, असें समजतांच शिवाला त्यानं ठेवून घेतलं. त्याला खायला प्यायला दिलं नि विश्रांती घ्यायला सांगितली. शिवाचं आगणं देवानं पंरं केलं शिवाला रोजगार मिळाला

शिवाच्या मालकाच्या घरीं दोन हातमाग होते. मनासारखं काम मिळालं कीं मनापासून होतं. आळशी ठरलेला शिवा वाघासारखं काम करूं लागला. वर्षाच्या शेवटीं हातमागावरचीं सारीं कामं त्याला येऊं लागलीं.

पण कामांत हुषार झाल्यावर शिवाच्या मनाचं समाधान गेलं. त्याला वाटूं लागलं,– ' काम चांगलं शिकलों. पण उपयोग काय ? दुसऱ्याकडे आयुष्यभर खपायचं ! स्वत:चा जर एखाददुसरा माग असता तर ? '—

शिवाच्या हुषारीवर शिवाचा मालक खूष होता.—मालकाला लग्नाची एक मुलगी होती. ती शिवाकडे वेगळ्या नजरेनं पाहूं लागली होती. शिवाचं शरीर चांगलं कमावलेलं होतं. तो मागावर काम करूं लागला कीं त्याच्या दंडाचे स्नायू हलत नि आकर्षक दिसत. हातांतलं काम थांबवून ती पोरगी त्याच्याकडे तासन्‌तास पहात बसे.

शिवाचंही मन त्या मुलीवर जडूं लागलं. आईनंतर तिनंच घर संभाळलं होतं. तिला मागावरचं कामहि येत होतं. तिचा स्वभाव सरळ नि गोड होता. शिवाला ती आवडूं लागली. आवडत्या माणसाची नजर आपणावर आहे, एवढं कळलं तरी तरुण माणसाला उत्साह येतो. ती भोवतालीं असलीं कीं शिवा उत्साहानं काम करी. सकाळीं देवाला नमस्कार करतांना तो म्हणे,—' देवबाप्पा ! या मुलीशीं माझं लग्न होऊं दे. मीं घरचा कर्ता झालों कीं सर्वांना सुखांत ठेवीन. उत्तम उत्तम कापड करून शहरांत देईन. देवा ! एवढं मागणं दे. —'

ज्या देवानं शिवाला रोजगार दिला, त्याच देवानं शिवाचं हेंहीं मागणं दिलं. एके दिवशीं तिचा बाप बाजाराला गेला होता. तो तिच्याजवळ गेला. हंसतलाजत त्याच्याकडे पाहून तिनं मान खालीं घातली. तिचा तो मुग्धभाव पाहून शिवा अगदीं वेडा झाला. हळूंच तिच्या शेजारी तो बसला, आपल्या हातांतील पंचधातूची अंगठी त्यानं बाहेर काढली. तिच्या बोटांत घातली नि म्हणाला,

' लाडके ! तूं माझी झाली आहेस. या अंगठीच्या साक्षीनें तूं माझी आहेस. '

दुसरें, दिवशीं शिवानं तिच्या बापाला विचारलं. बापानें संमति दिली. लौकरच दोघांचं लग्न लागलं —शिवाचा सासरा आतां म्हातारा झाला होता आंथरुणावर

घर टाकून तो देवभजनास लागला. अशा रीतीनं शिवा कुटुंबाचा पालक झाला. चार भाग त्याचे स्वत:चे झाले.

मनाजोगता जोडीदार मिळायला भाग्य लागतं. शिवाचे दिवस आनंदांत जाऊं लागले. तो नि त्याची बायको मिळूनमिसळून काम करीत. काम करतां-करतां दोघं सुखदु:खाच्या गोष्टी बोलत. संध्याकाळ झाली की शिवा तयार झालेली लुगडी खांद्यावर टाकून गुजरी करण्यास पेठेंत जाई. किफायतशीर धंदा करून तो घरीं येई तेव्हां बायको हंसतमुख दरवाजांत उभी असे. दिवसाला नकळत महिना, नि महिन्याला नकळत वर्षे गेली.

त्यानंतर एक वर्ष असं गेलं कीं, त्या वर्षी पाऊसच पडला नाहीं. अवर्षणानं पिकं जळून गेलीं. भयंकर दुष्काळाचीं चिन्हं दिसूं लागलीं. लोक आपापलीं खेडीं सोडून अन्नपाण्यासाठीं दुसऱ्या खेड्यांत भटकूं लागले. शिवाची परिस्थिती बरी असल्यानं त्यानं थोडसं धान्य गांठवून ठेवलं होतं. संकट आलं कीं नातीगोतीं आठवूं लागतात. शिवाच्या बायकोचे कधीं न ऐकलेले सगेसोयरे दाराशीं येऊं लागले नि म्हणूं लागले,—

' गोदूमाय ! तुझ्या लेकराला विसरलीस ? '

' शिवादा ( शिवादादा ), मी तुझा सालां नव्हं का ? '

पण गांवांतल्या लोकांना धान्य वांटून शिवाला उपाशी मरायचं नव्हतं. मन निष्ठुर करून तो सर्वांना घराबाहेर वळवूं लागला.

शिवाच्या बायकोचं हृदय हळवं होतं. आपले सगेसोयरे दाराशीं आलेले पाहून ती कळवळली. मग शिवाच्या हातापाया पडून रडत रडत म्हणाली,—

' माझ्या भावाला घरांत घ्या. माझ्या काकाला अन्न द्या, मी पाया पडते—'

तिच्या डोळ्यातल्या पाण्यापुढं शिवा विरघळला. त्यानं कांहीं नातलगांना घरांत आश्रय दिला.

आश्रयाला आलेले लोक पहिले कांहीं दिवस खाऊन पडून होते. ज्यांची मनं जिवंत आहेत, त्यांना मेलेलं अन्न कोणत्याहीं परिस्थितींत आवडत नाहीं. नातलग शिवाला म्हणूं लागले —' शिवादा ! आम्हाला काम दे आम्ही काम करूं. '

मग शिवानं त्यांना काम दिलं, कुणाला कांडी भरण्याचं काम दिलं,—कुणाला फणी भरायला सांगितली, कुणाला मागावर बसवलं.

काम वाटून घेतलं कीं थोड्या वेळांत नि पुष्कळ होतं. पूर्वी शिवा एकटाच सारीं कामं करीत होता. सूत तोच कांती आणि—कांडी तोच भरी—मागावर तोच बसे. त्यामुळं वेळ पुष्कळ जाऊन काम थोडं निघे. आतां सर्व मिळून खूप काम निघूं लागलं, दुष्काळ लवकरच संपला, पण त्या अवधींत इतकं कापड निघालं की तेवढं कापड काढायला शिवाला दोन वर्षं पुरलीं नसतीं.

पाऊस पडला. शिवाचे नातेवाईक आपापल्या घरीं गेले.

जवळ जें कापड तयार होतं तें घेऊन गांवच्या आठवड्याच्या बाजाराला शिवा जाऊं लागला. इतरांपेक्षां आपलं कापड त्याला खूप स्वस्त देतां आलं.

दुसऱ्या वर्षी शिवा बायकोला म्हणाला,—

'पहा! जास्त कापड निघालं तरी खपलं. आपल्याला दरवर्षी दहापंधरा माणसं कामावर ठेवायला कांहींच हरकत नाहीं. गरीब पहावेत नि कामावर ठेवावेत. बिचारे अन्नाला लागतील.'

मग शिवा गांवकऱ्यांना सांगूं लागला,—'कुणाला काम हवं असल्यास आपणाकडे आहे. कुणाचं पीक डुकरानं नासलं असल्यास त्याला आपण धान्य देऊं. कुणाचं आई-बापाशीं पटत नसल्यास त्याला आपण ठेऊन घेऊं.'

सर्व तऱ्हेचीं गरजेंत सांपडलेलीं माणसं शिवा कामावर ठेवूं लागला. त्यामुळं कोणत्याही वर्षी त्याला माणसं कमी पडलीं नाहींत. दर वर्षी भरपूर कापड निघूं लागलं. गुजरी करायला पेठेंत गेल्यावर शेजाऱ्यापेक्षां स्वस्त दरानं लुगडीं विकतां येऊं लागलीं. अशा रीतीनं शेजाऱ्यांचे धंदे त्यानं तोट्यांत आणले. त्यांच्या डोळ्यांत तो खुपूं लागला.

शिवा उद्योगधंद्यांत गर्क होता. अडीअडचणींत असलेल्या गांवकऱ्यांना कारखान्यांत काम देत होता. पण त्याच्या बायकोचं सुख मात्र कमी झालं. शिवानं ठेवलेल्या कामकऱ्यांबद्दल कांहींतरी निमित्त काढून शेजारणी टोंचून बोलूं लागल्या. बायकांचीच बोलणीं तीं! एकजण म्हणे,—'कुणी दारू प्यायला लागला कीं, शिवाला आनंद होतो. कारण शिवाला तो स्वस्तामध्यें कामावर मिळतो.' दुसरी

म्हणे,—' बापलेकांचं भांडण झालं की शिवा नाचूं लागतो, कारण शिवाला एक फुकटा माणूस मिळतो. '

रात्रीं शिवाजवळ बायकांची बोलणीं सांगून ती रडूं लागे. शिवा तिची समजूत घालीत म्हणे,—

' आपण कामाला लावलं नसतं, तर हे लोक जगांतून उठले असते. चांगलं काम करणाराची प्रथम निंदाच होते. '

दुसऱ्याचं बरं झालेलं पुष्कळांना पहावत नाहीं. शिवाचा वाढता उद्योग पाहून शिवाचे कांहीं शेजारी त्याचा हेवादावा करूं लागले. शिवासंबंधीं त्यांनीं अनेक कंड्या उठविल्या. मग शिवाकडील कामकऱ्यांना ते दारू पाजूं लागले. कामगार दारू पिऊन कामावर आल्यावर त्याला हाकलून देण्याखेरीज शिवा काय करणार ? शेजाऱ्यांच्या दुष्टाव्यानं शिवाला कामगार कमी पडूं लागले. त्याला मोठी चिंता पडली.

अशाच चिंतेमध्यें शिवा दुकानांत बसला असतां एके दिवशीं समोरच्या दुकानांत एका इसमाभोंवतीं जमून व्यापारी त्याची थट्टा करीत असलेले त्याला दिसले. आपणही थोडें हंसून आपली काळजी थोडा वेळ दूर करावी, अशा विचारानं शिवा तेथें गेला.

तो इसम शहरांतला होता. आपल्या हातांतले कागद सर्वांपुढें धरून ओरडून तो सांगत होता,—

' हे नव्या तऱ्हेचे यंत्रावरचे माग आहेत. यांत धोटा मागवाल्या हातानं पुढं–मागं फेंकावा लागत नाहीं. एक माणूस दिवसांत यावर तीन लुगडीं काढतो. तुमचे जुने माग काढून हे बसवून घ्या.—'

पण त्याचं बोलणं कुणीच ऐकत नव्हतं. सारे हंसत होते. एका दिवसांत तीन लुगडीं ! कांहीं तरी चेष्टा आहे !

पण शिवाला त्या माणसाच्या सांगण्यांत तथ्य वाटलं. पुढं होऊन त्या व्यापाऱ्यांच्या तावडींतून त्याला सोडवून शिवानं आपल्या दुकानांत आणला.

त्यानं सांगितलेलं शिवाला पटूं लागलं. एक माणूस प्रामाणिकपणं खपला तर आठ वार कापड निघतं, पण प्रामाणिक असला तर तो कामगार कसला ?

मधें विडी ओढायला—तंबाखू मळायला—अनेक सबबींनं कामगार वेळ घालवतो. नवं यंत्र आणलं तर सर्वच कटकटी दूर होतील. कमी माणसांवर काम भागेल. शिवा त्याला म्हणाला,—

'ठीक. तुमचं यंत्र आम्हांला आवडलं. तें इथं आणा. बसवून द्या ! जी वाजवी किंमत असेल ती देईन.'

सौदा पटवून शहराचा माणूस शहरांत गेला. आठ दिवसानंतर शिवानं मागवलेले यांत्रिक माग चार गाड्यांत बसून गांवांत आले. आठ दिवसांत माग बसवून झाले. नवव्या दिवशीं त्यांतून काम निघूं लागलं. शिवानं चार दिवसांत नव्या मागावरचं काम उचललं.

चार यंत्राच्या मागावर शिवानं चार माणसं ठेवली. कापड इतकं निघूं लागलं कीं तें खपवण्याचा एक स्वतंत्र उद्योगच झाला. मग शिवानं मागावर बसायचं सोडून दिलं. तो कापड विकण्यासाठीं बाजारांत नि शहरांतील व्यापाऱ्यांकडे फिरूं लागला. कापड आतां त्याला पूर्वींपेक्षां स्वस्त पडूं लागलं. कापडाला भरपूर मागणी आहे असं दिसतांच त्यानं आणखी दहा यंत्रांचे माग बसवले. शिवाकडे पाउणशें शंभर माणूस काम करूं लागलं.

आतां शिवा रात्रंदिवस उद्योगांत मग्न असे. तो गांवांत असला तरी त्याला जेवणासाठींसुद्धा वेळ मिळत नसे. जेवण तयार करून बायकोनं वाट पहात बसावं—कंटाळा आला कीं कारखान्यांत दहा निरोप धाडावेत तरी शिवाला फुरसत होत नसे. बऱ्याच वेळां तो येई नि गार झालेलं अन्न घशाखालीं घालून परत कारखान्यांत जाई.

धंद्यानिमित्त अनेकदां शिवाला फिरतीवर जावं लागे. अशा वेळीं तो किती दिवस बाहेर राही, याचा नेम नसे. बायको बिचारी वाटेकडे डोळे लावून थकून जाई. मग वारंवार ती त्याला पत्र लिही:—

'नाथ ! मला एकटीला इथं कंटाळल्यासारखं होतं. आपली वाट पाहून डोळे थकून जातात. आपण इथं आलांत, तरी चार शब्दसुद्धां मोकळेपणानं होत नाहींत. पूर्वी आपण दोघंच काम करीत होतों. काम करतां करतां किती तरी सुखदुःखाच्या गोष्टी आपण करीत असूं. तेव्हां आपण स्वतःपुरतंच विणीत होतों. नाथ ! ते दिवस पुन्हां येणार नाहींत का ?

—आपली दासी.

तिचं असं कांहीं पत्र आलं कीं शिवा घरीं येई, येतांना तो नवे नवे दागिने आणी नि नाना तऱ्हेनं तिची समजूत घाली. पण तिची समजूत पटत नसे. त्यानं आणलेले दागिने ती बाजूला सारी. शिवानं लग्नाआधीं दिलेली पंचधातूची अंगठीच साऱ्या हिऱ्यामाणकांहून तिला प्यार होती. तिच्या त्या हट्टाला तो हसे नि म्हणे, —

' लाडके, अंगांत शक्ती आहे तोंपर्यंत धडपड केली तरच पुढचे दिवस सुखाचे जातील. म्हातारपणी वाईट दिवस येतील म्हणून लोक भितात. कारण त्या वयांत कष्ट करणं जड जातं. आपण म्हातारपणासाठीं ही कमाई करीत आहोंत. '

नवऱ्याच्या बोलण्यानं बायकोचं समाधान होत नसे.

शिवाच्या यंत्राच्या मागावर तयार झालेल्या मालापुढें गांवांतलं हातमागावरचं कापड टिकेना. घरच्या घरीं वापरण्यासाठीं सुद्धां ते महाग पडूं लागलं. त्यांत मजुरीही सुटेनाशी झाली. हातमाग बंद पडत चालले. हातमागावर जगणारे कांहीं शिवाकडे काम करूं लागले, कांहीं शेतावर खपूं लागले. म्हातारीकोतारी म्हणूं लागलीं कीं मुलं आळशी झालीं आहेत. आयतं कापड त्यांना लागूं लागलं आहे. त्यांना कामच नको. सत्यानाशाचीं लक्षण आहेत हीं !

अशा रीतीनं शिवाचं आयुष्य धांवपळीचं, बरकतीचं जाऊं लागलं. त्यानं चारपांचशें माणूस कारखान्यांत लावलं. एक मोटर घेतली, नि गांवांतलं देऊळ नीट बांधून दिलं.

शिवाचे दिवस सुखानं जाऊं लागले. पण सुख नेहमीचं झालं कीं ते सुख वाटेनासं होतं. शिवाचं तसंच झालं. हळूंहळूं त्याच्या लक्षांत एक गोष्ट येऊं लागली. आपला धंदा आपण समजतों तेवढा स्थिर झालेला नाहीं. गांवांतले व्यापारी हळूहळू यंत्राचे माग बसवूं लागले होते. त्यामुळ लुगड्यांच्या किमतीवर परिणाम होत होता. भाव उतरावे लागणार, असं दिसूं लागलं. त्याबरोबरच कारागिरांना मागणी वाढत होती आणि मागणीबरोबर त्यांची मजुरीही वाढत होती. कापडाचे उतरते भाव आणि मजुरीचे चढते भाव या कात्रींत धंदा सांपडत होता. शिवा अगदीं हवालदील झाला. रात्रंदिवस तो देवाला म्हणूं लागला,

‘ देवा ! तुझ्याच कृपेनं फळ आजपर्यंत मला मिळालं आहे. तूंच मला रोजगार दिलास—तुझ्या मुळेंच चार हातमाग माझ्या मालकीचे झाले—चार यंत्राचे माग बसविले ती पण तुझीच लीला. आलेल्या संकटातून तूंच तार ! ’

असाच एकदां शहरांत गेला असतां मोठ्या प्रमाणावर गिरण काढण्याची कल्पना त्यांनं ऐकली. ती कल्पना त्याच्या डोक्यांत भिनून गेली. – ‘ खरंच गिरणीची कल्पना किती चांगली ! उठल्यासुटल्या कुणाला गिरणी काढतां येणार नाहीं. स्थिर असा तो उद्योग आहे. कुणीही चार पैसे कनवटीला असले की उठतो नि सांचे काढतो. मग वाटेल त्या दरानं कारागिर घेतो नि वाटेल त्या कमी दरानं कापड विकतो. साऱ्या धंद्याचा चुथडा होतो. तसं गिरणींत कधीं होणार नाहीं. ’

जे शहरांतले व्यापारी या कल्पनेमागें होते, त्यांनीं शिवाला भागीदारींत घेतला. शिवाचा उद्योग नि हुषारी मशहूर होती. सर्वांनीं त्यालाच या नव्या उद्योगाचा सूत्रधार नेमला.

गिरणीचे शेअर्स विकण्यासाठीं शहरोशहरीं शिवानं दौरा काढला. अतिशय थोड्या अवधींत शेअर्स खपले. गिरणी उभारण्याचं काम चालू झालं.

दोन वर्षांनीं गिरणींतून कापड निघूं लागलं. सर्वांनीं या नव्या उद्योगाचं कौतुक केलं. जाणते लोक म्हणूं लागले, लौवकरच आमचा देश कापडाच्या बाबतींत स्वतंत्र होणार.

गिरणींतून उमाप माल निघूं लागला. मालाची किंमत माफक ठेवली होती. मागावरचं कापड घेणं कुणाला परवडत नाहीसं झालं. लोक गिरणीचं कापड घेऊं लागले. हळूंहळूं माग बंद पडत चालले. मागावर काम करणारे शेंकडो कामगार उघडे पडले. कुणी गिरणींत येऊन कामाला लागले. कुणी देशोधडीस गेले.

अशा रीतीनं देशभर गिरणीचं कापड पुरवूं लागलं. पहिल्या तीन वर्षांतच भागीदारांना प्रचंड नफा मिळाला नि शेअरहोल्डर्सना बोनस मिळाले. सारे खूष झाले. त्या खुषींत हें मोठं काम यशस्वी करणाऱ्या शिवाचा गौरव करायचं ठरलं.

अनेक मोठमोठ्या लोकांनीं शिवाचं अभिनंदन केलं. या साऱ्या मोठ्या लोकांमध्यें एक लहानसा माणूस त्याच्या भेटीला आला. त्यानं अभिनंदन केलं

नाहीं. कठोर नजरेनं त्यानं एकच प्रश्न विचारला, – ' आम्हा मजुरांना पोटभर मजुरी कधी देणार ? '

त्याचा प्रश्न ऐकतांच शिवाला संताप आला, ' मजुरी पोटभर हवी आहे ! या मजुरांना कधींच कांहीं पुरं पडायचं नाहीं. त्यांना तुम्ही आठ आणे दिले तर ते बारा आणे मागतील. बारा आणे दिले तर रुपयासाठीं भांडतील. ' आज कितीएक वर्षांचा या मजुरांबद्दल शिवाला अनुभव होता. त्यांच्या अधाशीपणाला कुठं तरी बांध घातलाच पाहिजे, असं त्यानं ठरवलं. पगारवाढ होणार नाहीं, असं त्यानं कळविलं.

पगारवाढ होत नाहीं, असं कळतांच संपाची वावटळ उठली. शिवानं ठरवलं कीं साधेसोपे उपाय करायचे नाहींत. धोरण कडक ठेवायचं. संपाचं मूळ ठेचून काढायचं.

जिल्ह्याच्या अधिकाऱ्यांची भेट घेऊन शिवानं संपाला चिथावणी देणाऱ्यांना अटक करवली. मग संपाच्या ठिकाणीं खास हत्यारी पोलिस आणले.

गिरणीच्या आवाराबाहेर मजूर निरोधन करीत होते. मजूरांच्या मिरवणुकी निघत होत्या. लाल झेंडे फडकत होते. जयजयकार होत होते.

शिवानं बोलविलेल्या घोडेस्वार पोलिसांनीं या मजुरांवर हल्ला केला. गोळीबार सुरू झाला. मजूरांची पांगापांग होऊं लागली. शेंकडो मजूर जखमी झाले. कितीएक मेले.

शिवा हें सारं पहात होता. त्याच्या मनांत येत होतं कीं एकदां हें असं केल्याशिवाय मजूर धडा घेणार नाहींत. पोटाला मिळत असतां मजूरांनीं तक्रार उकरून कां काढावी ? गिरण्या नसत्या तर आपण उपाशी मेलों असतों, हें या मूर्खांना कळत नाहीं ?

आपल्यावर मोटारींत बसून शिवा गिरणीच्या बाहेर आला. गिरणीच्या आवारांत पोलिसाशिवाय दुसरं कोणी नव्हतं. रस्त्यावर जखमी नि मृत मजुरांचीं शरीरं पडलीं होतीं. शिवाचीं मोटार जाण्यासाठीं तीं शरीरं पोलिसांनीं बाजूला ओढून काढलीं. मोटार आवाराबाहेर गेली नाहीं तोंच कुठूनतरी आरोळ्या आल्या–

' गिरणीमालक नष्ट होवो ! – मजूरांचा जय असो. '

शिवानं मोटारीचा वेग वाढविला. इतक्यांत एक दगड मोटारीच्या खिडकीवर येऊन आदळला. खिडकीची कांच ताडकन् फुटली.

आपल्या जिवावर मजूर उठले आहेत, हें शिवाला कळून चुकलं. त्याला वाईट वाटलं. तो देवाला म्हणाला, – ' देवा ! तुला ठाऊकच आहे, आजपर्यंत मजूरांचं हितच मी पहात आलों आहें. हजारों लोकांना मी रोजगार दिला नि यापुढं आणखी देईन. आपली पगारवाढीची मागणी कशी चुकीची आहे, हें यांना कळूं दे. '

मोटार फार अंतरावर गेली नाही, तोंच रस्त्यावर पडलेला एक मोठा दगड टाळण्यासाठीं त्याला वेग हळू करावा लागला. मोटारचा वेग हळूं होतांच बाजूच्या झाडीतून पांचसहा लोक चित्त्याप्रमाणं पुढं घुसले नि त्यांनी मोटारवर हल्ला केला. एकानं शिवाच्या तोंडावर रुमाल बांधला. दुसऱ्यानं मोटारचं चाक हातीं घेतलं. नि बाकीच्या लोकांनीं शिवाला उचलून मोटारच्या मागील बैठकीवर टाकला.

मोटार शहराबाहेर निघाली. शिवानं हल्ला करणाऱ्या लोकांकडे पाहिलं. ते सारे त्याच्याच गिरणींतले मजूर होते. त्यांचे चेहरे उग्र दिसत होते. त्यांचे हात राकट होते नि त्यांचा आवेश राक्षसी होता.

मोटार शहराबाहेरच्या दूर अंतरावर येऊन थांबली. शिवाला उचलून त्यांनीं बाजूला शेतांत नेलं. तिथं खोलसर जागा पाहून त्याला आडवं टाकलं.

शिवानं त्यांच्या क्रूर चेहऱ्यांकडे पाहिलं. त्यांच्या डोळ्यांत द्वेषाच्या ज्वाळा होत्या पण आश्चर्य हें कीं शिवाला थोडसंसुद्धां भय वाटलं नाहीं. तो मनांत म्हणत होता, – ' आज या लोकांनीं मला मारलं, पण उद्यां यांनाच वाईट वाटेल. मी त्यांना शत्रू वाटतो आहे तो मित्र वाटूं लागेन. माझ्या उद्योग धंद्यामुळें किती लोक रोजगाराला लागले, हें मात्र त्यांच्या लक्षांत आलं पाहिजे. '—

पुढं काय होईल, हा विचार मारणाऱ्यांच्या डोक्यांत नव्हता. त्यांनीं परस्परना इशारा दिला. शिवाची विटंबना सुरू झाली. कुणी त्याला थापड दिली, – कुणी थुंकला. मग एकानं त्याचा कोट काढला—दुसऱ्यानं सदरा फाडला. एखाद्याची

विटंबना करूं लागलं कीं कल्पना सुचायला वेळ लागत नाहीं. त्यांच्यापैकीं एकानं शिवाच्या उघड्या शरीरावर आपला सदरा चढवला. हंसत हंसत तो म्हणाला,—

' आमच्यासारखा मजूर करून आम्ही तुला मारूं. '

मग शेवटचा इषारा झाला. एकानं हातांतील लोखंडाची कांब वर उचलली नि शिवाच्या डोक्यावर फटका दिला. शिवाची शुद्ध गेली. डोक्यांतून भळभळा रक्त वाहूं लागलं शिवा मेला, असं समजून मारणारे पसार झाले.

शिवाच्या डोक्याला झालेली जखम खोल गेली होती पण तिने त्याचा प्राण घेतला नव्हता. त्याच भागांत राहणाऱ्या भिकाऱ्यानं त्याला पाहिल नि उचलून आपल्या झोंपडींत आणलं. त्याची शुश्रूषा केली.

शिवा बरा झाला. पण डोक्यावरच्या घावानं त्याची स्मरणशक्ति पार नाहींशी झाली. भिकाऱ्यानं त्याला नांवगांव विचारलं पण त्याला कांहींच आठवेना. मग त्या भिकाऱ्यानं त्याला भीक मागण्यासाठीं पाठविलं पण भिकाऱ्यासारखं ओरडणं शिवाला जमेना. तो भिकारी वैतागून गेला. भीक मागण्याशिवाय त्याच्याजवळ कांहीं काम नव्हतं नि शिवाला भीक मागणं जमत नव्हतं. असला निकाम्या माणूस त्याला काय उपयोगी ! त्यानं शिवाला झोपडीबाहेर हांकलून दिला.

शिवा बाहेर पडला. भुकेपायीं त्याचा जीव कासावीस होऊं लागला. पोटाला मागत तो गांवागांव हिंडत आपल्या पूर्वीच्या खेडेगांवांत आला.

शिवा आतां म्हातारा दिसत होता. गांवांत त्याला कुणींच ओळखलं नाहीं. गांवचा जुना पाटील पिकला होता. पाटीलकी मुलाकडे आली होती, शिवा पाटलाकडे येऊन म्हणाला,—' रामराम पाटील चार दिवसांचा उपाशी आहे मी ! रोजगारासाठीं हिंडतोय्. रोजगार द्या ! तुमचीं ढोरं संभाळतो. गवत कापतों शेतकाम करतों—मला काम द्या. '

पण पाटील हंसला नि म्हणाला,—

' वेड्या ! आम्ही रे तुला कुठचं काम देणार ? उपाशी आहेस म्हणतोस; घासभर खाऊन जा. पण रोजगार ? छे ! आमचीच शेती खराब झाली आहे, तींत कस नाहीं. सावकाराच्या कर्जांत आम्ही सारे बुडलों आहोंत. तुला रोजगार

हवाच असेल, तर युक्ती सांगतो. या गांवी शिवा नांवाचा एक माणूस होता. त्यानं तालुक्याच्या गांवी जाऊन माग घातले आहेत, तिथं जा.'

पाटलाला रामराम करून शिवा तालुक्याच्या गांवी आला. शिवानं काढलेल्या मागावर आपल्याला खात्रीनं काम मिळणार, असं त्याचं मन सांगू लागलं. उत्साहनं त्याची पावलं पडूं लागलीं. शिवाचं घर शोधून काढून शिवानं जेव्हां काम मागितलं, तेव्हां तेथील माणूस पाटलाप्रमाणंच करुणापणानं हंसला नि म्हणाला,—

'काम ? शिवाचे माग इथं राहिले नाहींत. त्यानं ते विकले. तो यंत्राच्या मागावर आतां कारखाना चालवीत आहे. यंत्राच्या मागानं आमचे हातमाग बंद पाडलें. आम्ही माग टाकून शिवाकडं मजूर झालो. आतां एक लुगडं विणलं कीं सारे आठ आणे मिळतात. आम्ही तुला काय देणार ? पण असं कर ! शिवानं यंत्राचे माग लावले आहेत, तिथं जा. तिथं काम मिळेल.'

शिवाचा यंत्राच्या मागाचा कारखाना होता, तिकडं शिवा गेला. पण तिथंही शिवाला शिवा सांपडला नाहीं. कारखाना टाकून शिवा शहरांत गेला होता. तिथं त्यानं गिरणी काढली होती. गिरणीमुळें यंत्रावरचे मागहि बसले होते. गिरणींत मात्र हजारो मजूर खपत आहेत–तिथं काम मिळेल असं त्याला सांगण्यांत आलं.

शिवा निराश झाला नाहीं तो शहरांत शिवाला शोधींत गेला. ज्यांनी हजारोंना रोजगार दिला, तो आपल्याला रोजगार दिल्याशिवाय थोडाच राहातो ? त्याच्या हातापाया पडूं पण काम मिळवूं, असा निश्चय करीत शिवा शिवाच्या गिरणीशीं आला. पण तिथला देखावा वेगळाच होता. तिथं संप चालला होता.

शिवानं चौकशी केली तेव्हां समजलं कीं मजुरी वाढविण्यासाठीं मजुरांनीं संप केला आहे. शिवानं मजुरी अधिक देण्याचं नाकारलं आहे. त्यानं गिरणी बंद ठेवली आहे. त्याच्या जवळ गडगंज पैसा आहे. गिरणीची त्याला पर्वा नाहीं. कुठं तरी थंड ठिकाणीं तो हवा खाण्यासाठीं गेला आहे. मजूर मात्र आगींत सांपडलेल्या उंदराप्रमाणं तडफडत आहेत.

ही सारी दृश्यं पाहिल्यावर शिवाच्या मनांत काहूर उठलं. शिवाच्या उद्योगाचा शिवाला संताप आला. शिवाला वाटलं, शिवाला जाऊन सांगावं कीं तुझ्या उद्योगानं

तूं लोक रोजगाराला लावले नाहीस, पण उपाशी मारलेस. तूं यंत्राचा माग घेतलास नि हातमाग बुडाले. हातमागावरील कारागिरांना तूं अपुऱ्या वेतनावर काम दिलंस नि त्यांच्या श्रमावर पैसा गोळा केलास. मग तूं गिरणी काढलीस नि मागावरचे सारे धंदे धुळीला मिळविलेस. निरुपाय झालेले लोक तुला आणखी कमी पगारावर कामावर मिळाले. तुझं वैभव वाढत चाललं. गरीब झालेल्या मजुरांनीं पोटभर रोजगार मिळावा म्हणून संप केला नि तूं त्यांच्यावर गोळीबार करवलास. एक वेळ तूं रोजगारच्या भ्रांतींत होतास. माणसाला किती पैसा लागतो हें तुला समजत होतं, पण तूं मोठा झालास, तेव्हां तें सारं विसरलास.

आपल्याला जें जें वाटतें तें तें सडेतोड रीतीनं शिवाला सांगितलं पाहिजे, असं शिवानं ठरविलं. त्याचीं कृत्यं त्याला समजायला हवींतच.

शिवाचा बंगला शिवानं शोधून काढला. समुद्रकाठीं हवेशीर बंगला होता तो. दारवानाची नजर चुकवून शिवा आंत गेला. भोवतीं बाग होती. पायाखालीं वाळू खुसखुसत होती. बंगल्याचे वैभव पाहून शिवा आणखी चिडला. मजुरांच्या पोटाचें काढून चैन करणारा शिवा राक्षस आहे असं शिवानं ठरवलं.

आवेशानं शिवा बंगल्याच्या चौकांत आला. तिथं मोठमोठ्या आरामशीर खुर्च्या टाकल्या होत्यां. सुंदर टेबलं होतीं. जमीन चकाकत होती. एका खुर्चीत एक स्त्री बसली होती.

शिवाची पावलं ऐकतांच तिनं मान वर केली. मग ती झटकन उठून उभी राहिली. उठतांना तिनं डाव्या हाताचीं बोटं खुर्चीच्या बाजूवर ठेवलीं होतीं. शिवा कांहीं बोलणार तोंच त्याचं लक्ष त्या बोटांकडं गेलं. तो एकदम चमकला. एका बोटांत एक पंचधातूची अंगठी होती.

शिवाच्या डोक्यांत एक विलक्षण कळ आली. त्यानं डोळे मिटले. कांहीं तरी उलथापालथ त्याच्या डोक्यांत होऊं लागली. मग एकदम सारं कांहीं त्याला आठवलं.

त्याला आठवलं कीं, समोर उभी असलेली स्त्री आपली बायको आहे. तिच्या बोटांतली अंगठी आपणच दिलेली आहे. हा बंगला आपला आहे. संप चाललेली

गिरणी आपली आहे. यापूर्वी आपण सुताचे व्यापारी नि यंत्राचे माग चालविणारे होतों. त्यापूर्वी आपले हातमाग होते. त्याहीपूर्वी आपण रोजगारावर होतों. माणगांवच्या खेड्यांतून रोजगारासाठीं आपण बाहेर पडलों. रोजगार मिळाला. मग एखादा माग आपल्याला हवासा वाटला. तो मिळाला. मग यंत्राचे माग आणले. मग गिरणी काढली. जास्त जास्त माणसं आपण कामाला लावलीं, ज्योतिष्याचं भंविष्य खरं झालं. लाखों लोकांना आपण पोटाला लावलं, पण त्यांचा दुवा मात्र घेतला नाहीं. आपण धंदा वाढविला, पैसा गोळा केला, पण इतरांना बेकार केलं. त्यांना आपल्या दाराशीं रोजगाराला लावलं नि अर्धपोटीं ठेवलं. त्यांनीं त्यामुळं संप केला. आपण गोळ्या घातल्या. छे ! छे !

शिवाच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहूं लागले. आपला आपण त्यानं हजारदां धिःकार केला. डबडबलेल्या डोळ्यांमधून त्यानं आपल्या बंगलीकडं पाहिलं. मग एकदम पाठ फिरवून तो बाहेर पडला.

कुठं जायचं, हें त्याला ठाऊक नव्हतं. हातून घडलेला गुन्हा मनाला डांचत होता. कारखाने–गिरण्या आपण एकट्यानं बळकावून बसायचे नि लोकांना रोजगार द्यायला निघायचं हा तो गुन्हा होता. देशाला रोजगार द्यावयाचा असेल तर कारखाने देशाच्या मालकीचे करायला हवेत. मग एका व्यक्तीनं स्वतःच्या फायद्यासाठीं कारखाने चालवणं बंद होईल. माणसाला किती पैसा लागतो, तो आपोआपच मिळेल. आतां हे सारं शिवाला कळलं. पण कळलं, तरी यांतून मार्ग काय ? तो मात्र स्पष्ट नव्हता. एक आशा मात्र होती. ज्या गरीबांमधून तो वर आला, त्यांच्यांत एकरूप झाल्यानं मार्ग सांपडेल !



# माझ्यावर गोष्ट लिही !

वयाच्या सोळाव्या वर्षी मी एक प्रसिद्ध लेखक होतों. आमच्या गल्लींत कुठंही माझं नांव तुम्हांला ऐकूं आलं असतं. तसं म्हटलं तर माझी एकही गोष्ट प्रसिद्ध झाली नव्हती. पण गल्लींतला लहानमोठा नागरिक रस्त्यावरून जाऊं लागला कीं, खिडकीकडे तोंड करून ओरडायचा,

'काय लेखक ! लेख लिहितां काय ?'

त्या मूर्खांना लेख नि गोष्ट यांतील फरकही ठाऊक नव्हता ! तरी त्यांचे हे पुकार ऐकून मी स्वतःवर खूष होई; नि त्यावेळीं वडिलांनीं धाडलेल्या पैशांचा हिशेब करण्याचं काम चालू असेल, तर हिशेब लागत नसलेले पांच रुपये किरकोळ खातीं घालून मी मोकळा होत असें ! हिशोबासारख्या किरकोळ गोष्टींत मन घालणं का लेखकाचं काम आहे ?

सोळा वर्षांचं वय तें ! प्रत्येक गोष्ट करावी असं वाटायचं नि कोणतीच गोष्ट पुरी व्हायची नाहीं. प्रत्येकाविषयीं प्रेम वाटायचं पण मन कुठं स्थिर व्हायचं नाहीं. परकर नेसणारी दहा वर्षांची पोरगी सुंदर वाटायची नि पातळांत शिरलेल्या आपल्या वयाच्या पोरींशींही मैत्री हवीशी वाटायची.

नि म्हणूनच शेजारची रागिणी ( वय वर्षं दहा ! ) रडत रडत खोलींत येऊन जेव्हां मला म्हणाली " नाना ! आतांच्या आतां माझ्यावर गोष्ट लिही " तेव्हां

मी लेखणी सरसावून उठलों. रागिणी मला आवडत असे नि त्यांत ती आतां रडत होती. मी चिडलों यांत नवल काय ? मी विचारलं,

'कशी गोष्ट लिहू ? एक रागिणी नांवाची गोड—'

मला थांबवून ती म्हणाली,

'अंहं ! माझं नांव घालायचं नाहीं. ही तर अट.'

'अट कबूल. पुढं ?'

'गोष्ट अशी लिहायची—एका शहरांत राधा नांवाची एक मुलगी होती. वय माझ्याएवढं. शिकलेली माझ्याएवढीच. घर माझ्यासारखंच. नि आई पण माझ्या-सारखी. वडिलांविषयीं चांगलं लिहायचं. पण आईविषयीं अगदीं वाईट लिही. राधेला एकदां गोल पातळ नेसायचं होतं. पण तिची आई अतिशय वाईट होती ना ? भोंवतालच्या साऱ्या मुली गोल नेसत—त्या का वाईट झाल्या रे ? तरी राधेची आई—'

पण एकदम् जोराचा हुंदका आल्यामुळं रागिणीला राधेची गोष्ट अपुरी टाकावी लागली. भोंवतालच्या मुलींचीं गोल पातळं, आपला हट्ट, आईचा नकार—सारं तिला आठवलं असावं. मला गहिंवरल्यासारखं झालं. मी म्हटलं,

'रागिणी ! उगी रहा अशी गोष्ट लिहितो कीं आई एक काय पण दोन गोल पातळं नेसायला देईल ! आईचं चित्र असं भयंकर रंगवतों—दुष्ट, कजाग, काळी, मारकुटी—कीं साऱ्या आळींत तिला तोंड दाखवितां यायचं नाहीं !'

टाळ्या पिटीत ती म्हणाली,

'हं तसंच लिही !'

त्यानंतर मी अगदीं गंभीरपणं गोष्ट रचूं लागलों. त्या नादांत रागिणी गोल पातळ नेसून रस्त्यांतून मिरवूंसुद्धां लागली, हें माझ्या ध्यानांत आलं नाहीं. आमच्या कथानकाशीं जुळत्या गोष्टी वाचून त्यांतील वर्णन उतरून घेतलीं. कैकयीचे बरेचसे गुण उपयोगी पडतील म्हणून वहींत टिपून ठेवले.—'गरीब राधा कजाग आई' असं भयंकर करुण नांव दिलं गोष्टीला. गोष्ट महिन्याभरांत लिहिली. मग रागिणीला बोलावलं, गोष्ट ऐटींत तिच्या अंगावर टाकून म्हटलं,

'घे ! वाच.'

तिनं गोष्टीचा मथळा वाचून म्हटलं,

'अय्या ! मी म्हणालें होतें ती गोष्ट का ? वाचतें हं.'

ती गोष्ट वाचूं लागली. मी तिच्याकडे टक लावून पहात राहिलों... आतां डोळ्याची पापणी हलली—आतां हंसल्यासारखी वाटली... मुलीला पहायला आलेल्या मंडळींच्या तोंडावरचे लहानसहान हावभाव जसे मुलीचे आईवडील पहात रहातात, तसंच माझं झालं. गोष्टीची कांहीं आशा आहे का ? तिला आवडेल का ?

अखेर गोष्ट पुरी झाली. गोष्ट माझ्या हातांत परत देत ती म्हणाली,

'किती रे भयंकर लिहिली आहेस ! आमची आई इतकी काळी, इतकी कजाग, इतकी दुष्ट आहे वाटतं ? नाहीं रे नाना ! आई किती मायाळू आहे, ती बोलते—पण वरवर. मी त्या दिवशीं शाळेतून आलें नव्हतें, तोंच तिनं दोन गोल पातळ आणून ठेवलीं होतीं माझ्यासाठीं. पाहिलंस हें ! किती सुंदर आहे नाहीं ?'

पण पातळाकडे लक्ष देण्याच्या अवस्थेंत मी होतों कुठं ? मी म्हटलं,

'पण आपलं ठरलं होतं ना—'

'तेव्हां मला राग आला होता म्हणून मी रडलें नि बोललें पण. म्हणून माझ्या आईला कजाग—दुष्ट म्हणशील वाटतं ?'

फणकाऱ्यानं ती निघून गेली.

नंतर पांच वर्षें गेलीं. रागिणीला पातळासाठी हट्ट धरून बसण्याचं आतां कांहीं कारण उरलं नव्हतं. आमचं बोलणं चालणं पूर्वीच्या मानानं कांहीनं कमी झालं होतं. आतां माझी एखादी दुसरी गोष्ट छापून आल्यानं होतकरू लेखकांच्या गर्दीत मी दाखल झालों होतों.

कांही दिवसांपासून रागिणीविषयीं कुणकुण ऐकूं येऊं लागली होती. कुणी म्हणे ती शाळेच्या निमित्तानं बाहेर जाते नि एका मुलाबरोबर हिंडते. हळूहळू त्या मुलाविषयीं माहिती समजली. कोणत्या तरी छापखान्यांत तो कारकून होता. त्याला काव्यगायनाचा नाद होता. म्हणूनच दोघांची ओळख झाली होती.

एके दिवशीं संध्याकाळीं रागिणी माझ्या खोलींत आली. तिचं सारं तोंड रडण्यानं फुललं होतं. आंत येतांच माझ्याकडे न पहातांच टेबलाजवळ जाऊन टेबलावर डोकं टेकून ती रडूं लागली. मी कांहींच बोलल्यों नाहीं. थोड्या वेळानं ती मान वर करून म्हणाली,

'नाना ! प्रेम करणं गुन्हां आहे का ?'

मी म्हटलं, 'कोण म्हणतं असं ?'

'तूं गोष्टी लिहीतोस—प्रेमाविषयीं तुला जास्त कळतं. एखाद्या लांडग्यांप्रमाणं माझ्यावर सारे तुटून पडले आहेत. कां ? तर म्हणे—एका मुलावर माझं प्रेम आहे ! प्रेमावाचून मला जगतां यायचं नाहीं रे !'

मी कांहींच बोललों नाहीं. ती त्वेषानं म्हणाली,

'तो गरीब आहे—असेल ! जातीनं वेगळा आहे—बिघडलं कुठं ? जगाला या उठाठेवी कां ? आमच्या सुखांत बिब्बा घालायला यांनीं कां यावं ? आम्ही त्यांचा काय गुन्हां केला आहे ? सांग नाना ! तुला चीड येत नाहीं ? तूं लेखक आहेस. अशा दुष्ट माणसांवर तूं गोष्ट कां लिहीत नाहींस ? अशा लोकांना समाजापुढं उभं करून तूं कां सांगत नाहींस, कीं तरुण मुलांची मनं मारणारे हे सामाजिक गुन्हेगार आहेत, म्हणून ? माझंच पहा ! वडिलांनीं चार दिवस मला कोंडून ठेवलं. आईनं मला नाना तऱ्हेनं बोलून घेतलं. घराबाहेर पडलें तर लोकांनीं आपल्या रोखलेल्या नजरांनी मला भाजून काढलं. जणुं काय मी प्रेम केलं म्हणजे मोठा गुन्हाच केला !'

श्वास घेण्यासाठीं ती थांबली,

'माझे वडिलच हं ! ज्यांनीं आजपर्यंत कौतुकानं माझं तोंड कुरवाळलं, त्यांनींच काल माझ्या गालावर थापड दिली. मी संध्याकाळी घरांत शिरतांच वडिलांनी पुढं होऊन दरडावलं,

'रागिणी ! कुठं गेली होतीस ?'

मी कांहींच बोललें नाहीं. ते ओरडले,

'सांगतेस की नाहीं ?'

मी मान हलवली. संतापनें ते म्हणाले,

'त्याच्याकडे गेली असशील ? पुन्हां भेटलीस ना त्याला ? बोल ! भेटलीस कीं नाहीं ? बोल बोल—'

मी कांहीं बोललें नाहीं तेव्हां हात उगारून त्यांनी माझ्या दोन थोबाडींत दिल्या. मारण्याच्या वेदनापेक्षां त्यांनीं मला मार द्यावा याच्याच वेदना अधिक होत होत्या ! मी रात्रभर धुसमुसून रडलें. आपल्या मुलीवरच्या प्रेमापेक्षां समाजाची भीति, चालीरिती यांचीच चाड वडिलांना जास्त वाटावी ? एखाद्या खलपुरुषासारखं त्यांनीं आमच्या सुखाचा सत्यानाश करायला धावावं ? नायिकेचे वडीलच तिच्या संसारसुखावर निखारा ठेवणारे खलपुरुष होतात अशी गोष्ट लिहीली आहेस कां तूं ? नाना खरंच माझ्यासाठीं एवढं कर ! माझ्यावर एक गोष्ट लिहीच. मीं जरी बळी पडलें तरी इतर तरुणींना आईवडिलांकडून मोकळीक मिळेल. नाना ! खरंच लिहीना !'

नि खरंच, मी गोष्ट लिहूं लागलों ! तिच्या वडिलांनी खलपुरुष न बनवितां सारा समाजच खलपुरुष बनवायचा, असं मी ठरविलं. कल्पना वेगानं धावूं लागल्या.

गोष्ट ठसठशीत व्हावी म्हणून त्या दोघांच्या भोवतालच्या वातावरणाचा अभ्यास केला. त्याचं ऑफीस पाहिलं, घर पाहिलं, ज्या काव्यगायनांत त्यांची ओळख झाली तो समारंभ ऐकून घेतला. त्यांची फिरायला जाण्याचीं ठिकाणं पत्रांतले मजकूर, त्यांची होणारी प्रेमाची संभाषणं, हेंहीं साहित्य रागिणीनं माझ्या स्वाधीन केलं.

आणि माझी उत्कट प्रेमभंगाची गोष्ट तयार झाली नि ती प्रसिद्धही झाली. साऱ्या गावांत तिनं एकच खळबळ उडवून दिली. त्यांतलं जोडपं, त्याचं ऑफिस, तिचे घर तिचे आईवडिल, काव्यगायन,—हें सारं कोण, कुठलं, हें ओळखायला कुणाला डोक्याला फारसा शीण द्यावाच लागला नाही. जी गोष्ट कानांत कुजबुजली जात होती तीच आतां चौकाचौकावर बोलली जाऊं लागली. रागिणीला कोंडून ठेवण्याची तिच्या वडिलांना जरूर उरली नाहीं. ती आतां दिवसरात्र स्वत:ला कोंडून घेऊं लागली.

मी मात्र वेगळयाच विवंचनेंत होतो. माझी गोष्ट तिला वाचायला मिळाली कीं नाहीं, मला कांहीच कळेना. मीं अगदीं अस्वस्थ होत चाललों. नि अचानक एक दिवस तिच्या भावानं मला चिट्ठी आणून दिली. रागिणीनं लिहीलं होत,

'नाना ! तुझी गोष्ट वाचली. मला फार आवडली. तूं खात्रीनं मोठा लेखक होणार. तुझ्या गोष्टींवर चित्रपटसुद्धां निघेल. गावांत सगळीकडे आमच्यासंबंधी लोक बोलत आहेत. आमची बदनामी होत आहे. ती टाळण्यासाठी तरी बाबा आमचं लग्न लावून देतील ! तुला नाहीं का रे असं वाटत !'

'मला पण तुझ्याचसारख वाटतंय' असं मी तिला लिहीलं. माझ्या लेखनासंबंधीं तिनं जें भविष्य केलं होतं, तेंच मला जास्त आवडलं होतं. मी खूष झालो होतो.

पण त्याच रात्रीं रागिणीचे वडिल माझ्याकडे आले. आंत येतांच कपाळावर हात मारून ते म्हणाले,

'नाना ! कोणत्या जन्मीचं वैर साधलंस तें तरी सांग ! तुझ्या वडिलांशी माझी मैत्री आहे म्हणून, नाहीं तर तुझ्या त्या गोष्टींबद्दल तुला—जाऊं दे ! अजून तूं लहान आहेस. अजून डोकं ठिकाणावर ठेवून वागायला तुला शिकतां येईल. आपण काय लिहितों नि त्याचा काय परिणाम होईल. याचा चार दिवस विचार करून मग लिहीत जा. तुझ्या गोष्टीनं एका गरीब मुलीचा तूं सत्यानाश केला आहेस खरा !'

इतकं बोलून रागिणीचे वडील खालच्या मानेनं बाहेर गेले.

त्यानंतर रागिणीला घेऊन तिचे वडील वऱ्हाडांत गेल्याचं समजलं. रागिणीची मावशी तिथं होती.

हळू हळू दिवस जाऊं लागले. पाण्यावर उठलेली खळबळ जशी हळूहळू शांत होते तसंच त्या साऱ्या प्रकरणाचं झालं. लोकांच्या आठवणींतून लौकरच रागिणी, तो तिचा प्रियकर, माझी गोष्ट—सारं नाहींसं झालं. नव्या गोष्टी पुढं आल्या नि त्यावर लोक बोलूं लागले. ज्यांना जखम झाली त्यांचं पुढं काय झालं हें समजायला मार्ग नव्हता.

तसा प्रत्यक्ष मार्ग नव्हता म्हणून मी अप्रत्यक्ष मार्ग काढला. मी कल्पना करूं लागलों. माझ्या कल्पनेंत वेगवेगळी चित्रं तयार झालीं. तीं सारीं करुण होतीं. आपल्या प्रेमाच्या माणसाजवळून एका तरुणीला जबरीनं तिच्या वडिलांनीं ओढून नेलं. ती शरीरानं दूर गेली. पण मनानं मात्र आपल्या प्रिय व्यक्तीजवळ राहिली. तिच्या डोळ्यातलं तेज गेलं. बोलण्यांतला आवेश गेला, वागण्यांतील गम्मत गेली. हृदय जड मातीचा गोळा होऊन बसलं. जिथं बसावं तिथं बसून रहावं असं वाटूं लागलं. पडावं तिथं पडून रहावसं वाटूं लागलं. स्वतः कांहीं करण्याची ईर्षा गेली. बोलायची इच्छा नाहींशी झाली. आयुष्याला अर्थच उरला नाहीं !

मग तिच्या वडिलांनी तिला विचारलं—लग्नाबद्दल विचारलं. कांहींतरी बोलायचं म्हणून ती 'हो' म्हणाली. मुलगा पहायला आला तेव्हां ती नुसती शेणामेणाच्या बाहुलीसारखी बसून राहिली. वर मान करून तिनं त्याच्याकडे पाहिलसुद्धां नाहीं.

अखेर तिचं लग्न झालं पण तिच्या मेलेल्या मनाला कांहीं जीव आला नाहीं हळूहळू ती कृश होऊं लागली. तिची अन्नावरची वासना उडाली. तिला काय होतंय कुणालाच कळेना. शेवटीं वर्षानंतर तिला क्षय झाला असल्याचा डॉक्टरांनीं निर्णय दिला. त्यानंतर ती फार दिसावयाची सोबती राहिली नाहीं. जी पूर्वीच मेली होती ती आज लोकार्थानें मेली !

डोक्यांत आलेल्या सगळ्या कल्पना मी लिहून काढल्या. रागिणीचं दुःख नि संताप यांच्याशीं मी समरस होऊन गेलों. लिहितां लिहितां अश्रु पुसूं लागलों नि अश्रु पुसतां पुसतां लिहूं लागलों.

गोष्ट लिहून झाल्यावर मी स्वतःशीं म्हटलं, 'रागिणी तूं इथं नाहींस तरी तुझ्या भावना मला कळताहेत. मला त्यांच्याशीं समरस होतां येतं. रागिणी तुझं दुःख जगापुढं मांडायचं माझं कर्तव्य होतं तें मी केलं. माझे शब्द अपुरे असतील पण ते गोड मानून घेशील अशी खात्री आहे !'

गोष्ट लिहीली खरी. तरी ती प्रसिद्ध झाली एक दीड वर्षानंतर. पण प्रसिद्ध झाल्यावर मला ती फारच आवडली. माझ्या मित्रांनीही माझी स्तुति केली. मित्रांना आवडलेली अशी ती माझी पहिलीच गोष्ट.

त्याच वेळीं रागिणी आली असल्याचं मला कुणीतरी सांगितलं. तिची भेट

घेण्यास मी अतिशय उत्सुक झालों. माझी प्रसिद्ध झालेली गोष्ट तिला दाखविण्या-साठीं टेबलावर काढून ठेवली. पण दोन दिवस रागिणी घराबाहेर पडलेली दिसली नाहीं. तिसऱ्या दिवशीं सकाळीं मी झोपेंत असतांच दाराची कडी वाजली. मी दारवाजा उघडला. बाहेर रागिणी उभी होती. मी आश्चर्यानं पहात राहिलों. तिच्या कडेवर गोंडस मूल होतं.

मी डोळे चोचपडून उघडले. बाहेरचा प्रकाश रागिणीच्या अंगावर पडला होता. तिची प्रकृति चांगलीच झाली होती. तोंडावर रक्त दिसत होतं. डोळे चकाकत होते.

हंसत आंत पाऊल टाकीत तिनं म्हटलं,

'काय रे नाना! अजून तूं सूर्यवंशीच ना?'

कांहीं बोलायला न सुचल्यामुळं मी उगीचच हंसलों. ती आंत आली. खोलींतल्या अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तूंकडे पहात ती म्हणाली,

'छे! छे! अजून तुझा गबाळेपणा कमी आला नाहीं. थांब! तुझं लग्नच करून दिलं पाहिजे!'

आपल्या बोलण्यावर ती हंसली तेव्हां मी पण बळंच हंसलों. माझ्या मनांत मात्र वेगळेच विचार होते. तिच्यावर लिहिलेल्या गोष्टीचा अंक टेबलावर होता. योग्य वेळ पाहून तो तिच्यापुढं टाकला पाहिजे असा विचार मी करीत होतों.

रागिणी आंत येऊन माझ्या पलंगाकडे गेली. आपल्या मुलाला पलंगावर ठेवून ती त्याच्याशीं खेळूं लागली. तिनं त्याचा गालगुच्चा घेतला नि त्याचे ओंठ आपल्या ओठांत धरले. तिचं तोंड पुढं वाकलं असतां तिच्या मुलानं आपले चेमुकले हात वर केले. हात वर होतांच त्याची इवलीशीं बोटं तिच्या केसांत अडकली. केस ओढले गेल्यानं तिनं लाडिकपणं "अयाई!" केलं, नि खोट्या रागांत मुलाच्या हळूच थोबाडीत दिल्यासारखी करीत मला विचारलं,

'नाना! अजून तूं गोष्टी लिहीतोस का?'

मी म्हटलं,

'हो!'

हळूं डोकं खालीं नेवून केसांत अडकलेली मुलाची बोट सोडवीत तिनं म्हटलं,

'चांगल्या चांगल्या मासिकांत तुझ्या गोष्टी येत असतील आतां ! '

मी हूं केलं. मुलाचीं बोटं तिनं केसांतून सोडविलीं. मग त्याच्या मुठी आपल्या हातांत कुरवाळीत ती म्हणाली,

'नाना तुला अशी गोष्ट लिहिता येईल का ? '

मी विचारले,

'कशी ? '

झटकन् खाली तोंड नेऊन भराभर मुलाचे पांच दहा मुके घेत ती म्हणाली,

'अशी—अशी—अशी—'

मी कांहीं बोलणार तोंच थांबलों. माझ्या एकदम लक्षांत आलं, कीं ती माझ्याशी बोलत नव्हती. 'अजून गोष्टी लिहीतोस का ?—अशी गोष्ट लिहीता येईल का ? ' हें सारं विचारणं उगीचच होतं. तें मला किंवा कोणालाच उद्देशून नव्हतं. मी तिथं नसतों, तरी खोलींत आलेल्या चिमणीला किंवा टेबलखुर्चीला सुद्धां तिनं असच कांहीं विचारलं असतं नि आपल्या मुलाचे असेच भराभर मुके घेतले असते.

मी कांहीं बोललों नाहीं. मात्र तिला दाखविण्यासाठीं माझ्या गोष्टीचा अंक टेबलावर काढून ठेवला होता, तो तिचं लक्ष नाहीं असं पाहून हळूच टेबलाखालीं लपविला !



# आज बंगालचे शरद्बाबू असते तर--?

साईंथिया स्टेशनावर कमललतेला निरोप दिला नि आयुष्याचीं उलटलेलीं पानं, पुन्हा उलटून पाहण्याचा मोहसुद्धां होऊं नये म्हणून फाडून टाकलीं. मग पुढं आलेल्या कोऱ्या पानावर चारच अक्षरं लिहिलीं—राजलक्ष्मी. अशा रीतीनं राजलक्ष्मीच्या स्वाधीन हा देहच नव्हे तर सारं आयुष्य केलं नि निश्चिंत झालों.

त्यानंतर किती काल गेला हें सांगतां यायचं नाहीं. कारण कालाची गणना ठेवण्याचं कांहीच कारण नव्हतं. कसली चिंता नव्हती—कुणाची ताबेदारी नव्हती. कुणाची वाट पहाणं नव्हतं. राजलक्ष्मी सारं कांहीं संभाळून घेत होती. तिच्या जिवाची धावपळ वाढली होती. तिनं आपली देव-पूजा--अर्चा सारं कांहीं मलाच करून टाकलं होतं. एखाद्या देवस्थानच्या देवाप्रमाणं सकाळपासून रात्रीपर्यंत मला करायचे उपचार तिनं आखून ठेवले होते. म्हणूनच म्हणतों देवाप्रमाणं मलाही युगांचा पत्ता लागला नसता.

तो दिवस बरोबर कोणता ते मला आठवत नाहीं. त्या पहाटे लक्ष्मी रतनला घेऊन नदीवर स्नानाला गेली होती. झोप उडाल्यामुळें मी आळसावून पडलों होतों तोंच बाहेर एक परिचित हांक आली.

' दादा ! '

मी उठून खोलीबाहेर आलों. पहातों तों आमचा ब्रह्मचारी आनंद. त्याचा सारा चेहरा घामानं डबडबला होता. मला त्याचं नेहमी कौतुक वाटे. बिचारा पहावं तेव्हां

गडबडीत. कुणाच्या तरी दु:खानं हृदय कळवळलेलं, कुणाच्या तरी सेवेंत हात गुंतलेले. कधींकधीं त्याचा हेवा पण वाटे. मनांत येई, या माणसाप्रमाणं एखादं काम हिरीरीनं करावं असं मला कां वाटत नाहीं; एखाद्यासाठीं कांहींतरी करावं असं मन कां घेत नाहीं! मी हंसत त्याला म्हटलं,

' काय आनंद! आज कोणा भाग्यवंताला तुझी सेवा लाभणाराय्? '

पण आनंद गंभीर होता. तो म्हणाला,

' दादा! थट्टा बाजूला राहूं द्या! पण खरंच सांगतो—आज या वंगदेशाची सेवा करायला ज्याला मिळेल तो मात्र भाग्याचा. कधीं ऐकला नव्हता असा प्रसंग आपल्या देशावर ओढवलाय् दादा! '

' कसला प्रसंग बाबा? '

' भूकमारीनं देशांत थैमान घातला आहे. खेड्यापाड्यांत तांदुळाचा दाणा मिळत नाहीं. अन्नासाठीं खेड्यांतले लोक कलकत्त्याकडं जात आहेत. ज्यांना तिकडं जातां येत नाहीं ते जागच्या जागीं मरत आहेत. जे जात आहेत ते वाटेंत मरत आहेत. तांदुळाचा भाव मणाला दीडशें रुपये झाला आहे. हजारों खेडीं ओस पडलीं आहेत. दादा! माझ्याबरोबर चला. तुम्ही डोळ्यांनीं पहा! मी तर गांगरून गेलों आहे. या तुफानाला तोंड द्यायला आमच्याजवळ कांहीं नाहीं. आम्हांला धीर हवा आहे दादा! तुम्ही जरा माझ्याबरोबर चला तर—तुमची मदत होईल. '

त्यानं सांगितलेलं ऐकून चरकाच बसला. आजपर्यंत पुष्कळ सांथी आल्या, नि तांडवनृत्य करून गेल्या. पण ही भूकमारीची सांथ कधी न ऐकलेली गोष्ट होती. कधीं न ऐकलेली अशासाठीं कीं अर्धपोटीं आम्ही नेहमीच होतों. पण जे दोन घास आम्हाला मिळत होते त्यांवाचून आतां कुणाचं अडलं होतं? चिंधी नेसणाऱ्या इसमाची चिंधीसुद्धां लुबाडली जावी! त्या चिंधीवांचून कोण उघडं पडत होतं? मी आनंदाला म्हटलं,

' चल, मी येतों. '

' चला तर! आपल्याला परतायला उशीर होईल. बरोबर थोडीशी मिठाई

किंवा दुसरं कांहीं खाण्यास घेऊन ठेऊं या.' थोडसं थांबून तो पुढं म्हणाला, 'च्‌ ! सगळंच मुसळ केरांत. ताईला सांगायला हवं ना ! तिच्या परवानगीवांचून मीं तुम्हांला नेलं तर ती मला कधीं क्षमा करायची नाहीं.'

हो ! तें एक कोडं होतं खरं. माझ्या लक्षांतच आलं नव्हतं तें ! पण त्यामुळं माझ्यापेक्षां तोच जास्त गोंधळांत पडला होता. शेवटीं त्यानंच उपाय शोधून काढला.

'चिठ्ठी लिहून ठेवूं या आपण.'

मी म्हटलं, 'तसं कर.

आपल्या ताईला, राजलक्ष्मीला त्यानं चिठ्ठी लिहून ठेवली. दादांना कुठं घेऊन जात आहे, केव्हां परत आणणार इत्यादि. प्रॉमिसरी नोट लिहावी तसा गंभीर होऊन तो लिहीत होता. खरंच होतं तें. राजलक्ष्मीला तो माझ्याबद्दल प्रॉमिसरीच लिहून देत नव्हता का ?

आम्हीं स्टेशनवर आलों. स्टेशनवर पाऊल टाकतांच आनंदाला 'स्वामीजी, स्वामीजी' करीत कांहींजणांनीं घेरलं. बहुतेक ते लोक त्यानं निरनिराळ्या कामगिरीवर नेमलेले 'स्वयंसेवक' असावेत. कुणी प्रश्न करूं लागले, कुणी मोठ्यानं कांहीं सांगू लागले. भूकमारींत सांपडलेल्या लोकांसंबंधींच त्याचं चाललं होतं. कांहीं वेळानं आनंद माझ्याजवळ आला नि म्हणाला,

'दादा तुम्ही जरा येथेंच थांबता का ? तिकडं कुठं गडबड झाली आहे. भूकमारींतल्या लोकांनीं कलकत्त्याला जाऊं नये म्हणून आम्हीं आटोकाट प्रयत्न करीत आहोंत, पण कांहीं लोक बेभान झाले आहेत नि गांव सोडत आहेत असं कळलं. मी आत्तां जाऊन येतों.'

मी परवानगी दिली. तो गेला. हळूहळू तास गेला. मग दुसरा तासही संपत आला. आनंदचा पत्ता नव्हता. मलाही कांहीं घाई नव्हती. जवळ खाण्याचे जिन्नस आणले होते. आनंद परतेपर्यंत वाट पहायची ठरवून मी बांकावर बसलों. बसून थोडा वेळ गेला नाहीं तोंच कुणीतरी म्हटलं,

'बाबूजी !'

मी मान फिरवीत विचारलं,

' काय रे बाबा ? '

' तुम्ही उत्तरेकडे चाललांत काय ? '

कां कुणास ठाऊक मी आपला ' हो ' म्हणून गेलो. तो म्हणाला,

' एक काम कराल ! फार उपकार होतील. वाटेंत एक गांव आहे. ××× स्टेशनापासून नजीक आहे—पोथपूर. तिथं जायचं. माझी—माझी घरधनीण तिथं आहे. तिला निरोप सांगायचा कीं, कलकत्त्याला पोटाला धान्य मिळालं कीं लागोलाग तिला घेऊन जायला येतो. '

मी विचारलं. ' तिथं आणखी कोण आहे ? '

' फक्त घरधनीण. आई—बाप होते, पण निभेना म्हणून म्यां त्यांना बाहेर घालवलं. '

' बाहेर घालवलंस ! '

' म्याच एकट्यानं असं केलं नाहीं सान्या गांवानं केलं. घरांतली म्हातारीं-कोतारीं बाहेर घालविलीं. गांवांत तांदुळाचा दाणा नाहीं. पाऊणशे रुपये मणानं मिळतं होता. त्यासाठीं पैसा नाहीं, बाबूजी ! म्हातारी माणसं बाहेर गेलीं, मग आम्ही तरुण बाहेर पडलों. पुष्कळांनीं आपल्या बायकांना बाहेर हाकललं. पण म्यां मात्र घरधनिणीला तिथंच ठेवली. लई गोड आहे ती बया ! माझ्यावर तिचा फार जीव. मला जाऊन देत नव्हती बघा. पण म्यां म्हटलं—तुझ्या जीवावर माझा जीव टांगलाय ग बया ! माझ्या गळ्याची आन् आहे, तूं इथंच रहा. मी कलकत्त्याहून धान्य घेऊन येतो; तिला धीर द्यायला हवा बाबूजी ! जालना तुम्ही ? '

त्याच्या डोळ्यांत पाणी तरंगू लागलं. मी म्हटलं,

' जाईन बरं, जाईन, जरूर जाईन. '

पत्नीला निरोप पाठविण्याची आमची प्रथा अगदीं जुनी आहे. एकदां एका यक्षानं मेघाजवळ निरोप दिला होता. इथं मी मेघ झालों, पण जें जें वाटेंत पाहिलं नि अनुभवलं तें एखाद्या कालिदासानं रचलं, तर तें काव्य जगाला आग लावील, क्रांतीचा डोंब उठवील.

मी निघालों,—पौधपूरला जाण्यासाठीं आलेल्या गाडींत बसलों. वाटेंत जो तो, जिथं अन्न आहे असं म्हणतात त्या कलकत्त्याकडे जात होता. म्हातारे कोतारे, तरुण,—मुलं बाळं, स्त्रिया, सारे एकच मंत्र जपत होतीं. कलकत्ता—कलकत्ता.

पौधपूरला जवळ असलेल्या XXX स्टेशनावर उतरलों, तेथून पौधपूर एकच मैल दूर असल्याचं समजलं. स्टेशनाबाहेर पडलों नि वाट चालूं लागलों.

पण वाट चालतां चालतां संपेना. तो एक मैल पांच मैलांचा असावा. थकून एका झाडाखालीं बसलों. मग पिशवींतून बरोबर घेतलेले खाण्याचे जिन्नस बाहेर काढले. एक पदार्थ हातांत घेऊन फराळास सुरवात करणार तोंच कुठूनतरी आवाज आला,

‘ भात. ’

सूर अगदीं विलक्षण होता. माझे कान ती दिशा शोधूं लागले, पुन्हा आवाज आला,

‘ बाबूजी ! भात. ’

उठलों नि शोधूं लागलों. खरंच ! शोध घेतला नसता तर जें दिसलं तें कधींच दिसलं नसतं. लढाईंत पालापाचोळ्याखालीं मोटारी लपवितात; इथं कांट्याकुट्यांत माणसांचीं हाडं लपलीं होतीं. प्रयोगशाळेंतला हाडाचा सांपळा नि तिथं पडलेला हाडांचा सांपळा यांत कांहीं अंतर नव्हतं. आश्चर्य मात्र होतं. या सांपळ्यांतून आवाज निघतो तरी कसा ? तो एकच शब्द—भात ! भात ! शरीराकडं पाहिल्यावर त्यांत प्राण तर वाटत नव्हता. मग काय, प्राण गेल्यावर ज्यासाठीं प्राण गेला ते शब्द निघत राहिले ! भात ! भात ! अंगावर लज्जेपुरतंच वस्त्र होतं. पण वस्त्राची जरूर काय होती ? आता या नाजुक भावनांना तिथं थारा नव्हता. वस्त्र घालायचं तें त्या सार्‍या सांपळ्यावर. पण तेंसुद्धां त्या प्राण्याच्या लज्जेसाठीं नव्हे तर आपण जीं माणसं जीवंत आहोंत त्यांच्या लज्जेसाठीं.

मी मागें वळलों. स्वतःसाठीं काढून घेतलेला जिन्नस उचलून त्याच्यापुढं ठेवला. तो खाण्याचा पदार्थ पहातांच खोल हाडांच्या खांचेंत जाऊन बसलेले डोळे

क्षणभर चमकले, एक हडकुळा हात पुढं आला, पण त्या हाताला अन्न लागलं नाहीं. अन्न पाहूनच त्या देहाचंच नव्हे, पण त्यांतील आत्म्याचंही समाधान झालं.

तें दृश्य पहावेना म्हणून मान वळविली. तोंच चारी बाजूनं गिल्ला करीत दहाबारा पोरं आलीं नि त्या अन्नावर तुटून पडलीं. जें हातीं लागलं तें त्यांनीं तोंडांत घातलं. मी मागें वळून पिशवींतले सारे पदार्थ त्यांच्यापुढं ठेवले. त्यांची खाण्याची हिरहिरी डोळ्यांना पहावेना म्हणून तसाच पुढील प्रवासाला लागलों.

पौधपूरला आलों. पूर कसलं तें ! माणसं रहातात तें पूर. झोपड्या उभ्या आहेत तें नव्हे. छप्परं अर्धवट उतरलेलीं, पालापाचोळा, धूळ यानं माखलेली. फुटलेलीं, मडकीं अस्ताव्यस्त पडलेलीं, अनेक वर्षं पडून राहिलेलं घर दिसावं तसं गांव दिसत होतं. मी खुणेप्रमाणं गेलों नि दारांत उभा राहिलों.

आंतील बाजूस एक स्त्री उभी होती. तरुण होती कीं म्हातारी हें सांगतां आलं नसतं. स्त्रीत्वाचींसुद्धां फारशीं चिन्हं नव्हतीं. आंखूड झालेले केस नि त्यांत बटा, तोंड काळवंडलेलं, गात्रं गळलेलीं. माझ्या मनांत आलं, एकवेळ हीच मुलगी या घरांत वधू म्हणून हौसेनं नि तोऱ्यानं आली असेल. तिची अंगकांति नि तारुण्य मुसमुसलेलं असेल. भोंवतालच्या साऱ्या नजरा ती आपणाकडं खेंचून घेत असेल. आणि आज ? तें तारुण्य नाही. तो संसार नाहीं, खरंच ! अन्न नाहीं, म्हणजे कांहीं नाहीं.

मी कां नि कुठुन आलों हें सांगितलं. माझं बोलणं ऐकतांच ती रडूं लागली. आपल्या नवऱ्याविषयीं तिनं बरंचसं विचारलं, नि कलकत्त्याबद्दलही विचारलं. मग एकदम् ती म्हणाली,

'मी विसरलें, तुम्ही उपाशी असाल ?'

मी म्हटलं 'छे ! छे ! खाऊन निघालों, आत्तांच फराळ केला.'

'आमच्या हातचं चालणार नसेल तुम्हांला ?'

तिला काय उत्तर द्यावं हें कळेना, पुष्कळ उत्तरं तोंडावर आलीं, पण गिळलीं. आम्ही चातुर्वर्णीय लोक आतांपर्यंत अट्टाहासानं जात पाळीत आलों आहोंत. जगांतील कोणत्याही शक्तीला हा आमचा अभेद्य जातिदुर्ग जिंकतां आला

नाहीं असा आमचा दावा होता. त्याला उत्तर देण्यासाठींच ही भूकमार आली असावी. तिनं माणसांमाणसांतले भेद पार नाहींसे केले. तिच्या या येण्यांत आपणाला कांहीं नवं सांपडेल का ? शोधलं तर सांपडेलही.

तिच्या हातचं खायला हरकत ती कसली ? पण हातचं खायला हातांत कांहीं असावं लागतं. त्या कांहींचाच तर पत्ता नव्हता. बऱ्याच लगबगीनं शोधशोधून तिनं एक कारंजा पुढं आणला. मला कच्चा कारंजा खाण्याइतकी भूक नव्हती. मी नको म्हणून म्हणतांच विशेष आढेवेढे न घेतां तिनं तो कचाकचा खाऊन टाकला. खाऊन झाल्यानंतर ती कांहींशी शरमली. मग म्हणाली,

' हा शेवटचा कारंजा. '

मी विचारलं, ' पुढं काय करणार ? '

' इतर लोकांनीं केलं तेंच. '

' काय केलं त्यांनीं ? '

' इथं कुठंतरी मरणाची वाट पहात बसले. अशा वेळीं त्यांतल्या त्यांत घरांतली आवडीची जागा बघायची. मी तुळशीवृंदावनाजवळ बसणार आहें. '

तिच्या श्रद्धेचं हंसूं आलं. मरण कसंही येवो, त्याची फिकीर नाहीं. फिकीर... तर स्वर्ग कसा मिळेल याची. थोडा वेळ आम्ही मुके बसलों. मग ती म्हणाली,

' मला घेऊन चला ना कलकत्त्याला. इथं काय करूं ? तिथं अन्न मिळेल. अन्न नाहीं मिळालं तर हा देह त्यांच्या चरणावर रुजू होईल. '

कलकत्त्याला अन्न मिळेल हा मंत्र मी आजपर्यंत अनेक वेळां ऐकला होता. लोकांच्या श्रद्धेचं कौतुक वाटलं होतं तेव्हां. पण आतां मलासुद्धां थोडं थोडं तसंच वाटूं लागलं. मिळेल, तिथं अन्न मिळेल. तिला मिळेल, तिच्या नवऱ्याला मिळेल. चला जाऊं या !

गांव सोडतांना तिच्याजवळ कांहीं व्याप राहिला नव्हताच. निरोप घ्यायलाही कुणी नव्हतं. असं म्हणतात कीं, ज्वालामुखीच्या स्फोटांत जिथं असेल तिथं माणूस गाडलं जातं. भूकमारीचा स्फोटही तसाच. जिथं माणूस बसेल तिथं पडतं.

मृत्यूची वाट पहात पडतं. गांवांतून जातांना झोपड्याझोपड्यांतून त्या भेसूर आकृतिंचे अवयव दिसत होतें.

आम्ही दोघं स्टेशनवर आलों. तिथं आमच्यासारखे कितीएक भूक–प्रवासी होते. स्टेशनावरचे अधिकारी त्यांना मज्जाव करीत होते. माझ्याबरोबरच्या त्या मुलीनं विचारलं,

'आतां काय करायचं ?'

मी म्हणालो ' तिकीट काढायचं.'

'पैसे आहेत ?'

'हो.'

'जास्त आहेत ?'

'किती पाहिजेत !'

ती म्हणाली, 'ही गर्दी करीत आलेली माणसं आमच्याच पंचक्रोशीतील आहेत. कांहीं सोयरीधायरी आहेत. त्यांनाही नेता आलं तर पहावं म्हणून म्हणालें.'

'ठीक ! माणसं मोजून पहा. जेथपर्यंत निभेल तेथपर्यंतचीं सर्वांची तिकीटं काढूं. पुढचा प्रवास पायी.'

'असंच करावं.'

माणसं मोजलीं नि तिकीटं काढलीं. सर्वांचा शंभर मैलांचा प्रवास बांधला, तिकीटाचं अंतर संपतांच आम्ही उतरलों नि रस्त्यानं कलकत्त्याकडं चालू लागलों.

अशा रीतीनं आमची अन्नयात्रा सुरू झाली.

वाटेत अन्नधान्य मिळविण्याचा आम्ही आटोकाट प्रयत्न केला. मग भोवतालच्या झाडपाल्यावर हल्ला केला. केळीचे बुंधे आमच्या उदरांत गडप झाले. गॅच गवत आम्ही भस्म केलं. आमची कृत्यं पाहून तो विश्वामित्र लाजला असता. एकीकडं अमीन पिकाची पिवळी होऊं घातलेली पिकं डोलत होती. दुसरीकडं आम्ही भुकेनं थकून झोके खात जात होतो..

एका गांवांत कळलं कीं पंधरा मैल पुढं असलेल्या गांवी धान्य वाटीत आहेत. प्रत्येकाला एक शेर तांदूळ मिळतो. एक शेर ! आम्हांला फक्त एक दाणा पुरे होता. दाण्यागणिक मैल चालण्याची आमची तयारी होती. नवल नाहीं. जड झालेली आमची पावलं हलकी पडूं लागली, थंड होत आलेली हृदयाची यंत्रे जोरानं फिरूं लागलीं. परस्परांकडे न पहातां आम्ही तो प्रवास आटोपला,

तिथं आलों तो काय ? एका गांवाभोवतीं जितक्या दिशा काढतां येतील तितक्या दिशांकडून आमच्यापेक्षांही जास्त अंतर चालून लोक आले होते. कितीतरी रात्रभर रांगेत उभे होते. आम्ही पण येऊन रांगेत जागा पकडली. रांग मुंगीच्या पावलानें पुढें सरकूं लागली. ज्यांना इतका वेळ उभं राहणं शक्य नव्हतं ते बसून सरकूं लागले, व ज्यांना बसणं शक्य नव्हतं ते निजून शरीर लोटूं लागले. पण साऱ्यांच्या तोंडावर उत्साह दिसत होता. मिळणार, तांदूळ मिळणार ! चार इंच पुढं सरकतांच हायसं होई. पावलं उंच करून पहावं तर हीं डोकीं दिसायचीं. मग खालीं मान घालून पुन्हां पुढं जाण्याची वाट बघायची.

असेंच उभे होतों. एकाएकीं हलकल्लोळ उडाला. कुणीतरी ओरडत होते— तांदूळ संपले, तांदूळ संपले. उभे राहिलेले आमचे पाय गळाले, डोळ्यांत आलेलं तेज विझलं, कमरा खचल्या, रडण्याची शक्ती होती ते ओक्साबोक्सी रडूं लागले.

जगांत कांहींएक अमर नाहीं—फक्त आशा ! अजून काय झालं होतं ! हें गांव गेलं ? ठीक ! कलकत्ता तर उभं आहे ना सगळं ? नाहींतरी त्याच आशेनें निघालों. चला, निघा !

असं स्वत:शीं म्हणत सारे निघाले. हिंमत नव्हती ते तिथंच बसले. त्यांची पूसतपास कोणी केली नाहीं. मागं पहायला वेळच नव्हता. भुकेचा खवीस मागं [illegible] होता ना ! मागं वळून पहाणाराला तो गाडीत होता. काळ नि मृत्यू यांच्यांतलि हा भीषण झगडा होता. कलकत्त्यांत पोहोचण्यास जिवंत रहायला हवं, जिवंत रहाण्यास अन्न मिळायला हवं, असं तोंड नसलेलं कोडं होतं तें

आम्हीं जसजसे पुढें जात होतों तसतसे तांदुळाचे भाव वाढलेलेच ऐकत होतों. मणाला पाउणशें, सवाशें, दीडशें रुपये. आमच्या देशाचं सुवर्णभूमी नांव

सार्थ झालं होतं. गवताच्या काडीला नि गंजलेल्या पदार्थांना मुद्दां भाव आला होता. भाव नव्हता तो माणसानाच काय तो !

दैव बलवत्तर खरं ! पुढच्याच गांवीं अन्नघर नि शुश्रूषाघर लागलं. आम्हांला सर्वांना दाखल करून घेण्यांत आलं. पांढऱ्या पोषाखांतले सेवक–सेविका, गळ्यांत नळी अडकविलेले डॉक्टर इकडून तिकडे हिंडत होते. जिथं आम्हांला ठेवलं होतं तिथं कसलंतरी गुदाम होतं. मूळची घाण. बिछाने गवताचे होते. खाण्यासाठीं पेज होती. जिकडे तिकडे दुर्गंधी सुटली होती, अस्थिपंजर झालेल्या अर्धनग्न स्त्रिया पडल्या होत्या, मुलं आक्रोश करीत होतीं, जागोजाग शौच नि ओकाऱ्या यांची थारोळी माजली होतीं, पण तेथील आजाऱ्यांना त्याची शुद्ध नव्हती. कारण ते शुद्धीच्या पलीकडे गेले होते. जे शुद्धीवर होते त्यांचं लक्ष तांदुळाच्या पेजेकडं लागलं होतं.

आम्हांला अन्न मिळालं, पण पुष्कळ त्या अन्नानंच मेले. कारण त्यांची पचन-शक्ति गेली होती, सगळ्याच शक्तींना ऱ्हास आला होता. कुणाची स्मृति गेली होती, कुणाचे हातपाय ढिले पडले होते, कुणाची वाचा बंद झाली होती. मरणाहूनही भयंकर असे हे परिणाम होते. तरीपण मिळणारं अन्न खायला कुणी डरत नव्हतं.

तीन दिवस पेजेवर चैनींत काढले. आमच्यापैकीं कांहीं लोकांना तेथून रजा दिली. पण जे बाहेर आले त्यांची सोय काय ? पुढची सोय अशी कीं, त्यांनीं पुन्हां भुकेनं हैराण व्हावं नि पुन्हां तिथं जावं.

त्याच दिवशीं स्वयंसेवक, नर्स, डॉक्टर, घाबऱ्या घाबऱ्या इकडे तिकडे धांवूं लागले. इतक्यांत एकएक कार्यकर्ता येऊन सांगूं लागला कीं, ज्यांना चालण्याची शक्ति आहे त्यांनीं शुश्रूषाघर सोडावं नि गांवाबाहेर जावं. आतां या गांवांत कुणालाही राहातां येणार नाहीं. कुणी सरकारी अधिकारी येणार आहे. उपासमारीचीं अमंगळ दृश्यं येथें नकोत.

आम्हांला लगबग शहराच्या बाहेर हाकलण्यांत आलं. आमच्या मागोमाग शुश्रूषाघराचीं दारं बंद झालीं. आंतले निर्जीव रोगी आंत होतेच पण बाहेर आम्ही

तिथं असल्याचा एकही खूण त्यांनी ठेवली नाहीं. भोंवतालच्या आवारांत चारदोन ढोरं चरायला सोडलीं.

इकडे गांवाबाहेर झाडाखालीं बसून आम्ही कल्पना करीत होतों: आतां अधिकारीसाहेब गांवांत आले असतील. त्या शुश्रूषाघरावरून जात असतां गांवचे अधिकारी सांगतील हें एक गुदाम आहे, ओसाड आहे, इथं गुरं चरतात. छे ! छे ! इथ भूकमारीचा संबंधमुद्दां नाहीं. अगदीं बिलकूल नाहीं. मग अधिकारीसाहेब आपल्या राज्यांतील आबादीआबाद पाहून पुढं जातील.

अशा कल्पनांत होतों तोंच दोनचार बंदुकीचे बार ऐकूं आले. ते स्वागताचे असावेत असं आम्हांला वाटलं. पण मागाहून कळलं कीं कांहीं कोल्हीकुत्रीं ठार मारलीं गेलीं. कारण त्यांच्यामुळंच बंगालमध्यें हा अन्नाचा तुटवडा आला होता. लोक उपाशी मरूं लागले होते गटारावर टाकलेलं धान्य हीं कोल्हीकुत्रींच पळवीत होतीं ना !

आम्ही ठरवलं कीं दुसऱ्या कुणासाठीं नव्हे पण त्या कोल्ह्याकुत्र्यांनीं जिवंत रहावं म्हणून त्या गांवांत जायचं नाहीं. पुढं कलकत्त्याकडं चालायचं.

अशा रीतीनं ही भूकयात्रा पुढं चालूं लागली.

भूकयात्रा तर खरीच ! यात्रेकरू पुरे भाविक होते. थकत होते पण पावलं टाकीत होते. निर्बल झाले ते बाजूच्या झाडाखाली किंवा शेतांत पडून रहात होते. ते मृत्यूची वाट पहात बसत होते, नि आम्ही पुढं जात होतों. जणूं ही भूकमार मैलोंमैलावर खुणेचे टप्पे ठेवीत पुढं चालली होती.

वाटेत एक विचित्र गोष्ट घडली. राजलक्ष्मिनं मला चकित केलं. बरंचसं अंतर चालून एका लहानशा गांवांत प्रवेश करीत होतों, तिथं कांहींतरी गडबड दिसली. मग बातमी आली कीं एक देवी सर्वांना तांदूळ वांटीत आहे. तिनं पांढरं पातळ नेसलं आहे नि गळ्यांत माळ आहे. मीं म्हटलं कोणी कां असेना, तांदूळ मिळाले कीं झालं. मी पुढें झालों नि दुरूनच पाहिलं. दचकून त्याच पावलीं परतलों. पांढरे पातळ नेसलेली राजलक्ष्मीच होती.

आम्हीं कलकत्त्यांत शिरलों. अन्नपूर्णेला मी म्हटलं,

‘ डोळे उघडे ठेव ! तुझा नवरा दिसेल,— सासुसासरा दिसतील. ’

नि तसंच झालं. कुणीतरी झटकन् बाजूच्या बोळांत वळत असतां ती म्हणाली,

‘ ते पहा. ’

‘ कोण ? ’

‘ माझे घरधनी. ’

आम्ही झरझर पावलं उचललीं नि बोळांत शिरलों. पण गेलेल्या माणसाचा पत्ता लागला नाहीं. मी विचारलं,

‘ तोच होता का ? ’

‘ होय ! ’

‘ त्यानं तुला पाहिलं ? ’

‘ पाहिलं असं वाटतं. ’

‘ म्हणजे ’—

ती काय सांगणार—तें काय कुणी सांगायला हवं ? तिला ओळख देऊन तो काय करणार ? जर कधीं कुठं अन्न मिळलं तर त्यांत एक भागीदार व्हायचा. सूज्ञपणानंच त्यानं तिला टाळलं.

हिंडतांहिंडतां तिची सासूसासरा दिसलीं. डोकं खालीं टेकून दोघं फुटपाथवर पडलीं होतीं. ती त्या दोघांकडं गेली. एकीचा प्राण गेला होता, दुसरा आंधळा झाला होता.

सारं कलकत्ता शहर अशाच लोकांनीं भरलं होतं. रस्त्याच्या कडेकडेला तांडेच्या तांडे डोकं जमिनीवर टेकून पडले होते. कुणी कण्हत नव्हतं कीं रडत नव्हतं, कीं आकांत करीत नव्हतं. क्वचित् कुणी एखाद्या शहरवासीया जवळ भात मागितला तर तोसुद्धां त्या शहरवासीयाच्या कानाला त्रास न होईल अशा बेतानेंच. त्यांनीं कांहीं दिलं तर ठीक, नाहींतर पुन्हा आपलं जमिनीवर डोकं.

[illegible]

वाटत होतं. कांहीं मिळालं नाहीं तर गटारांतील शितं होतींच. हलवायाच्या दुकानासमोर त्यांतील पदार्थांकडे दृष्टी लावून किती एक बसले होते.

पण–कुणी उठून त्या दुकानावर हल्ला केला नाहीं. चुकून एकानंही केला नाहीं. ती शक्तीच नव्हती त्यांच्यांत. शतकानुशतकं ते गुलाम होते. डोक्यावर हजारों वर्षांचं ओझं होतं. जमिनदाराचं, पोटजमिनदाराचं, पोट–पोट–जमिनदाराचं. कसलेही गुणदुर्गुण नसलेलीं माणसं बनलीं होतीं तीं.–थोडक्यांत तीं माणसं राहिलीं नव्हतीं. कर्तव्य, दया, धाडस निर्दयपणा, हावरेपणा, धूर्तपणा, कांहीं कांहीं म्हणून त्यांच्यांत नव्हतं. सांगाल तें करायचं, मिळेल तें खायचं, नाहींतर हें असं शांतपणें उपाशीं मरायचं.

नि यांना असं खची करून यांच्या श्रमावर उभे राहिलेले जमीनदार आतां आपापलीं गांवं सोडून शहरांत येऊन राहिले होते. त्यांच्या डोळ्यासमोर ही उपासमार होत होती, पण कुणी पुढं होऊन असं म्हणत नव्हतं कीं, हें तुमच्यासाठीं अन्न ठेवलं आहे. या !

खरंच ! या भूकमारीचा दोष कुणावर लादायचा. सारं कलकत्ता शहर याच प्रश्नानं दुमदुमलं आहे. जिथंतिथं हेच वादविवाद. जमिनदार व्यापाऱ्यावर, व्यापारी जमीनदारावर तोहमत घेतात. प्रांतिक सरकारांची गोष्टच न्यारी नि भारतसरकारची त्याहून न्यारी. बंगाल म्हणतं पंजाब नि सिंध सरकारानं साठेबाजी केली. पंजाबसरकार म्हणतं बंगाल सरकारला आम्ही गहूं दिला, पण त्यानं भरमसाट किंमतीला तो व्यापाऱ्यांना विकला व नफा केला. बंगाल नि सिंध म्हणतात—पुरेशा वाहतुकीच्या साधनांच्या आभावीं हें झालं. याचा दोष हिंदुस्थान सरकारकडं. अशी या परस्परांत लाथाळी चालू होती. दोष दुसऱ्यावर लादण्याची आटापीटी चालली होती. त्या आवेशानं सारीं वर्तमानपत्रं दुथडी भरून चाललीं होतीं. नि इकडे माणसं मरतच होतीं.

शहरांत येणाऱ्या भूकमारीच्या लोकांत स्त्रिया अधिक होत्या. कां ? तर स्त्रियांना घराबाहेर हाकलून देण्याइतकं सोप कांहींच नसतं. या स्त्रिया मुलांना कटिखांद्यावर

घेऊन भात, भात करीत फिरत होत्या. फिरून फिरून दमल्या कीं गटारावर पडत होत्या. मूलं रडूं नयेत म्हणून त्यांनीं आपला स्तन त्यांच्या तोंडांत द्यावा नि त्या स्थितींत प्राण गेला कीं त्या शुष्क स्तनांवर मूल तसंच पडून रहावं नि कांहीं वेळानं त्यानंही आईमागं निघून जावं. तरुण तरुण स्त्रिया पण होत्या. त्यांना पाहून शहरांतील व्यापारी बुद्धीच्या लोकांची बुद्धी चालू लागली. त्यांनीं त्या स्त्रियांना कुंटिणखान्यांत ओढलं.

माझी नि अन्नपूर्णेची स्थिति आतां वाईट होत चालली होती. लौकरच आम्हाला पण जमिनीवर डोकं टेकावं लागणार असं दिसत होतं. अशा विचारांत बसलों असतां अचानक एकानं पुढं येऊन अन्नपूर्णेचा दंड ओढीत म्हटलं,

‘ चल ऊठ! आधीं माझ्याबरोबर चल ! ’

मग माझ्याकडे वळून तो ओरडला,

‘ माझी बायको घेऊन हिंडतोस. दुसऱ्याची बायको घेतांना लाज वाटत नाहीं ?—’

मी कांहीं न बोलतां अन्नपूर्णेकडे पाहिलं. ती उठली नि पायाला स्पर्श करून म्हणाली,

‘ हे माझे पतिदेव आहेत मी जातें. ’

तीं दोघं निघून गेल्यावर मी स्वस्थ बसून राहिलों. आधींच भुकेनं निर्बल केलं होतं, त्यांत हा प्रसंग घडला. मला राहून राहून वाटत होतं कीं तो तिचा नवरा नसावा. माझ्यावरचा भार कमी करण्यास ती गेली असावी.

दोन तास गेले असतील. ‘ बाबूजी, बाबूजी ’ म्हणून कुणीतरी हांक मारीत आलं. मी वळून पाहिलं तों मघाचा तिचा नवराच होता. पायांत शक्ति असती तर खात्रीनं उठून तेथून झपाट्यानं चालूं लागलों असतों. पण नाइलाज होता. तो येऊन माझ्या जवळच बसला. त्यानं बरोबर रुमालांत बांधलेली पुडी बाहेर काढली. त्यानं त्यांतून भात बाहेर काढला.

रत्नं दिसावीं तसा हर्ष मला झाला. भात ! खरंच तो भात होता. तो मला म्हणाला,

‘ ये दोस्त ! खाऊन टाक ये. ’

मीं हात पुढं केला. तो म्हणाला,

‘ तिला वचन दिलं म्हणूनच तुला शोधींत आलों. ’

मी विचारलं,

‘ कसलं वचन ? ’

‘ जो भात मिळेल त्यांतून तुला थोडा द्यावा. ’

‘ भात कुठून मिळायचा ? ’

तो हंसला.

‘ तिची किंमत आली बाबा ! प्रश्न विचारून सतावूं नकोस. एक पसाभर भात तिच्या बदलांत मिळाला. तिला तेथें राहायला नि खायला मिळालं. ’

मी ताडकन् उभा राहिलों नि ओरडलों,

‘ काय ? ’

‘ कांहीं नाहीं. एकच बायको केल्याचा पश्चात्ताप होत आहे. दोन बायका असल्या तर दोन पसा भात मिळाला असता. तीन असल्या—’

मला ऐकवेना. पायानं त्याच्या समोरचा भात दूर भिरकाविला. मी रुमाल भिरकावतांच तो संतापानं चिडून उभा राहिला नि मला जोरानं एक ठोसा दिला. मी खालीं कोसळलों. इतक्यांत—

मोटारींची घरघर आमचेजवळ येऊन थांबली. भरभर मोटरींतून पोलीस उतरले, नि त्यांनीं फुटपाथवरच्या भुकमारीच्या लोकांना उचलून मोटारींत टाकण्यास सुरवात केली. कांहीं धडपडत होते, कांहीं आपखुशीनं जात होते. बहुतेकांना हलण्याचीसुद्धां शक्ति नव्हती. आमच्या मोटरी शहराबाहेर जाऊं लागल्या. झालेल्या दगदगीनं माझा देह इतका शिणला होता,—वाटेंतच मी बेशुद्ध झालों.

शुद्धीवर आलों तेव्हां मनस्वी अशक्तता वाटत होती. मन हळवं झालं होतं नि सारखं रडूं येत होतं. असं किती पाणी गेलं कुणास ठाऊक. इतक्यांत राजलक्ष्मीचा स्वर मी ऐकला. ती मला म्हणत होती,

'आतां किती अश्रू गाळायचे बरं?'

मी म्हटलं,

'लक्ष्मी! मला पोटभर रडूं दे! माझ्यासारखा दुर्बल जीव दुसरं काय करणार?'

पदरानं तिनं माझे अश्रू पुसले. मग आपल्या गालावर ओघळलेलीं मोत्येंही तिनं टिपलीं. मग ती म्हणाली,

'असं बोलूं नका. तुमच्या अश्रूंची शक्ति तुम्हास ठाऊक नाहीं. आमच्या-सारख्या साध्यासुध्या माणसांचे ते अश्रू नाहीत. आम्ही लहान माणसं आपापल्या सुखदु:खांत गिरक्या घेत असतां कुठं जातों, काय करितों, नि काय होत आहे याचा आम्हाला कसलाच पत्ता लागत नाहीं. स्वत:चीं सुखदु:खं तुम्ही विसरले अहांत. आमचीं दु:खं पहात असतां हे अश्रू ओघळले आहेत. म्हणूनच म्हणत्यें कीं, त्यांची शक्ति अमोघ आहे. ज्या कुणी आम्हांला अन्नाशिवाय मारलं त्यांना हे तप्त अश्रू भस्म केल्याशिवाय राहाणार नाहींत.'

किंचित् हंसून मी म्हटलं,

'लक्ष्मी! तुझं बोलणं खरं ठरो.'



## लहानपण आणि मोठेपण !

घरांतलं सर्वांत लहान मूल अवघं तीन वर्षाचं होतं. पण दारीं आलेल्या सावकाराची बोळवण करण्याची आपल्या वडिलांची युक्ति त्या बेट्या-च्याही पुरी लक्षांत आली होती. दरवाजांत कुणीही आलं कीं हा लहानगा पोरगा तुरुतुरू पुढं येई नि सांगे,

' बाबा घलांत नाहीत. उद्यां या. '

नि त्याच वेळेला त्याचे बाबा माजघरांत खोलींत खोकत बसलेले असायचे. दम्याचा विकार होता त्याना. वर्षाचे सहा महिने या विकाराशीं झगडण्यांत निघून जात. दम्याची उबळ आली कीं सारं शरीर हिसळूं लागे. तोंड फुलून येई. डोळे खोबणीबाहेर पडतील असं वाटे. मानेच्या शिरा सुटतील अशा फुगत. दोन्ही हात जमिनीवर टेकून ते खोकूं लागले कीं त्यांचा अवतार असा भयंकर होई कीं लहान मुलं उठून दुसरीकडे पळून जात. लहानसा खांकरा निघतांच मोठा श्वास सोडून आपलं डोकं ते पुढं ठेवलेल्या तक्क्यावर टेकीत. अगदीं लीनदीन होऊन ते तसेच पडून रहात. बायकोला चहाचा हुकूम सुटलेलाच असे. चहा येतांच प्रत्येक घोटाबरोबर तोंडावर तजेला येऊं लागे. चहापानानंतर धूम्रपानास सुरुवात होई. मग धुराच्या ठसक्यानं दम्याची पुन्हा उबळ येईपर्यंत विडीचे झुरके चालू असत. ठसका लागला कीं पुन्हा खो–खो सुरू होई नि विडी फेंकली जाई.

जरी असं होतं तरी गृहस्थ दमदार होता. लढवय्या होता. कोरडी हवा पडली

की दम्याचा जोर कमी होई. मग दम्याशीं झगडण्यांत खर्च होणारा जोर बाबाच्या जिभेंत येऊन बसे. त्या लढाईत त्यांना हरवणारा वीर अजून निपजायचा होता. जगांत बाबांना मत देतां आलं नाहीं अशी गोष्टच नव्हती. कुठून कुठून गुप्त बातम्या हळूच त्यांच्या कानाशीं येऊन पुटपुटून जात. साऱ्या जगाची चौकशी त्यांना असे.

बाबा फार शिकलेले नव्हते. पण तसं कळून आलं नसतं. वयाच्या पंचवीस वर्षांपर्यंत पांचवी गांठण्याची त्यांनीं खूप धडपड केली. पण त्या वेळेला शहरापेक्षां खेडेगांवचा ओढा फार होता. त्यामुळं वर्षाचा बराचसा काळ या नाहीं त्या कारणानं ते खेडेगांवांत घालवीत त्या काळांत आपलं तारुण्य त्यांनी बरंचसं गाजवलं. तमाशाचा षौक केला. अधूनमधून ताडीमाडीच्या संगतींत काळ घालविला. कुणबिणी ठेवल्या. कपडे नि अत्तरं यांची हौस फेडून घेतली. आणि मग एक असंच प्रकरण झालं. ती बाई विधवा होती. दोन्ही घराण्यांची अब्रू जात होती. त्या बाईला उचलून शहरांत कुठल्यातरी आश्रमांत टाकण्यांत आलं नि मुंबईची आलेली एक मुलगी पसंत करून बाबांना बांधून टाकलं.

नि खरंच बाबा बांधले गेले. लग्न होतांच सारा नूर बदलला. सारे षौक गेले. खेडेगांवांत चैन पडेनासं झालं. बायको शहरांतली त्यामुळं तसं झालं असेल. पण एके दिवशीं भावाशीं भांडून बाबा बायकोला घेऊन मुंबईस सासुरवाडीस आले. सासरच्या लोकांनीं त्यांना एक नोकरी पाहून दिली नि बिऱ्हाड थाटून दिलं.

त्यानंतर वर्षांवर वर्षं गेलीं. कितीतरी उद्योग झाले. धडपड्या नि बोलक्या वृत्तीनं बाबांना कुठं कमी पडलं नाहीं. सात मुलं झालीं तरी संसार जाणवला नाहीं. पडेल तो खर्च चालू होता. मुलं शहरी थाटांत वाढत होतीं. मग दम्याचा विकार उद्भवला तिथं सारी सुबत्ता संपली. स्वतःला लागलेल्या संवयी सुटेनांत. मुलांना लावलेल्या संवयी सोडण्यास सांगवेना. पैसा कमी येऊं लागला. पण बाहेर लोकांना दाखवायचा देखावा कमी करावासा वाटेना.

पण हें नाटकही फार दिवस चालवितां आलं नाहीं. ज्या लोकांत मानानं राहिलों त्या लोकांत कमीपणानं रहाणं पटेना. म्हणून एका लहानशा चाळींत दोन खोल्यांत सारं बिऱ्हाड आणलं. काटकसरीला सुरवात झाली.

याच वेळीं खेडेगांवीं भाऊ नि भावजय दोघांना देवाज्ञा झाल्याचं पत्र आलं. कल्पना नव्हती इतकं थोडं त्यांनीं मागं ठेवलं होतं. एक बिघा जमीन नि पडकं घर हीच इष्टेट निघाली. नाहीं म्हणावयास आणखी एक गोष्ट तो भाऊ ठेऊन गेला. त्याची निराश्रित बहिरी सासू.

या सगळ्या परिस्थितीमुळं पूर्वी नातं जोडलेल्या सावकारांची माया सुटली नाहीं.

सर्वांत मोठा मुलगा नाना, बाबांचा अतिशय लाडका. वर्गांत त्याचा नेहमीं पहिला नंबर असे. त्यामुळं तर अधिकच अभिमान वाटायचा. दमा होण्यापूर्वी कुणी आलं कीं बाबा म्हणत,

'गोविंदराव ! हा आमचा मोठा मुलगा बरं ! पहिला नंबर असतो नेहमीं. मास्तरांना येत नाहींत तीं गणितं सोडवितो. गोविंदराव ! मी ठरविलंय. जीवाचा वाटेल तो आटापीटा होवो, आमच्या नानाला मी विलायतेला धाडणार. येऊनजाऊन दहावीस हजार रुपये लागतील. पुरचुंडी बांधून त्याच्या स्वाधीन करीन नि सांगेन.—जा पाहूं जाऊन ये विलायतेला.'

दम्याच्या विकारानंतर बाबांच्या या भाषेंत बदल झाला. गोविंदरावांशीं बोलतांना ते म्हणूं लागले,

'गोविंदराव ! हा आमचा ज्येष्ठ मुलगा नाना. काय करूं ? मी असा दम्यानं पडलेला नाहीं तर पोराला विलायतेहून आणला असता. फेकले असते दहावीस हजार नि म्हटलं असत ये जाऊन. पण या दम्यानं घोटाळा केला. आनुवंशिक असतो ना तो ! आमच्या चुलत चुलत आजीला होता म्हणे.'



बाबांचा हा ज्येष्ठ मुलगा नाना, एन्. व्ही. हायस्कूलच्या पांचवीच्या वर्गांत होता.

पांचवीच्या वर्गांत त्या वर्षी निम्म्या मुलीच होत्या. साहजिकच वर्गांत दोन तट पडले होते. एक पक्ष मुलांचा, दुसरा मुलींचा. मग लवकरच या दोन पक्षांत लढाई जुंपली.

जिथं शिक्षक मधे आले तिथं हें भांडण चिघळूं लागलं. मुली म्हणून मुलींना मिळणाऱ्या सवलतीसुद्धां मुलांना पहावेनाशा झाल्या. अशा सवलती देणारा शिक्षक तरुण असला तरी विद्यार्थ्यांत अप्रिय होऊं लागला. मुलींची तक्रार ऐकून एखाद्या तरुण शिक्षकानं 'जाऊं द्या रे ! मुली आहेत त्या' असं म्हटलं तर तें या मुलांना पटत तर नसेच, पण ते त्या शिक्षकावर मात्र खवळत. त्यांचा राग पाहून शिक्षकही चिडत. कुणालाच कुणाचं मन कळत नव्हतं. कसं कळावं ! चौदा-पंधरा वर्षांच्या मुलांची स्त्रीकडं पहाण्याची दृष्टि नि पंचवीस वर्षांच्या तरुणाची स्त्रीकडं पहाण्याची दृष्टि यांतील फरक होता तो !

त्या वर्षी शाळेचं गॅदरिंग जवळ आलं नि मित्रांच्या आग्रहावरून नाना सेक्रेटरीच्या जागेसाठीं उभा राहिला तेव्हां त्याच्यापुढं एक मोठा प्रश्न आला मुलींची मतं कशी मिळवायचीं ? मित्रांपैकी एक म्हणाला, 'ज्यांच्याशीं आतांपर्यंत भांडलों त्यांचे पाय धरायला जायचं ? छी !'

पण आपण मत मागायला न जावं तर दुसरा कुणी तरी तें मागायला जाणारच. हें उघड होतं. त्यामुळंच त्या म्हणण्याला कुणी टेकू दिला नाहीं. शेवटीं नाना म्हणाला,

'मुलींचीं मतं मागायला मला कांहींच हरकत दिसत नाहीं. आपण भांडलों हें खरं आहे. पण ते तत्वासाठीं भांडलों. भांडायचं म्हणून भांडलों नाहीं. वर्गांत चहाड्या करावयाच्या, गोड बोलून सरांजवळून जास्त मार्क घ्यावयाचे असं त्यांनीं केलं म्हणून आपण भांडलों नि पुढंही भांडूं. त्या मतांचा याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. गॅदरिंग सर्व शाळेचं आहे.'

वर्गांत दोन श्रीमंत मुली होत्या. त्या मोटारींतून शाळेंत येत. पैसा आणि अवखळपणा या दोन गुणांमुळं त्या दोघी वर्गाच्या पुढारी होत्या. त्या दोघींचीं मतं मिळविलीं कीं इतर मतं मिळायला अडचण पडणार नाहीं असं योजून नाना प्रथम प्रतिमा देशमुखांच्या बंगल्याशीं आला. बाहेरची बेल त्यानं दबकतच दाबली.

प्रतिमेच्या नोकरानं दरवाजा उघडला नि विचारलं,

'कोण हवं तुला ?'

'प्रतिमाताई आहेत का ?'

'हायती—बस—कोन तूं ?'

'मी शाळेंतला मित्र आहें त्यांचा—मेहेंदळे म्हणून सांग.'

नोकर आंत गेला. त्यानं छोट्या मालकिणीला दिलेली वर्दी ऐकूं आली. ती नोकराला म्हणाली,

'त्याला म्हणावं बस—आलें मी.'

पंधरा मिनिटानंतर प्रतिमाताई बाहेर आल्या. तेवढ्या वेळांत तिनं पातळ बदललं होतं हें उघड दिसत होतं.

पातळाचा कांठ सारखा बसवीत, खांद्यावरचे पोलक्याचे फुगे नीट करीत स्वतःच्या डौलांत नानाच्या समोरील खुर्चीवर बसत ती म्हणाली,

'काय ?'

'मी सेक्रेटरीशिप्‌साठीं उभा आहे. तुमचं मतं मागायला आलों आहें.'

विचार करति नसतांनासुद्धां विचार करीत आहोंत असा आविर्भाव आणण्याची पुष्कळांना संवय असते तशीच तिला होती. प्रतिमेनं त्या आविर्भावांत एकदां ओठ दाबला. खांदे जरा उडविले. मान जरा तिरपी केली नि म्हणाली,

'तुम्हालाच मत देईन.'

आणि मग मुलाखत संपली या आविर्भावांत खुर्चीवर हात टेकून ती उठूं लागली. नानाही उठत म्हणाला,

'तुमच्या मैत्रिणींना पण सांगा.'

'सांगेन.'

'बरंय.'

'हं.'

सांगेन—बरंय—हं—हा संवाद होत असतां दोघं दरवाजाशीं आलीं. तो दाराबाहेर

आला. मागें वळून नमस्ते म्हणण्यासाठीं तो हात उचलणार तोंच तिनं धाडकन् दार लावलं.

या उद्धटपणानं अगदीं चिडून नाना रस्त्यावर आला. दुसऱ्या श्रीमंत मुलीचा बंगला पलीकडेच होता. पण तिच्याकडे जायला त्याचं मन घेईना. बंगला टाळून तो जाऊं लागला. तोंच त्याच्या मनांत आलं, ' मी मत मागितलं नाहीं तर दुसरा कुणी घेईल. मला गेलंच पाहिजे. '

या मुलीचं नांवं उषा लेले होतं. दरवाजा उघडायला उषेची आई आली. तिनं विचारलं,

' कोण हवंय ? '

' उषा. '

' थंबा हं ! तिच्या वर्गातला दिसतोस तूं. '

' होय. '

दरवाजांतून घरांत वळत ती म्हणाली,

' उषा, अग उषा ! तुझा मित्र आलाय. बाहेर ये पाहूं. '

उषा बाहेर आली. साधं पांढरं गोल पातळ तिनं नेसलं होतं. नानाला पहातांच प्रसन्नतेनं हंसून ती म्हणाली,

' या ना, आंत या. '

सारा श्रीमंती थाट होता आंत. मोठाले आरसे, आरामशीर खूर्च्या, रेडिओ. मऊ मऊ खुर्चीवर हलकेच बसत नाना म्हणाला,

' मी अशासाठीं '—

उषा मधेंच म्हणाली,

' थांबा हं ! मी आलेंच. '

थोड्याच वेळानें एका रुंद बशींत चिवडा, लाडू घेऊन ती बाहेर आली. लहानसं स्टूल पुढं ओढून त्यावर तें साहित्य ठेवीत ती म्हणाली,

' सुरुवात करा. मी पाणी घेऊन येत्यें. चहा घेतां ना तुम्ही ? '

त्याला होय–नाहीं म्हणायला तिनं वेळही दिला नाहीं. झरकन् ती आंत गेली.

तिच्या या स्वागताच्या माऱ्यानं तो आश्चर्यानं नि कौतुकानं थक्क झाला. मुकाट्यानं त्यानं फराळ आटोपला. चहा घेत असतां तो म्हणाला,

'हा उगिचच त्रास घेतलास!'

'कां बरं? आपण एका वर्गांतले आहोंत. परस्परांच्या घरीं आल्यावर मित्रासारखं वागायला नको! बरं तुम्ही काय म्हणत होतां?'

'तुमचं मत मागायला आलों होतों. सेक्रेटरीच्या जागेसाठीं मी उभा आहें.'

'माझं मत तुम्हालाच देईन मी. माझ्या मैत्रिणीसुद्धां आपलीं मतं तुम्हाला देतील.'

'तूं सांगशील त्यांना?'

'सांगायची जरूर नाहीं. त्या आपणाहून देतील. सगळ्या मुलांत तुम्हीच चांगले आहांत असं सगळ्यांना वाटतं.'

'मी भांडलों तरीसुद्धां?'

'भांडायचं तेव्हां भांडलों. तुम्ही मोकळ्या मनानं मत मागायला आलांत. मला नि माझ्या मैत्रिणींना तुम्हाला तसं मोकळ्या मनानं मत दिलं पाहिजे.'

'थँक्स.'

'थँक्स कसले! येत जा गप्पा मारायला मधूनमधून. आम्ही बॅडमिंटन खेळतों. आलांत तर पार्टनर मिळेल आम्हाला. खरंच या! याल या रविवारीं?'

तो म्हणाला,

'येईन!'



गॅदरिंगची निवडणूक झाली. नाना निवडून आला. गॅदरिंग सुरू झालं नि संपलं. पण सगळा समारंभ आटोपल्यावरहि ते दोन प्रसंग त्याच्या कायमचे मनांत राहिले. उद्धटपणं बोळवण करणारी प्रतिमा आणि हंसतमुख खेळीमेळीनं

स्वागत करणारी उषा. उषेशीं झालेलं त्या वेळचं संभाषण तो मनाशीं आणी नि म्हणे,

'किती गोड मनाची मुलगी ! श्रीमंतीचा थोडासुद्धां तोरा नाहीं. इतरांनीं धडा घ्यावा.'

त्या वेळेपासून मुलींच्या बाबतींतली नानाची तेढ बरीचशी निवळली. तो पूर्वीसारखा हिरीरीनं भांडत नाहींसा झाला. मुलींशीं भांडण्यापेक्षां मैत्री अधिक चांगली, किंवा मुली बाहेरून भांडतांना ज्या आवेशानं बोलतात तो खोटा आवेश असतो नि त्याखालीं सुंदर, साधं, खेळकर मन असतं असं कांहींतरी त्याला कळलं असावं.

उषेचा नि नानाचा परिचय हळूहळू वाढत चालला. एक-दोन वेळां तो तिच्या-कडे गेला. शाळेच्या रस्त्यावर गांठ पडली कीं मोटारींतून ती त्याला घरीं पोंचवी किंवा शाळेला जातांना कधीं मोटार त्याच्या घरावरून घेऊन जाई. अशा वेळीं नानाची आई चाळीच्या कठड्याशीं उभी राहून शेवटपर्यंत मोटारीकडे पहात राही. मग शेजारणीपाजारणींशीं बोलतांना ती म्हणे,

'पहा ! आमच्या नानाच्या ओळखी पहा. मोठमोठ्यांच्या मुली त्याच्याकडे येतात. मोटारींतून त्याला नेतात.'

नाना कांहीं तिचा लाडका मुलगा नव्हता. नानाच्या पाठीमागचा मुलगा तिचा लाडका होता. पण आपला मोठेपणा ज्यामुळं वाढेल तें सारं तिला आवडत असल्यामुळं नानाच्या या ओळखी तिला आवडूं लागल्या. मुलींशीं ओळखी असणं हें कदाचित् वाईट सदरांत पडलं असतं, पण ती माउली बघत होती त्या दृष्टीला तें योग्य वाटलं, ती वारंवार म्हणूं लागली.

'आमचा नाना अशीच एखादी पैसेवाली मुलगी मिळवील. आमच्या कुटुंबाला मदत होईल, धाकट्या भावंडांची जबाबदारी तो घेईल.'

नानाविषयींच्या साऱ्या अपेक्षा या तिच्या बोलण्यांत आल्या होत्या. मोठा मुलगा म्हणून त्यानं कुटुंबाचा भार घ्यावा, धाकट्या भावंडांचं शिक्षण करावं, नि त्यासाठीं जो पैसा लागेल तो येनकेन प्रकारानं मिळवावा. श्रीमंत मुलगी पटकावणं

हा एक त्यांतलाच मार्ग होता. आपल्या मुलाचं वय सोळा वर्षाचं आहे हीसुद्धां तिला फार मोठी अडचण नव्हती!

एके दिवशीं जेवतांना तिनं मुलाला विचारलं,

' तुझी उषा काय म्हणते ? '

' मजेंत आहे. मोटारींतून फिरते आहे. '

' सुंदर आहे, नाहीं ? '

' प्रश्नच नाहीं. सिनेमांतल्या नटीसारखी दिसते ! '

' कांहीं तरी बोलूं नकोस. किती गोड मुलगी आहे. काय रे ! तुझ्यासारखे तिचे दुसरेहीं मित्र असतील. '

' असतील ना ! '

' चांगली मुलगी आहे. तिची ओळख तोडूं नकोस. '

' हं. '

हें प्रश्न त्या दिवसानंतर ती वारंवार विचारूं लागली. हे प्रश्न विचारून त्याच्या जवळून ती माहिती काढून घेई. त्या दोघांच्या मैत्रीचा अंदाज घेई. तिच्या मनाचा ठाव पाही. तिची वर्तणूक पडताळून पाही. ही आपल्या मुलाला पसंत करील का ? ही खरंच चांगली आहे का ? असल्या प्रश्नांचीं उत्तरे शोधण्याचा तिचा यत्न असे.



नानाच्या वर्गातील मुलामुलींनीं वर्गाचं असं संमेलन ठरविलं. ज्या दिवशीं संमेलन होतं त्या दिवशीं दुपारपर्यंत नाना घरीं राहिलेला पाहून आईनं विचारलं,

' काय रे ! तुमच्या वर्गाचं संमेलन आहे ना ? '

' हो. '

' मग गेलास कसा नाहीं ? '

' मी वर्गणी दिली नव्हती. '

' पण बोलावलं होत ना ! '

' मी तसा जाणार नाहीं. '

' मग माझ्याजवळ पैसे घ्यायचे. अशा वेळीं थोडेसें खर्च झाले तरी हरकत नसते. हौस केव्हां करायची ? '

नाना घरीच राहिला. दोनतीन तास झाले असतील, त्याची धाकटी बहिण बाहेरून धांवत धापा टाकीत हुंदके आवरीत आली. दरवाजांत येऊन रडत रडत तिनं हांक मारली,

' नाना--नाना ! '

त्यानं बाहेर येऊन विचारलं,

' काय ग, काय झालं ? '

आपल्या नानाला पहातांच ती आणखी मोकळेपणानं रडूं लागली नि रडतांरडतां हसूं लागली. तितक्यांत आई पण तिथं आली. तिनं दरडावून विचारलं,

' काय झालं ग ? '

' मला वाटलं नाना संमेलनाला गेला. '

' मग रडायला काय झालं ? '

' संमेलनांत फराळाला बर्फी आणली होती. ती सर्वांनी खाल्ली नि तेव्हांपासून सर्वांना ओकाऱ्या नि जुलाब होऊं लागले आहेत. उषेच्या मोटारींतून दोघांना हॉस्पिटलांत नेलं--'

नानानं एकदम विचारलं,

' आणि उषा ? '

त्याचा हा प्रश्न असा अवचित आला. त्याच्या वयाला तो शोभून दिसला. पण तो ऐकत असतां त्याची आई खूष झाली. ती स्वतःशीं म्हणाली,

' त्याच्याही मनांत ती भरली आहे...देवा तूंच पहा आतां. '

नाना बहिणीला म्हणाला,

' तूं एक काम करतेस का ? '

' काय ? '

' उषेकडे जा. पाहून ये. आपल्याकडे ती कितीतरी वेळां येते. तिच्याकडे जायला हवं. जा. '

' मी दमलेंय् रे नाना. '

' तिच्याकडं जायला हवं, नाहीं का ग आई ? मीच जातो. '

आईनं झटकन् पुढं होऊन त्याचा कोट दिला. त्याचे केस आपल्या हातानं नीट केले. नि जिना उतरून तो रस्त्यावर जाईपर्यंत ती अधीरतेने पहात राहिली.

नाना उषेकडे गेला. पण दरवाजा उघडून स्वत: उषाच पुढं आली. तिला सुखरूप पहातांच त्याला आनंद झाला नि तो कांहींसा गोंधळलाही. तो इतकंच म्हणाला,

' म्हणजे ? '

त्याच्या म्हणजेच्या मागील अर्थ तिला समजला. ती हंसली. नाना पुढं म्हणाला,

' मी ऐकलं—'

' ऐकलंस तें खरंच रे ! पण मी मात्र त्यांत नव्हतें. मला बर्फी आवडत नाहीं. म्हणूनच मी बचावलें. '

' कोण कोण आजारी पडले ? '

' प्रतिमा, बाळ सातवळेकर, पांडू राजे. आतांच फोन आला. सर्वांना बरं वाटूं लागलं आहे. आंत चल ना ! '

तिनं त्याला आपल्या खोलींत नेलं. प्रथमच तो त्या खोलींत जात होता. तिथं सारं फर्निचर इतर फर्निचरप्रमाणें उंची होतं पण त्याशिवाय संगीतकलेची आयुधं तिथं त्याला दिसली. त्यानं विचारलं.

' गाणं शिकतेस वाटतं ? '

' गाणं नाहीं नृत्य. ',

आश्चर्यानं त्यानं विचारलं,

' तुला नृत्य येतं ? '

' हं. '

' सिनेमांतल्यासारखं ? '

' अजून तेवढी प्रगति झाली नाहीं. पण बरंचसं येतं. '

' मला प्रत्यक्ष नृत्य पहायचं आहे. '

'मी दाखवीन. आवडेल तुला ? केव्हां येशील पुन्हां ?'

'केव्हां येऊं ?'

'सकाळीं ये, किंवा संध्याकाळीं. नक्की ये हं.'

'अगदीं खचित.'



पण पुढील पांच–सहा दिवसांत नानाला उषेकडे जायला जमलं नाहीं.

त्या पांच–सहा दिवसांत नानाच्या घरचं वातावरणहि बरंच गढूळ झालं होतं. आई नि वडील यांच्यांत कांहीं कारणावरून चिडाचीड झाली होती. आई फारशी बोलत नसे, पण एकदां चिडली कीं, तिच्या तोंडाला सुमार उरत नसे. फटकळ-पणं बोलणारे वडील, पण तेही मुके होऊन जात. सात मुलं, त्यांत तीन रोगी. स्वतः मुलांचे वडील हंतरुणावर पडलेले. घरांत जी मदत तीसुद्धां बहिऱ्या बाईची. ती बहिरीच नव्हती, मूर्खसुद्धां होती. तिला एक एक गोष्ट समजायला अर्धा तास लगे. तिची लहर असेल तर ती काम करी, नाहींतर स्वस्थ बसून राही. घरांत रागावारागव झाली कीं तिला शिव्या देऊन राग शांत करितां येत असे हाच एक मोठा फायदा होता. तिचे वडील उद्धरले, आई उद्धरली, तरी तिला ऐकावयाला येईल अशी धास्ती नव्हती. पण कांहीं असलं तरी तिच्या या कुटुंबांत येण्यानं कुटुंबाचा बेढबपणा वाढला होता. दारिद्र्यामुळं कुटुंबावर जी वाईट सावली पडली ती व्यंग असलेलं एक माणूस कुटुंबांत वावरत असल्यानं आणखी काळी झाली होती.

मुंबइच्या आवाढव्य चाळींत जीं हजारों इतर कुटुंब रहातात तसंच तें एक कुटुंब होतं. दारिद्र्याच्या सीमेवर यांचा गाडा नेहमीं चालायचा. कधीं बऱ्याकडे झुकल्यासारखा वाटतो न वाटतो, तोंच चाक घसरून दारिद्र्याच्या गर्तेत केव्हां घुसलं हें कळायचं नाहीं.

कुटुंब वाढलेलं. एका महिन्याला कुठं खर्चाची ओढ आली कीं सारं बस्तान बिघडून जायचं. त्यावेळीं झालेलं कर्ज निवारतांना वर्ष जायचं, पुन्हा कांहींतरी आजार यावयाचा, मग पुन्हा कर्ज नि पुन्हा वर्षभर फेड !

मध्यमवर्गाची स्थिति केविलवाणी म्हणतात ती याचसाठीं. पोषाख, रहाणी, कल्पना, खाणपिणं सारं श्रीमंतासारखं ठेवायचं नि उत्पन्न मात्र मजुराचं मिळवायचं. म्हणूनच बाबांच्या दारीं लागलेला सावकार कधींच सुटला नाहीं. ते दम्यानं पडल्यानंतर तर त्या सावकारानं सोबती गोळा केले. ते सारे एकामागोमाग येऊं लागले कीं हैराण करीत. जीव ठेऊं नये असं वाटे.

अशाच एका मन:स्थितींत त्या जोडप्यानं सल्लामसलत केली. उत्पन्न कांहीं नाहीं, कांहीं मिळायची आशा नाहीं, तोडमोड करून किती दिवस खावयाचं ? मुलांचे शिव्याशाप पुढें घ्यावयाचे, त्यापेक्षां आजच शहर सोडून खेडेगावांत गेलों तर ?

हें सर्व विचार करितांना त्या जोडप्यांत कुठंही मतभेद झाला नाहीं. त्यामुळंच ताडतोब नानाला गांवीं धाडून दोन दिवसांत तिथल्या घराची डागडूजी करवून आपण मागाहून बिऱ्हाड हलवावं असं दोघांनीं निश्चित केलं.

हें जेव्हां निश्चित झालं त्याच वेळेला नाना उषेकडे तिचं नृत्य पहायला गेला होता.



उषा नेहमींप्रमाणं हंसतमुख पुढं आली. खोलींत आल्यावर टेबलाचा खण उघडून तिनं घुंगुर काढला नि पायाला बांधूं लागली. तो हसत म्हणाला,

‘ मलासुद्धां शिकावसं वाटतंय. ’

‘ खरंच शीक. ’

‘ आधीं पहातों ! जमेल कीं नाहीं तें कळेल. ’

घुंगुर बांधून झाल्यावर तिनं एक पाय झणकन् जमिनीवर आपटून पाहिला. तिचा त्या वेळचा तो अभिप्राय पाहून एक आनंदाची ऊर्मि त्याच्या हृदयांत उठली नि त्या क्षणापासून ज्या वेळेपर्यंत तो तिच्या सहवासांत होता त्या वेळेपर्यंत तो आनंद सारखा वाढतच गेला.

तिनं पाय आपटतांच तो म्हणाला,

‘ थांब ! मी तुला आधीं कांहीं प्रश्न विचारतों.

‘ विचार. ’

‘ नृत्याची कला कशी आली ? ’

‘ मला नीट सांगतां यायचं नाहीं. पण आमच्या गुरूजींनीं जें सुरवातीला सांगितलं नि त्यांतलं जें लक्षांत राहिलं तें सांगतें. जो इतर कलांचा हेतू तोच याही कलेचा आहे. इतर कलांप्रमाणें यांतूनही आनंद मिळतो. नाटक हे नृत्यांतूनच आलं. नृत्य म्हणजे सुरवातीला कांहींतरी हावभावाची नक्कल असे किंवा त्याही आधीं भाषेच्या अभावीं भाव दर्शविण्याची ती एक सोपी सरळ पद्धत होती. नृत्यकला हळूहळू परिणत झाली. मग त्या कलेची अशी एक वेगळीच भाषा झाली. म्हणूनच नृत्य कळायला त्याची परिभाषाही कळावी लागते. नृत्याच्या भाषेतून वेगवेगळे भाव नि भावांमधून वेगवेगळ्या कथा सांगतां येतात. कांहीं ठराविक खुणा कांहीं ठराविक गोष्टींसाठीं वापरून नृत्य बनतं. समज ‘ कमळ ’ म्हणून म्हणायचं असेल कीं पांची बोटं तळहाताची पोकळी करून द्रोणाच्या आकारांत अलग अलग धरलीं कीं झालं. ‘ मम ’ म्हणायचं असेल तर—’

उषेनं अंगठा दूर ठेवून तळहात छातीवर ठेवला.

‘ हें ‘ मम ’ झालं. तसंच ‘ सखी ’ म्हणायचं असेल ’—

उषेनं दोन्ही तळहात विरुद्ध खांद्यावर ठेवले.

‘ ही ‘ सखी ’ झाली, नि ‘ मम सखी ’ म्हणजे ’—

‘ मम ’ नि ‘ सखी ’चे दोनही भाव तिनं अशा कांहीं सहजपणं केले कीं तें पाहून कां कुणाला ठाऊक, तो हंसूं लागला. त्याला हंसतांना पाहून तीही हंसतहंसत सांगूं लागली,

“ ‘ आई ’ म्हणायचं असेल तर ’—

उषेनं तळव्यानं हातांची दोनही कोपरं पकडलीं. ‘ ही ‘ आई, ’ नि ‘ काय ’ म्हणून विचारायचं असेल तर कोपर वर उचलायचं—तळवा नि बोटं प्रश्न विचारतात तशीं हलवायची नि भुवया किंचित वर करायच्या. ’

‘ काय ’ म्हणण्याचा हा अभिनय करतांना तिनं जेव्हां कोपर वर उचललं तेव्हां तिचा हात अशा कांहीं मोहकपणें मागं आला, तिनं जेव्हां बोटं हलविलीं तेव्हां त्या लांबसडक बोटांनीं अशी कांहीं गोड हालचाल केली नि तिनं भुवया

वर केल्या तेव्हां तिच्या तोंडावर असा कांहीं मनोहर भाव दिसला कीं तो पहातांपहातां हर्षानं त्याचे डोळे अधिकच फुलले नि तो अधिकच हंसूं लागला.

नंतर भुंवया नि डोळे यांच्या लहानसहान हालचालींचं नृत्यांत किती महत्व आहे हें सांगतांना तिनं डोळ्यांमधून नि भुंवयांच्या मुरडण्यांतून वेगवेगळे भाव दाखविण्यास सुरवात केली. तिच्या टपोऱ्या डोळ्यांतील ते भाव पहात असतां क्षणोक्षणीं त्याचं हंसूं वाढूं लागलं नि तो स्वतःशीं म्हणूं लागला,

' कसला आनंद झाला आहे मला--कसला आनंद झाला आहे मला ? '

त्याला जो हर्ष झाला होता त्याचं वारं तिच्याहि अंगांत खेळूं लागलं. हंसत हंसत ती पण सारे अभिनय स्वतःशीं अगदीं रंगवून दाखवूं लागली. नंतर ती म्हणाली,

' आतां नृत्य करून दाखवितें हं ! नृत्याला सुरवात नेहमी उजव्या पायानं करायची असते. एक, दोन, तीन चार अशी. नृत्यातलं एक तालबद्ध गाणं तुला म्हणून दाखवितें,—

**नटवर नाचत संगीत गीत–विभति वाति गद नईनई–तावर ब्रुलगूं नूपर वाजत–थेथक त्राम त्राम थै–थेथक त्राम त्राम थै–थेथक त्राम त्राम थै...**

हें गांणं ऐकत असतां तो आणखी मोठ्यानं हंसूं लागला. तो जें कांहीं पहात होता नि ऐकत होता तें सारं इतकं नवं, खेळकर नि आनंदपूर्ण होतं. तिलाहि त्याचा आनंद कळत होता नि ती पण हंसत होती. तशी हंसत असतांच एका पायानं झणत्कार करीत तिनं नृत्याला सुरवात केली.

उषेचा निरोप घेऊन नाना घराकडे आला तेव्हां आनंदानं बेहोष झाला होता. त्याचा चेहरा फुलला होता, डोळे चकाकत होते नि ओठ संयमाला न जुमानता कडेकडेनं थरथरत हसंत होते.

तो घरांत शिरला तोही हंसतच. आईनं त्याच्याकडे आश्चर्यानं पहात विचारलं,

' काय रे ! कसला आनंद झालाय् तुला ? '

पुष्कळ वेळा आनंद होतो, पण त्याचं कारण शब्दांत सांगता येत नाहीं. त्याचं तसंच झालं. गोंधळून—' कांहीं नाहीं, कसला नाहीं ' असं कांहींतरी पुटपुटत धडपडत नाना आंत गेला. लाजेन त्याचं तोंड लाल पडलं होतं.

आंत त्याची भावंडं बहिऱ्या बाईच्या भोंवतीं जमून तिला कांहींतरी सांगत होती. त्यांना जें सांगायचं तें तिला कळत नव्हतं. एकजण गाडीप्रमाणं झुक्–झुक् करीत होता–दुसरा भुर्र म्हणत होता. तिसरा ट्रंकेकडे बोट दाखवीत होता. पण मुंबई सोडून आपल्याला जायचं आहे हें कांहीं तिच्या डोक्यांत शिरत नव्हतं. नाना पुढं होऊन म्हणाला,

' काय रे ! काय सांगतां तिला ? '

' अरे ! सगळ्या खुणा करून पाहिल्या. तिला समजतच नाहीं. मुंबई सोडून जायचंच हें तिच्या ध्यानांतच येत नाहीं. '

' थांब ! मी सांगतों. '

खुणा करून सांगण्याच्या आवेशांत तो पुढं आला. हात वर करून तो कांहीं खूण करणार तोंच एकदम थांबला. ' मुंबई सोडून जायचं ? ' इतका वेळ ते शब्द ऐकून त्यांचा अर्थ त्याला आपल्या आनंदाच्या भरांत कळलाच नव्हता. झरकन् वळून तो स्वयंपाक घरांत गेला.

आईला त्यानं विचारलं,

' आई ! मुंबई सोडणार आहोंत आपण ? '

' होय बाळ ? '

' केव्हां ? '

' आंत ये सगळं सांगतें. '

आईनं त्याला कुटुंबाची स्थिति, देणंघेणं सारं कांहीं सांगितलं. तेवढ्यांत वडिलही तिथं आले. नानाला पहातांच ते म्हणाले,

' नाना ! तुला आजच निघालं पाहिजे. शंभर रुपये बरोबर घेऊन गांवीं जा. आम्ही मागाहून दोन दिवसांनीं येऊं. तोंपर्यंत घराची डागडुजी करून घे. आबा केतकराकडे उतर. तो सगळी मदत करील...अग ए ! त्याला जेवायला घाल. त्याच्या कपड्यांचं गाठोडं बांध. गाडी कितीची आहे पाहून ये रे. '

जेवण, कपडे, स्टेशनावर येणं या साऱ्या गोष्टी नानानं यंत्रासारख्या केल्या. हें जें कांहीं घडलं ते इतकं अवचित होतं कीं, त्याचा अर्थ नि परिणाम त्याच्या डोक्यांतच उतरला नव्हता. मुंबई सोडायची म्हणजे काय ? आपल्या आयुष्यावर त्याचा काय परिणाम होणार आहे ?

स्टेशनावर जातांना त्याला दुरून उषेची मोटार दिसली. त्यांत उषा असेल नसेल. पण ती मोटार पहातांच इतका वेळ आलेला त्याचा हतबुद्धपणा गेला. मुंबई सोडून जाणं याचा आपल्यावर किती भयंकर परिणाम होणार हें त्याच्या लक्षांत आलं. त्याचं मन विषण्ण झालं. दु:खानं मान खालीं गेली. त्याच्या सगळ्या दु:खाचं रूप एका वाक्यानं त्याच्या तोंडांतून बाहेर पडलं. तो स्वत:शीं म्हणाला,

' उषेला जातों म्हणूनसुद्धां सांगता आलं नाहीं. '

गांवीं पोहोंचेपर्यंत तो अगदीं मुकून गेला. गाडींतून मोटारींत, मोटारींतून तीन मैलांची पायवाट चालत असतां, मनाविरुद्ध त्याचं शरीर चाललं होतं.

गांवांत शिरतांच आपल्या घराकडे तो वळला. घराची चांगलीच मोडतोड झाली होती. पडवीची भिंत कोसळली होती. कौलं शाकारायला हवीं होती.

संध्याकाळ झाली होती. घराच्या पुढच्या बाजूला येतांच कुणींतरी खणांत असल्याचा आवाज त्यानं ऐकला. त्यानं पुढं होऊन पाहिलं. पायरीचा एक रेखीव दगड कुणी तरी कुदळीनं वर उचलींत होता. त्यानं दरडावून विचारलं,

' कोण आहे ? '

खणणारा चमकून उभा राहिला. पण समोर लहानसा पोरगा उभा पाहून त्यानं दमांत विचारलं,

' कां रे ! ओरडतोस कां ? '

' आमचा दगड चोरतो आहेस, तरी ओरडूं नको ? '

' कोण तूं ? '

' मी, बाबा मेहेंदळ्यांचा मुलगा. '

' काय ! ! '

असं म्हणत तो माणूस तोंड लपवून वेगानं मागं फिरला.

केतकरांचं घर शोधून काढून नानानं आपली ओळख करून दिली. केतकर

बाहेर गेले होते. नानाच्या वयाचाच त्यांचा मुलगा होता. त्या दोघांची लौकरच मैत्री जमली. नानानं आपल्या घराशीं पाहिलेला प्रसंग त्याला हंसत हंसत सांगितला, नि तो प्रसंग सांगत असतांच केतकर घरीं आले. दरवाजांत त्यांना पहातांच नाना दचकला. कुदळ घेऊन पायरी खणणारा माणूस तोच होता. पण दोघेही कांहीं बोलले नाहींत. काळोखांत दोघांच्याही तोंडावरचे भाव लपले.

रात्रीं केतकरांशीं घराबद्दल बरचसं बोलणं झालं. मग नाना झोंपण्यासाठीं गेला. ज्या खोलींत त्याचं हंतरुण घातलं होतं तिची तक्तपोशी बरीच उंच होती. संवय नसतांना उंच छताखालीं झोंपल्यावर डोकं जसं हलकं होतं नि कल्पना तरळ होतात तसंच त्याचं झालं. रात्रभर मधूनमधून तो जागा होत होता. नि झोंप लागत होती तेव्हां मुंबई दिसत होती. तिथली चाळ... शाळा... सम्मेलन... उषा ... तिचं नृत्य... शाळेतलीं भांडणं. अशा स्वप्नांतून जागा झाल्यावर आपण परक्या ठिकाणीं आहोंत हें ध्यानांत यायला प्रयास पडत होता नि ध्यानांत आल्यावर दुःखाची तीव्र जाणीव सलत होती. मुंबई सुटणं, शिक्षण सोडणं, उषेपासून दूर जाणं, सारीं दुःखं अशीं कांहीं एकत्र आलीं होतीं कीं त्यापैकीं कशा एकामुळं वेदना होत आहेत हें सांगतां आलं नसतं.

पहाटे त्याची झोंप पार उडाली. मग मागील दिवसापासून जे जें घडलं तें तें डोळ्यांपुढून जाऊं लागलं. जणूं जें जें आतांपर्यंत घडलं तें तें स्वप्नांत घडलं होतं. पुन्हां सारं दुःख नव्यानं मनाला टोचूं लागलं. डोकं तापलं,—डोळे तारवटले नि त्यांची आग होऊं लागली. थोड्याच वेळानं डोळ्यांच्या कोपऱ्यांतून दोन तापलेले अश्रू कानशिलावरून खालीं ओघळले.

त्या मनाच्या अवस्थेंत त्यानं स्वतःशीं ठरवलं कीं जें हें दुःख झालें तें पैशाच्या अभावी झालं. हृदयाची श्रीमंती जगांत चालायची नाहीं. आपल्याला सर्वजण चांगला म्हणतात. पण या चांगुलपणानं गेलेलं सुख पैशाशिवाय आपल्याला मिळवितां येणार नाहीं.



त्यानंतर बरोबर दोन दिवसांनीं त्यांचं मुंबईचं बिऱ्हाड हललं आणि घरची वाट चालूं लागलं. कांहीं तासानीं आलेल्या एका सावकरानं बिऱ्हाडाचा दरवाजा

लोटला. आंत खोली मोकळी होती. कचरा, गवत, गदळ—इकडेतिकडे पसरलीं होतीं. तें पाहून कपाळावर हात मारीत तो सावकार निघून गेला.

थोड्या वेळानं उषा आपली मोटार घेऊन तिथं आली. दरवाजा उघडाच होता. प्रथम तिला वाटलं आपण खोली चुकलो. पण शेजाऱ्यानं तिची चांगली खात्री करून दिली. सावकाराचे तगादे चुकविण्यासाठीं हें बिऱ्हाड कसं पळून गेलं हें रसभरित शब्दांत त्यानं सांगितलं.

खोलींतल्या केरकचऱ्याकडे पहात जिना उतरत असतां तिच्या डोळ्यांत पाणी तरंगू लागलं. घरीं येईपर्यंत तिनं कसातरी हुंदका दाबून ठेवला. घरांत येतांच खोलींत शिरून जोराजोरानं रडत तिनं उशींत तोंड खुपसलं.

नानाइतकंच तिला दु:ख झालं. पण कारण थोडसं उलटं होतं. पैशानं सगळीं सुखं मिळत नाहींत हें पैसा भरपूर असल्यानं तिला समजलं होतं. मोठं मन असलेले मित्र हेंच खरं सुखाचं साधन हें तिला समजून आलं. पैसा पुष्कळ आहे, पण मनाजोगती माणसं भोवतालीं नसलीं तर तो पैसा असून नसून सारखाच असतो.

अशा रीतीनें तो दु:खी झाला नि ती पण दु:खी झाली. कांहीं तरी कमी आहे,—कांहीं तरी कमी आहे, असं दोघांना वाटूं लागलं. दोघांचं लहानपण गेलं. दोघं मोठी झालीं.



## प्रायश्चित !

माझं नांव हरभट. माणगांवचा राहणारा. आमच्या गांवांत एकदां एक झाड पडलं त्याची गोष्ट तुम्हांला सांगतों आहे, ऐका.

मृग लागले होते. पाऊस पडायला सुरवात झाली होती.

त्या दिवशीं विलक्षण वादळ झालं. पाऊस इतका पडला कीं छपरामधून ठिकठिकाणीं पाणी गळूं लागलं. तें गळणारं पाणी वेचण्यासाठीं घरांतील पंचपात्री-पासून तों पिंपापर्यंत सारीं भांडीं आम्ही संपविलीं. तरीसुद्धां दोन ठिकाणीं गळतं राहून जमीन ओली होऊं लागलीच. तेव्हां वैतागून एका गळत्याखालीं बायकोला बसविलं नि दुसऱ्या गळत्याखालीं मी बसलों.

डोक्यावर अशी संततधार चालू होती नि गारठ्यानं मी सांब बनत चाललों होतों. तोंच एक भलीमोठी वीज कडाडली. आमचं घर एकदां पूर्वेला नि एकदां पश्चिमेला झुकलं नि स्थिर झालं. मी डोळे उघडले, उठलों, दार उघडलं, तोंच एक फांदी फाडकन् तोंडावर आली. त्या फांदीला एक शिवी दिली नि बायकोला म्हटलं,

'काय ग ! आपल्या दारापुढं एकही झाड नव्हतं मग ही फांदी आली कुठून ?'

इतक्यांत वीज चमकली.—फांदी एकटीच नव्हती, झाड पण होतं मागें. बायको म्हणाली,

'अगबाई ! वडाचं झाड पडलं वाटतं !'

खरंच ! वडाचं झाडच पडलं होतं. देवीच्या देवळासमोर पेशव्यांच्या वेळे-पासून तें उभं होतं. त्या कर्तबगार पिढींतलं तें झाड. त्या काळाला शोभेसंच भव्य होतं. आतां अशीं झाडं उगवत नाहींत. झाड पडल्यामुळं रस्ता तर अडलाच होता. पण दोन घरांचे पुढील दरवाजेहि बंद झाले होते. एक शिदू-भटाचा नि दुसरा आमचा–म्हणजे हरभटाचा.

एक मोठा वाऱ्याचा झोत आला त्याबरोबर पावसाची झड आंत येऊं लागली. म्हणून दरवाजा बंद करणार तोंच कुणीतरी हांक मारली,—

'हरभट ! अहो हरभट.'

मी तो आवाज ओळखला. माझ्या चांगल्यावर टपलेल्या नामजोशाचा आवाज होता तो. मी मुद्दामच ओ दिली नाहीं.—इतक्यांत दुसऱ्या एका घराच्या दरवाज्यांतून कुणीतरी ओरडलं.

'नाम्या ! वडाचं झाड पडलं.'

नाम्या म्हणाला 'काय म्हणतां काय ?'

'हरभटाच्या घरावर पडलं म्हणतात.'

'अरेरे ! देऊळ शाबूत आहे ना ?'

'असं वाटतं. पण बिचारा हरभट ! !'

'म्हणजे ?'

'चांगला माणूस होता. बिचारा सुटला तिसऱ्या बायकोच्या तावडींतून.'

माझी सौ. मागेंच उभी होती. तें वाक्य ऐकतांच मला ढुसळीत ती म्हणाली,–

'सांगा–सांगा–जिवंत अहात म्हणून सांगा त्यांना.'

मी ओरडलों,

'नामजोशा ! मी जिवंत आहेंच. पण तुला पोचविल्याशिवाय मात्र जाणार नाहीं.'

कुणी तरी विचारलं,

'आणि शिदूभट ?'

'तो पण जिवंत आहे. आणि तुम्हालो पोचविल्याशिवाय त्याला पण मी मरूं देणार नाही.'

माझ्या बायकोनं पुढं होऊन धाडकन् दार लावलं. सकाळीं उठलों. पुढचा दरवाजा बंद झाल्यानं मागल्या दारानं पडलेल्या झाडाजवळ आलों. बुंधा वावेंत न मावेल इतका मोठा होता. दोनशे फुटाची जागा त्यानं अडविली होती. बालगोपाळ फांद्याफांद्यांमधून डोकावून पहात होते. मी शिदूभटाच्या घराकडे पाहिलं, तो शिदूभटाचं डोकं घराच्या छपरामधून वर येतांना दिसलं मी विचारलं,

'काय रे ! छपराशीं काय करितो आहेस ?'

'दरवाजा करतोय.'

'छपरांत दरवाजा ?'

'होय बाबा ! पुढला दरवाजा झाडानं बंद केला. घराला मागचा दरवाजा करायचं आमच्या पितराना सुचलं नाहीं.—तेव्हां कौलं काढून दरवाजा करितों आहे.'

'छपरांतून गळेल तें रे ?'

'छपरावर लहानसं छप्पर बांधीन.'

मी म्हटलं,

'ठिक ठीक ! तुला सुचतं बर एकेक, नाहीतर आमचं डोकं.'

दुपारपर्यंत शिदुभटानं छपरावरच्या दरवाज्याचं काम पुरं केलं. मग आपल्याकडे येणाऱ्या लोकांच्या इशाऱ्यासाठीं त्यानं छपरावर पाटी लावली.

'दरवाजा—येथून आंत यावं.'

शिदूभटानं दूरदर्शीपणा केला यांत संशयच नाहीं. पडलेल्या झाडामुळं चार महिने गांवची कांहींच अडचण होणार नव्हती. कारण पावसाळ्याच्या चार महिन्यांत आमच्याकडे शेतांतील चाकोऱ्या बंद होतात. बैल नांगरटीला लागतात आणि गाड्या उलट्या टांगून ठेवलेल्या असतात. बांधाबांधावरून आमच्या टांगांनींच आम्ही प्रवास करितों.

साहजिकच चार महिने त्या झाडाचं अगदीं सावजीनक कौतुक झालं. आजपर्यंत उभी झाडं आम्ही सर्वांनीं पाहिलीं होती पणं इतक्या जवळ आडवं झालेलं झाड आमच्या फारसं नजरेंत आलं नव्हतं. [illegible]

वाट काढून जात. मधूनच फांदीवरून पाय नेतांना एखाद्या म्हाताऱ्याला किंवा म्हातारीला 'झूला' करण्याचा मोह आवरत नसे. मुलं सकाळसंध्याकाळ पानांच्या पिपाण्या करून पें पें करीत बसत. त्या वाजंत्र्यांत गांवकऱ्यांचीच काय—पण गांवांतील साऱ्या कावळ्या-चिमण्यांचीं लग्नं उरकून गेली असतीं.

देवळांत भजन करितांना नि गुळाचा चहा पितांना पावसाळा संपला. उलट्या टांगलेल्या गाड्या लोक उतरवूं लागले. बैलांना वेसणी घालण्यांत आल्या. नि मग सर्वांच्या लक्षांत आलं कीं हें मधें पडलेलं झाड उचलल्याशिवाय गांवांतील एकही गाडी बाहेर जाणं शक्य नाहीं.

आतां लोक, ओट्या पडव्यांवरून, पडलेल्या झाडाच्या प्रश्नावर चर्चा करितांना दिसूं लागले. प्रथम मी नि शिदूभट त्यांच्या या चर्चा ऐकण्यासाठीं जात होतों. पण आम्हीं जातांच झाडासंबंधीं बोलणीं बंद करून लोक दुसराच विषय काढतात हें लक्षांत आल्यावर आपल्याविरुद्ध कसला तरी कट चालला आहे हें समजून मी नि शिदूभट घरींच बसून राहूं लागलों.

दोन दिवस गेले. तिसऱ्या दिवशीं गांवांतले दोन शिष्ट माझ्या घरीं आले. लग्नाच्या निमंत्रणाला निघावं तसं त्यांनीं मारे अंगावर उपरणीं वगैरे टाकलीं होतीं. मी बायकोला म्हटलं,

'अग ! नारळ घेऊन बाहेर ये.'

तोंच त्यांतील एकजण म्हणाला.

'छे ! छे ! हरभट ! तसं कांहीं नाहीं—आपलं साधंच बोलायला आलों आहोंत.'

मी म्हटलं, 'साधंच कशाला ? भानगडीचं बोला.'

दोघे खालीं बसले. एकानं उपरण्यानं वारा घेत साळसूदपणं विचारलं,

'काय मग ! आतां केव्हां कामाला सुरवात करितां ?'

मी म्हटलं, 'कामाला ? आमचीं कसलीं कामं ? एक बिघा जमीन—होईल वसुली सावकाश.'

'त्या कामाचं नाहीं—त्या कामाचं.'

'त्या ?'

‘ त्या म्हणजे झाडाच्या–वडाचं झाड—’

‘ हो खरंच, वडाचं झाड पडलं–वाईट झालं.–पण श्रावण तर गेला. पुढच्या श्रावणांत वडाची सोय होईल. ’

‘ श्रावण सोडा. झाड उचलायचं म्हणतो आम्हीं. ’

‘ म्हणजे ? ’

‘ म्हणजे असं–तें झाड आपण केव्हां उचलणार आहांत ?—’

‘ हरभट ! तुम्ही समजदार आहां—शिदूभटही चांगला माणूस आहे. ’

दुसरा शिष्ट मानभावीपणानं म्हणाला,

‘ सवड झाली नसेल तुम्हांला. ’

मी म्हटलं, ‘ सवड इतकी झाली कीं बायकोसुद्धां मी घरांत फार रहातो असं म्हणूं लागली आहे. ’

‘ मग खोटी कां ? ’

‘ झाड उचलण्याचं आमचं काम नाहीं. ’

‘ गडी लावा ! गांवाची गैरसोय होते. त्यांतून सराईचे दिवस. खळ्यांत भातं तयार होऊन पडली आहेत. ’

‘ पण झाड आमचं थोडंच आहे ! ’

‘ मग गांवांत तरी कुणाचं आहे ? देवाच्या देवळासमोरचं झाड तुमच्या घरासमोर पडावं यांतच देवाची इच्छा दिसते.—’

इतक्यांत स्वयंपाकघरांतून गुरगुरण्याचा आवाज आला. मी ताडकन् उठलो नि आंत पहात म्हणालो,

‘ देवीची इच्छा दिसते, तुम्ही बाहेर चालतं व्हावं. नाहीतर तिचा कोप होईल. झाडाबद्दल बोलणं काढायला येण्याची पुन्हा तसदी घेऊं नका. बरं या आतां. ’

दोघेजण उठून उभे राहत म्हणाले,

‘ मग झाड उचलणार नाहीं तर तुम्ही ? ’

‘ नाहीं, त्रिवार नाहीं, ’

‘ साऱ्या गांवकऱ्यांचें मत आहे कीं ज्याच्या घरासमोर झाड ’—

मध्येंच त्यांना थांबवून मी म्हणालों

‘ पुन्हा पुन्हा सांगण्याची तसदी कशाला घेतां ? माझं उत्तर एकच, नाही. ’

‘ बघा हो हरभट ! उद्यां पंचांपुढं जाब द्यावा लागेल. ’

‘ द्यावा लागेल तर देईन. ’

‘ बरंय. ’

‘ बरं. ’

पंच भरणार असल्याची थाळी तासाभरानं पिटली गेली. मी शिदूभट्टाला म्हटलं,

‘ शिद्या ! तुझा विचार पहा. ’

तो म्हणाला, ‘ तुमचा विचार तोच माझा. ’

‘ गांव सोडावं लागलं तरी ? ’

‘ तरीसुद्धां. ’

‘ ठीक. ’

संध्याकाळीं पंचायत होती. त्याआधीं बायकोनं देवीच्या देवळासंबंधीं नि वडासंबंधीं बरीच माहिती मला दिली. पंचायत चालू झाली. आम्ही झाड उचलावं असा इशारा देऊन आमची बाजू मांडायला सांगितली. मी उठून उभा राहिलों नि म्हटलं,

‘ पंच आणि गांवांतील सभ्य स्त्री–पुरुषांनों ! मी असं म्हणतों कीं, हें देऊळ ज्याअर्थीं लिमयांचं आहे त्याअर्थीं झाड त्यांनींच उचलावं. ’

माझे शब्द ऐकताच लिमयांचं एक खुरटलेलं रोपटं उभं राहिलं नि म्हणालं,

‘ लिमयांनीं गांवासाठीं देऊळ बांधलं त्याचे हे उपकार ! ’

मी म्हटलं, ‘ लिमयांनीं गांवासाठीं देऊळ बांधलं कीं, आणखी कशासाठीं हें मी सांगतों. लिमयांनीं—’

एकाएकीं स्मरणशक्तीनं दगा दिला. बायकोनं सांगितलेलं कांहींच आठवेना. तेव्हां म्हटलं,

‘ एक पळ थांबा ! बायकोला विचारून येतों. ती आंतच आहे. ’

सारेजण निर्लज्जपणं हंसूं लागले. पण थोडासासुद्धां न डरतां बायकोजवळून पुन्हा हकीकत ऐकून आलों. मग अगदीं खणखणीत आवाजांत ओरडलों,

‘ बऱ्याच वर्षांपूर्वी लिमये स्वतः:ला आचारी म्हणवून घेण्यांत भूषण मानीत

होते. अचानक राधाबाई लेले नांवाच्या एका श्रीमंत विधवेकडे त्यांना काम मिळालं. हल्लीचा लिमयाचा वाडा लेल्यांचाच होता. लेल्यांकडे आल्यापासून दहा वर्षांत लिमयानं लेलेबाईचा पुरा पाक केला आणि—लिमयांच्या बुंदींत वळून टाकला. ती बाई कुठेतरी हालांत दुसऱ्याकडे स्वयंपाकपाणी करीत मेली—तिच्या मुलीचं काय झालं हें मला ठाऊक नाहीं. लिमयांनी हें देऊळ बांधलं तें त्या पापाचं प्रायश्चित म्हणून बांघलं.–तेव्हां झाड त्यांनींच उचलावं. '

मधेंच लिमयांच्या रोपट्याला लागलेली एक कीड उठली नि म्हणाली,

' लिमयांचं नांव कशाला ? देवळापुढचे तांदूळ उचलूनच, हरभटजी तुमचा पिंड वाढला—'

मी उत्तर दिलं,

' मी तांदूळच उचलले, पण गांवांत ब्राम्हणाचीं पंधरा घरं आहेत, त्यांनी काय उचलायचं ठेवलं आहे ? गांवकऱ्यांनीं देवळावरचीं कौलं पळविलीं. देवळाची द्वारका केली,–म्हणजे पंधरा खांबांपैकीं आधाराला दोन चार खांब ठेऊन बाकीचे लंबे केले. देवळाच्या पायाचे दगड उखळून पळविले. शिवाय गांवांतल्या वयांत आलेल्या, वयांत न आलेल्या नि वयांत येऊन गेलेल्यांनीं या देवळांत नाना धंदे केले. '

माझे शब्द ऐकतांच जो तो डोळे तारवटून ओरडूं लागला, ' हरभटानं गांवाचीं बदनामी केली आहे. हरभटानं प्रायश्चित घेतलं पाहिजे.–हरभटाला आधीं प्रायश्चित घ्यायला लावा. '

माझं बोलणं मी थांबवलं. पंचांनी उभं राहून सर्वांना शांत केलं. मग सरपंच म्हणाले,

' हरभट ! आतांपर्यंत आम्हीं तुम्हांला एक सूज्ञ जाणते व्यवहारी गृहस्थ समजत होतो. आजचं तुमचं बोलणं बेजबाबदार आणि अग्राह्य आहे असं आमचं मत आहे. जर तुमची तब्येत ठीक नसेल तर उद्यां पंच बोलावूं. '

मी म्हटलं, ' माझी तब्येत आजच्यासारखी कधींच ठणठणीत नव्हती. पंचाचं काम पुढं चालूं द्या.

'ठीक आहे ! तुम्ही झाड उचलावं हा पंचाचा निर्णय कायम होईलच. पण त्यापूर्वी तुम्हांला प्रायश्चित घेतलं पाहिजे.'

'प्रायश्चित !'

'पंचांचा उपमर्द केला म्हणून आणि गांवकऱ्यांची बेअब्रू केली म्हणून.'

मी म्हटलं, 'जिथं अब्रू नाहीं तिथं बेअब्रू कशाची ? जिथं लाज नाहीं तिथं उपमर्द कशाचा ?'

'हरभट ! जीभ आंवरा—पंच प्रायश्चित सांगत आहेत. ऐका हो !—हरभटांनीं आज पंचांचा उपमर्द केला.—'

इतक्यात बालब्रह्मचारी वीरपुरुष शिदूभट उभा राहिला नि म्हणाला,—

'हरभटांनीं नि शिदूभटांनीं उपमर्द केला असं म्हणा. हरभटाच्या प्रत्येक शब्दाला माझा टेकू होता.'

पंचांनीं सुरुवात केली,—

'हरभटांनीं आणि शिदूभटांनीं पंचाचा उपमर्द केला त्याबद्दल पंचांनीं प्रायश्चित सांगितलं आहे. हरभटांनीं दहा दिवसाच्या—'

शिदूभट उभा राहून म्हणाला,

'हरभटानं आणि शिदूभटानं दहा दिवसांच्या आंत—असं म्हणा.'

पंचांनीं तसं म्हटलं,—

'हरभटांनीं आणि शिदूभटांनीं दहा दिवसांच्या आंत शंभर ब्राह्मणांना भोजन घालावं. भोजनांत एखादं पक्वान्न असावं.'

पक्वान्नाचं नांव कानावर पडतांच पंचांपैकीं कितीएकांनीं ओठावरून जीभ फिरविली. आणि भोंवताली जमलेला श्रोतृवृंद माझ्याकडे अशा कांहीं नजरेनं पाहूं लागला कीं डोक्यांत एक विलक्षण तिडीक चमकून मी ओरडलों,

'प्रायश्चित घेणार नाहीं.'

मागोमाग शिदूभट ओरडला.

'भोजन घालणार नाहीं.'

पंचांचे चेहरे खाडकन् उतरले. बाहेर वळवळणाऱ्या जीभा आंत गेल्या. मग आपापसांत गडबगड सुरू झाली. थोड्या वेळानं सरपंच म्हणाले.

' आम्ही ओळखतों, कीं हे लढाईचे दिवस आहेत. तेव्हां पक्वान्नाचं वाण घालणं जड जाईल. साधी पोळी आणि भाजी घातली तरी चालेल. '

मी म्हणालों,

' प्रायश्चित्त घेणार नाहीं. '

शिदूभट ओरडला,

' पोळीभाजी घालणार नाही. '

पुन्हा पंच एकमेकांच्या कानाला लागले. सरपंच उठून बोलले,

' शहरांत रेशनिंग आहे–गव्हाची पंचाईत आहे. पोळी वगैरे न करितां भात भाजीचं जेवण घालाव. '

मी ओरडलों,

' प्रायश्चित्त घेणार नाहीं. '

शिदूभट म्हणाला,

' भात–भाजी देणार नाही. '

पंच आतां अस्वस्थ झाले. परस्परांकडे त्यांनीं पाहिलं नि सरपंचाना कांहीं सूचना केली. सरपंच म्हणाले,

' भोजनाचा एकदंर व्याप जास्तच होतो. त्यांतून हरभटांचं आणि शिदूभटांचं पूर्वीचं वर्तन ध्यानांत घेऊन सर्व गांवकऱ्यांना त्यांनीं चहा द्यावा–मुंदरसं चहापान करावं. काय पंच ! कसं काय ? '

पंचापैकीं एकानें तोंड वेंगाडून म्हटलं,

' वा वा ! चहा म्हणजे सोमरसच. '

मी चिडून म्हटलं,

' मी चहा देणार नाहीं. '

शिदूभट किंकाळला.

' चहाच काय, पण गोमूत्रसुद्धां देणार नाहीं. '

पंचांचे चेहरे कांहींसे उतरले. पुन्हां एकमेकांशी बोलून त्यांनीं सरपंचांना उभे केले. सरपंच म्हणाले,

' साखरेचा हल्लीं फार तोटा आहे. त्यांनीं फक्त माफी मागावी. '

आम्ही दोघे एकदम ओरडलों,

' माफी मागणार नाहीं. '

क्षणभर सगळीकडे स्तब्ध झालं इतक्यांत पंचांपैकीं एकजण उठला नि म्हणाला,

' माफी मागितली कीं हरभटांना गांवांत रहाणं नामुष्कीचं होईल, हें आम्ही जाणतों. म्हणून मी सुचवतों कीं हरभटांनीं आणि शिदूभटानं देवळाभोंवतीं एक प्रदक्षिणा घालावी आणि नमस्कार करावा. '

मी म्हणालों,

' देवीला नमस्कार आतांपर्यंत करीतच आलों नि पुढंही करीन. पण तुम्ही सांगता म्हणून करणार नाहीं. माझ्या पूजेअर्चेच्या वेळेस तें सारं मी यथासांग करितों.—'

क्षणभर शांतता होती. मग पंच एकमेकाशीं बोलूं लागले. नंतर गांवकऱ्यांची कुजबुज वाढूं लागली. हळूहळू सारेजण मोठ्यानं बोलूं लागले. त्यांतच एकजण उठून म्हणाला,

' हे दोन्ही भटजी—आयते तांदूळ खाऊन माजले आहेत. पंचांनीं प्राय-श्चित्ताचा विचार न करितां, झाडाचा विचार करावा. झाड यांना उचलायला लावावं. '

पुन्हां पुन्हां आमचे मूठभर तांदूळ गांवकरी काढतात हें पाहून मी संतापलों. ताडकन् उभा राहून मी बोलूं लागलों.

' आम्हीं देवळापुढचं घेतलेले तांदूळ इथं फार जणांच्या घशांत रुतलेले दिसत आहेत. पण देवळापुढचं कुणिकुणि काय उचललं याची यादी वाचली कीं माझ्या तांदूळ उचलण्याचं फारसं कौतुक वाटणार नाहीं. रामजोशाच्या घराच्या छपरापासून आरंभ करूं या. या रामजोशाच्या छपरावर कोपऱ्यांत वीस पंचवीस मंगलोरी कौलाचं ठिगळ दिसतं तें या देवळावरचं आहे. आपट्यांच्या घराच्या पायरीला जो सुबक दगड आहे तो कुठला आहे ? परांजप्यांच्या घराचं छप्पर देवळाच्या पांच—दहा खांबावर आधारलं आहे. या साऱ्यांनीं देवीसह देऊळ आपलं करायचा चंग बांधलेला दिसेल. आठवून पहा

नीट, देवळाच्या मालकीचा एक गांवकीचा हंडा होता–तो कुठं आहे ? तो गांवाबाहेर कसा गेला नि शहरांत मारवाड्याकडे कसा पडला हें शिवा आपट्याला विचारा. देवळाचं एक मोठं जाजम होतं तें गोडशांकडे लग्नाला गेल्यावर खात्रीनं दिसेल.—'

सभेंच कुणीतरी भित्रा कुत्रा ओरडला,

'नांवं घेऊं नका–नांवं घेऊं नका.'

मी किंचाळलों, 'नांवं कां घेणार नाहीं ? जन्मभर मूठभर तांदूळ गोळा करीत बसलों तरी या वस्तूंची बरोबरी होणार नाहीं. सान्या गांवकऱ्यांनी देवळांत धुडगूस घातला आहे. देवळांतच भजन–चहा–चिवडा आणि शिमग्यांतले कार्यक्रम होतात. देवळांत बसूनच आपट्यांच्या रध्याने अंगारेधुपारे करून कुणब्यांच्या गाईम्हशी फुकटांत मारून तुम्हां–आम्हांला दमपट किंमतीत विकल्या आहेत.'

सभेंत गोंधळ वाढूं लागला. कांहीं म्हातारे–म्हाताऱ्या देवीची निंदा चालली आहे असं म्हणून उठूनही गेले. मी माझा सूर वाढवला,

'गांवांतली वयांत न आलेली पोरं याच देवळाच्या छपराखालीं वयांत आली आहेत.'

इतक्यांत गोप्या गोडसे किंचाळत तारवटून ओरडूं लागला.

'हरभटा ! संभाळून बोल.'

मी विचारलं,

'संभाळून बोल ? आणि तुझ्याशीं ? तूंच संभाळून रहा. देवळाच्या भिंती मागं हिऱ्या कातोड्याच्या बायकोचा हात धरून तिला किती वेळां नेली आहेस हें साऱ्या गांवाला माहिती आहे. प्रायश्चित्त तूं घे—साऱ्या गावानं घ्यावं.'

इतक्यांत बायकांमधून मोठ्यानं टाकलेले उसासे ऐकूं आले. मी तिकडे पाहिलं, गोंप्या गोडसेची बायको मुसमुसून रडत होती. मला तिच्याबद्दल फार वाईट वाटलं. मी तिच्याकडे पाहतांच तिनं हंबरडा फोडला. तेव्हां गोंप्या गोंडसे उठला. माझ्याकडे करकरा पहात बायकोला घेऊन तो घरा गेला. मी पुढं बोलूं लागलों.

'गांवांत आपलीं पंधरा घरं आहेत. पांच आपट्यांची, दोन गोडशांची, दोन

लिमयांची, तीन जोशांची, एक परांजप्याचं, एक शिदूभटाचं, एक माझं. या घरांपैकीं सारीं देवळांत पुण्य सांठविण्यास जातात तशींच पापं करण्यासही गेलीं आहेत. दुसऱ्याच्या बायकोवर नजर ठेवण्यास देवळासारखं ठिकाण नाहीं. असं आपटे जोशी आणि मंडळी तुम्हाला सांगतील.'

आपटे व जोशी यांनीं माझ्याकडे गुरकावून पाहिलं. एकानं मूठमुद्धां आवळली. मग दोघां कुटुंबांतले लोक उठले आणि बाहेर गेले.

माझं बोलणं चालूंच होतं,

'वयांत आलेल्या पोरींच्या मागं लागण्यास देवळासारखं स्थान नाहीं. याचा निर्वाळा धाकट्या आपट्यांचीं नि लिमयांची पोरं देतील.'

मी हे शब्द उच्चारतांच आपट्यांचा नि लिमयांचा तरुणवर्ग उभा राहिला. एकानं मला कांहींतरी शिवीं दिली. दुसऱ्यानं डोक्याकडे हात फिरवून दाखवला व त्यांनीं सभा सोडली, मी बोलतच होतों.

'ह्या देवळाच्या आधारानं म्हाताऱ्याकोताऱ्यांना लाज सोडतां आली. कशीं तें परांजप्यांच्या साठीं उलटलेल्या आण्णांना विचारा.'

खोकत खोकत अण्णा उभे राहिले. लहान मुलं हंसूं लागलीं. तेव्हां अण्णांनीं सभेमधून साठीच्या वेगानं पलायन केलं. मी स्त्री-समाजाकडं पाहिलं. तिथं फार थोड्याजणी दिसत होत्या. आपल्या यजमानांबद्दल ऐकण्याची अजून त्यांना इच्छा असावी. एकीकडे त्या रडत होत्या नि मुलं आयांना रडतांना पाहून मोठ्यानं रडूं लागलीं होतीं. अण्णांना जातांना पाहून त्यांचा आधारच सुटला. त्या पण एकेक उठूं लागल्या. माझं बोलणं ऐकावयाला कुणी थांबत नाहीं असं पाहून मला अधिकच त्वेष आला. मी जोरजोरानं ओरडून भाषण सुरू केलं,

'अंमल अधिकाऱ्यांना खूष ठेवण्यासाठीं गांवांतल्या बड्या लोकांनी कितीकदां 'अस्पृश्य' खाना याच देवळांत त्यांना दिला आहे. तिथं मऊ बिछायत घालून, वर दुसऱ्या मऊ बिछायतीचीं सोय करून दिली आहे. याच देवळांत तलाठ्याला हरहमेश चहापाणी होत आलं आहे. त्यामुळंच कितीकदां न्याय-अन्याय न पहातां कुळावर जप्ती नेतां आली आहे. म्हणून प्रायश्चित तुम्ही घ्यावं झाड तुम्ही उचलावं.'

आवेशानं मी चहूंकडे मान वळविली, पण हाय !—सभागृहांत एकही चिटपांखरूं शिल्लक नव्हतं. मला एकदम थकल्यारखं वाटलं, पाय गळाले, घशाला कोरड आली. मी मटकन् खाली बसलों नि आडवा झालों.

जागा झालों तेव्हां डोक्याखालीं प्रेमाचा मृदु स्पर्श लागला. माझी सौभाग्यवती मला हलवून म्हणत होती.

' पहायचं ना ! लोक प्रायश्चित्त घेताहेत. '

मग कुऱ्हाडी, कोयते यांचे आवाज ऐकूं यायला लागले. मी मान वर करून पाहिलं. हातांत सांपडेलं तें हत्यार घेऊन सारे गांवकरी खरोखरच प्रायश्चित्त घेत होते.

—पडलेलं झाड तोडीत होते !



## नकोरे आंत येऊं, केशव !

मावशीनं मुंबईला चलण्याचा आग्रह धरला, तेव्हां सिंधूची मनःस्थिति मोठी विचित्र झाली. तिला मुंबई तर पहावीशी वाटत होती पण गांवहि सोडवत नव्हतं. गांवीं रहाण्यासाठीं कितीतरी सबबी तिच्या मनांत येऊन गेल्या. घरच्या गोठ्यांतली गाय तिच्याशिवाय कोणाला दूध काढूं देत नव्हती, सकाळीं केशवाच्या आईला पूजेसाठीं गंध उगाळून द्यावं लागत होतं. दुपारीं घरच्यासाठीं वाती तिलाच वळाव्या लागत होत्या. नि पुन्हां—

छे ! छे ! हीं कांहीं खरीं कारणं नव्हतीं. या सगळ्या सबबी होत्या. खरं कारण होता केशव. तिला भय वाटत होतं केशवाला सोडून आपल्याला जाववेल कां ? नि जाववलं तर केशव काय म्हणेल ?

दुपारीं ती मुद्दाम केशवाकडे गेली. त्याची आई माजघरांत वाती वळत बसली होती. ती जातांच केशव माडीवरून खालीं आला. त्या दोघींचं बोलणं चालू असतां तो तिथंच बसला. तिनं दोन तिनदां त्याच्याकडे पाहिलं. तो आपल्याकडेच टक लावून बघत असल्याचं तिला दिसलं. तिनं नाखुषीनं मान हलवली. जणूं तिला म्हणायचं होतं—

—हे रें काय केशव ! सारखी टक लावून कसला बघतोस ?

थोड्या वेळानं ती जाण्याकरतां उठली. केशव तिच्या बरोबर ओटीवर आला. ती पायरी उतरीत असतां त्यानं तिचं बोट धरण्याचा प्रयत्न केला. तिनं त्याच्या-

कडे नाखुषीचा कटाक्ष फेंकला. जणूं तिला सुचवायचं होतं—केशव ! ही तुझी वाईट खोड आहे हं ! लोक जातायेताहेत.

एक पायरी उतरून ती थांबली. पदराशीं चाळा करीत तिनं म्हटलं,

" एक विचारायचंय. '

' विचार ना. '

' मावशी आलीय् माझी—मुंबईला चल म्हणते ती. '

' आपण दोघं जाऊं या कीं. '

मान हालवून ती म्हणाली,—

' अं हं ! एवढ्यांत नाहीं. '

केशव एकदम स्तब्ध झाला तो नाखूष झाल्याचं तिला समजलं. पण ती मनांत म्हणाली,–लग्न व्हायचं असलं म्हणून कुणी आधीं का असं वागतं ? तिनं त्याला विचारलं,—

' जाऊं कीं नको ? '

' जा. '

' नि आईनं गाडी मागितलीय् स्टेशनवर जायला. '

' लबाड ! आईचं नांव ? '

त्याचा हात पुढं येण्यापूर्वीच ती झरझर पायऱ्या उतरली.

दुसऱ्या दिवशीं गाडी येण्यापूर्वी सिंधूला वाटत होतं, केशव गाडीवर आला तर किती चांगलं होईल !

नि झालंही तसंच.

गाडींत चढतांना केशवानं तिला–' पुढं बस ' म्हणून हळूंच सांगितलं. ती पुढं बसली. गाडी चालू लागतांच तो म्हणाला,—

' पत्र धाडूं मीं ? '

पत्र ! ! ! तिची छाती धडधडूं लागली. केवढ्या मोठ्यानं केशवानं विचारलं मावशीनं ऐकलं असलं तर ? तिचं तोंड एक क्षण गोरमोरं झालं. केशवाकडे पाहून तिनं मोठाले डोळे केले नि मान हलवली. मग हळू मागें सरकून ती मावशीजवळ बसली. नि स्टेशन येईपर्यंत केशवाशीं एक शब्दसुद्धां बोलली नाहीं.

स्टेशन आलं. दोघीजणी आगगाडींत बसल्या. अगदीं खिडकीला टेकून केशव प्लॅटफॉर्मवर उभा होता. गाडी सुटायची घंटा होताच झटकन् नोटांचं एक पुडकं त्यानं तिच्या हातीं दिलं आणि तो म्हणाला,—

‘ सिंधू ! मला कोटाचं कापड—धोतरजोडी—तुला दोन पातळं नि काय वाटेल तें—लवकर यायचं हं ! ’

गाडी चालू झाली. क्षणभर सिंधूला श्वास कोंडल्यासारखा वाटला. मग तिचे डोळे भरून आले. मनांत आलं, गाडींतून उडी टाकावी, केशवाचे शेजारी उभं रहावं नि म्हणावं—केशव ! तुला सोडून एक क्षणसुद्धां मी जाणार नाहीं रे ! आतांच काय अडलंय् माझं मुंबईचं ?

पण गाडीचा वेग वाढता होता. मग तिला वाटूं लागलं, खरंच ! आपला विचार किती वेडा होता. मावशीनं वेडीच ठरवली असती नि घरच्या लोकांत तरी किती फजिती.

मुंबईत गाडी शिरली ती अगदीं संध्याकाळीं. स्टेशनावर मावशीची मुलगी मीना उतरून घ्यायला आली होती. सगळीकडे काळोख होता. स्टेशन बाहेर रस्त्यावर प्रकाशाचीं लहान लहान वर्तुळं दिसत होतीं. एखादा निखारा अधांतरीं धांवावा तसे मोटारींचे दिवे धांवत होते. सिंधूला ते फार कसंसच वाटलं. मीनाला ती म्हणाली,—

‘ हें ग काय मीना ? सारंच काळकुट्ट. ’

तिच्या हाताला हिसडा देत मीना म्हणाली,—

‘ वा ग वा ! यांत तर मजा आहे. नाहींतर आम्हा मुंबईकरांना चांदण्याची मजा केव्हां दिसणार ? ’

तिचं चलाख बोलणं सिंधूला तेव्हांच आवडलं. तसं तिचं सारंच तिला आवडलं. ती गोल पातळ नेसली होती, तें कसं चापूनचोपून. जिवतींतल्या नागकन्येसारखी ती रेखीव दिसत होती. व्हिक्टोरियांत बसल्यावर सिंधू तिला म्हणाली,

‘ मला सगळी मुंबई दाखव हं—चुकारपणा चालायचा नाहीं. ’

मुंबई पहातां पहातां चार दिवस गेले, पण वाटलं होतं तितकं सिंधूला मीनाशीं समरस होतां आलं नाहीं. कापड खरेदी करतांना मीना दुकानदाराशीं भांडली,

त्याचं तिला कौतुक वाटलं. मुंबईच्या रस्त्यांची नि ठिकाणांची नांव मीना पटापट घेत होती, तेव्हां तिचं कौतुक अधिकच वाढलं. तरीसुद्धां तिच्याबरोबर जातांना सिंधूला जो संकोच वाटत होता तो कमी झाला नाहीं. रस्त्यांत मीनाच्या मैत्रिणी तिला ताटकळत ठेवीत. मग मीना म्हणे—मला उशीर नाहीं ना ग लागला सिंधू? तिला एखादा मित्रही भेटे. मग तर सिंधूची स्थिती केविलवाणी होई. संकोचतां संकोचतां तिला पुरेसं होऊन जाई. कधीं कधीं ती त्यांच्याकडे पाठ करी. कधीं दूर जाऊन उभी राही.

चार दिवस गेले. पांचव्या दिवशीं वेगळंच ताट तिच्यासाठीं वाढून ठेवलं होतं. आदल्या दिवशींच कोकोनाडावर जपानी विमानांचा हल्ला झाला होता. लवकरच मुंबईवरही हल्ला होणार अशा दाट अफवा उठत होत्या. पहाटेपासूनच लोक पळून जाण्याच्या तयारीस लागले होते. नि सकाळींच मुंबईचीं सारीं स्टेशनं त्याच्या आवाजानं घुमूं लागलीं होतीं.

त्या दिवशीं दोघीजणी बाहेरून घरीं आल्या. त्या दरवाजांत असतांच मावशी म्हणाली.

‘ सिंधू, तार आलीय् केशवाची. ’

केशवाची तार ! !

मावशी पुढें म्हणाली,

‘ तुझ्या आईनं त्याला धाडलय् तिकडून तुला नेण्यासाठीं. निघण्याची तयारी ठेव. ’

मीनानं विचारलं,

‘ म्हणजे ग काय ? ’

‘ अग मुंबईवर हल्ला होणाराय् ना ? ’

मीना म्हणाली,—

‘ आपण रहाणार ते आपल्याला धोका नाहीं वाटत ? ’

तिचा पदर ओढीत सिंधूनं म्हटलं,

‘ नको ग ! मी आपली जात्ये. ’

फणकाऱ्यानं मीना म्हणाली,

'बरं ! या !'

पण सिंधूचं मीनाकडे लक्ष नव्हतं. तिला केशवाच्या येण्याचं सारखं वाटत होतं. तिला वाटत होतं, त्यानं नेण्यासाठीं यायला कशाला पाहिजे ? आपल्याला एकटीला जातां आलं असतं. आतां तो येईल नि मग मावशी–मीनाजवळ तो कांहीं भलतंच बोलून गेला तर ? छे ! छे ! उगीच तो येतोय् नि आई तरी अशी कशी ?

संध्याकाळीं यावयाचं माणूस आलं. पण तो केशव नव्हता. सिंधूचा लांबचा चुलता होता. सिंधूला हायसं वाटलं. निघतांना मावशीचे डोळे ओले झाले नि मीनान व्हिक्टोरिया स्टेशनाकडे जाऊं लागली, नि मावशीच्या निरोपानं जड झालेलं तिचं मन केशवाच्या आठवणीनं एकदम फुललं. केशवासाठीं आणलेलं सामान तिनं वेड्यासारखं चाचपून सुद्धां पाहिलं.

मग तिला वाटलं, केशव आपल्याला नेण्यासाठीं आला असला तर ! निदान त्याला डोळे भरून आपण पाहिलं तरी असत.

केशवाला पाहण्याच्या कल्पनेनं तिच–हृदय अगदां हलकं झालं. तिच्या मनांत विचार आला. नानांना केशवाबद्दल विचारावं, तो कसा आहे—तो कां आला नाहीं ?

इतक्यांत नानांना खोकल्याची उबळ आली. सिंधूनं त्यांच्याकडे पाहिलं. मुठींतलं विडीचं थोटूक टाकून हातात तोंड घालून ते खोकत होते. सिंधूला वाटलं,—छे ! आपण भलतंच विचारणार होतों.

व्हिक्टोरिया स्टेशनाच्या आवारांत शिरली. तिथं वाहनांची एकच भाऊगर्दी झाली होती फुलांमधून मुंग्या बाहेर पडाव्यात तशी त्यांतून माणसं बाहेर पडत होतीं. सामानाचा खच पडला होता. पोलिस बंदोबस्तांत गुंतले होते. तिकीटां-साठीं भली रांग लागली होती. यात्रा घुमते तसं स्टेशन घुमत होतं.

तिला भीति वाटली. आपल्याला या गर्दीतून जातां कसं येईल—तिकीट कसं मिळेल ? नि गाडीत प्रवेश तरी कसा होईल ? आपल्या नि केशवाच्या मधें आलेला हा अडथळा तिला अगदा असह्य झाला. तिला वाटलं आपण उगी-चच मुंबईला आलो. खरंच ! काय अडलं होतं यायचं ? कसली बुद्धी सुचली ?

तिला न्यायला आलेले नाना गर्दीकडे पहात उभे होते ती म्हणाली,—

' नाना, तुम्ही तिकीट काढून आणा. मी राहतें उभी. '

' राहशील उभी ? '—असं कांहीं तरी म्हणत नाना तिकीटासाठीं लागलेल्या रांगेत जाऊन उभे राहिले. तिनं जेव्हां पहिल्या माणसाकडून शेवटल्या माणसापर्यंत नजर टाकली, तेव्हां तिला ती रांग मैल मैल लांब वाटली. मिनिटं मिनिटं ती मोजूं लागली. किती एक मिनिटांनंतर नानांचं एक पाऊल पुढं पडलं. अशा वेगानं तिकीट मिळून परत येण्यास दिवसांचा अवधीसुद्धां अपुरा पडेल, असं तिला वाटलं.

नि एकदम् एक कल्पना मनांत येऊन तिला रुखरुख लागली. तिला वाटूं लागलं, व्हिक्टोरियातच आपण नानांना केशव कां आला नाहीं म्हणून विचारायला पाहिजे होतं. आतां ही गर्दी नि गोंधळ. चुकलंच.

कांहीं वेळ गेला. नानांची फारशी प्रगती झाली नव्हती. तिला अगदीं राग आला. त्यांना थोडं पुढं घुसायला काय झालं ? अगदींच नेभळट माणूस. म्हणूनच चाळीशी भरत आली तरी दुसऱ्याकडे तुकडे मोडतोय्. क्षणभर पुढें होऊन त्यांना पुढं लोटावं, अशीही एक कल्पना तिच्या मनांत येऊन गेली.

हळूं हळूं तासावर तास गेले. सिंधूला अतिशयच कंटाळवाणं झालं. गडबड आणखी वाढतच होती. मिनिटामिनिटाला उतारूंचे लोंढे आंत येत होते. माणसाचा शब्द माणसाला ऐकूं येत नव्हता. हवा कुंद होत चालली होती नि डोकं भरभरत होतं.

नानांना अजून तिकीट मिळालं नव्हतं. कांहीं वेळानं तिकिटं बंद करण्यांत आलीं. नाना तिच्याजवळ येऊन उभे राहिले.

तिला आतां केशवाची अधिकच आठवण आली. तिला तो आला असता तर बरं झालं असतं, असं वाटूं लागलं. तो आला असता तर आपल्याला जपून वागायला लागलं असतं, एवढंच. जरा दूरवर बसलों असतों—बोलणं कमी केलं असतं—तो रागवला असता, तर मागून समजावतां आलं असतं.

पण थोड्या वेळानं तिचं तिला वाटूं लागलं कीं आपण कल्पना करितों, यापेक्षां निराळंच झालं असतं. तो आला असता तर आपल्याला आज निघतांच आलं

नसतं. बाजारांत त्यानं येणं भाग पाडलं असतं. सिनेमा चुकला नसता. फिरणं टाळतां आलं नसतं. मग मावशी नि मीनाच्या सारं लक्षांत आल्याशिवाय राहिलं असतं थोडंच ? छे छे !

पहांटेच्या सुमारास तिकिटांची आणखी हुल्लड झाली. बऱ्याच धडपडीनंतर नानांना तिकिटं मिळालीं. गाठोडं उचलून तीं दोघं गर्दीबरोबर वहात प्लॅटफॉर्मवर आलीं.

तेथून जें दृश्य दिसत होतं, तें भयंकरच होतं. इमारतीएवढे सामानाचे उंच ढीग पसरले होते. किडलेलं उंबर फोडतांच शेंकडों किडे गर्दीनं वळवळ करतात, तशी लोकांची वळवळ चालली होती. तिला शंका आली, यांत आपला प्रवेश होईल कसा नि गाडी मिळेल कशी ?

गर्दीबरोबर हेलकावे खात ती प्लॅटफॉर्मवर शिरली नि हेलकावे घेतच उभी राहिली. अखेर गाडी आली. प्लॅटफॉर्मवर येतांच लोकांचा लोंढा एकदम मागं आला. स्वत:चा झोक सावरतां सिंधूला नकोसं झालं.

गाडी उभी राहिली. दरवाजे नि खिडक्यांवर लोकांनीं बोजांसह झेपा टाकल्या. नानाचे मागोमाग ती पण रेटारेट घेत पुढं चालली होती. तिचं डोकं दोन अवाढव्य खांद्यामधें पिचलं होतं नि अंबाडा सैल झाला होता. लोक मागून लोटीतच होते.

इतक्यांत आपल्या पदराला ओढ बसल्यासारखी तिला वाटली. हात मागं नेसण्याकरतां तिनं उचलला पण तो नानांच्या पाठीखालीं दाबून बसला होता. मग पदराची ओढ कमी झाली. पण कासोट्याच्या बाजूला चिमटा बसला. तिनं अंग चोरण्याचा प्रयत्न केला. पुन्हां एका मागोमाग चिमटे बसूं लागले. शरीर शक्य तितकं चोरून तिनं नानांना पुढं ढकललं. डबा आतां अगदीं जवळ आला होता. तिनं डब्याची मूठ पहाण्याकरितां वर मान केली. तोंच तंबाखूनं भरलेला उष्ण श्वास तिच्या तोंडावर दरवळला, नि तिच्या गालांना घाणेरडा ओलसर स्पर्श झाला. तिनं तोंड बाजूला केलं. पुन्हां तेच ओंठ तिच्या मानेवर पडले. तिला अगदीं शिरशिरी आली. तिनं खांदे बाजूला केले नि मान खालीं घातली.

अंगाला दरदरून घाम सुटला होता. डोळे फुलले होते. तिनं झरकन् मुठीला

हात घातला. इतक्यांत तिचा पदर बाजूला झाला. चार पांच बोटं तिच्या स्तनावर फिरलीं. काय होतय् नि काय नाहीं, हेंच तिला समजेना. मुठीचा हात सोडून तिनं पदर सावरला.

लोकांनीं लोटल्यामुळंच ती आंत शिरली. तिला स्वत: शुद्ध नव्हती. लाजेनं शरीर मेलं होतं. शेकडों डोळे वटारून वटारून भोंवतालीं गिरक्या घालीत होते. तिनं डोळे घट्ट मिटले. तिला वाटलं, आपण खोलखोल जात आहोत.

तिनं डोळे उघडले तेव्हां गाडी चालू झाली होती. डब्याच्या लहानशा हेलकाव्याबरोबर तिचा तोल जात होता. डोळ्यांची आग होत होती नि डोकं चढलं होतं. बसलेले चिमटे विषारी बाणांप्रमाणं टोचत होते. गालावरचा ओलसरपणा तिला अजून भासत होता. ती पदरानं पुसत होती. पण पुसण्यानं कमी न होतां तो वाढतच होता नि त्याला दुर्गंधापेक्षां दुर्गंध येत होता. तिला रडायला हवं होतं पण रडूं येत नव्हतं. गाडी पुढं चालली होती पण तिच्या इच्छेविरुद्ध. हातांत असतं तर ती होती तिथेंच जन्मभर थांबली असती.

असहायतेनं तिनं नानांकडं पाहिलं पण नानांचं लक्ष तिच्याकडं नव्हतं. त्या गर्दीतही ते कोणाशीं तरी सलगीनं बोलत होते. तळहातावर तंबाखू नि नखावर चुना होता.

मग केशवाची तिला आठवण आली. फारफार आठवण आली. पण आठवावं काय हेंच तिला कळेना. तिनं खूप खूप आठवून पाहिलं. पण एक साधा प्रसंग सुद्धां डोळ्यापुढें येईना. क्षणभरच तिला भ्रांत पडली. कधीं केशवाच्या सहवासांत आपण होतों का ? कधीं आपण त्याच्याशीं बोललों का ?

अशाच अवस्थेंत आगगाडींतून ती खालीं उतरली.

बैलगाडी स्टेशनावर आली होती.

गाडी गांवाकडं चालू लागली. ती दगडावर ठेचाळत होती. प्रत्येक आचक्याला तिचं डोकं आपटत होतं नि लाकडं पाठींत रुतत होतीं. ती अगदी दीन झाली. तिनं डोकं खाली टेकलं.

त्या क्षणीं तिला केशव अगदीं जवळ हवासा वाटला. तिला वाटलं तो आला नि एखादा शब्द बोलला तरी किती बरं वाटेल, तो आला नि हंसला तरी किती—

अकस्मात् तिला आठवण झाली. केशवासाठीं आणलेलं कापड ती गाडींत विसरली होती.

एकदम ती दचकून बसली झाली. केशवाविषयीं जें जें मनांत आलं, तें ते स्वप्नच ठरणार तर? केशवाला भेटायचं? केशवाला भेटायचं कसं? त्याला सांगायचं काय? त्याच्याशीं बोलायचं काय? हें कलंकित शरीर त्याच्यापुढं उभं राहील कसं? केशवापुढं जाताच आपण लाजेच्या भारानं मरून जाऊं, किंवा मरून गेलों तर किती बरं होईल.

गाडी गांवाजवळ आली. हळूंहळूं गांवांतील झोपड्या दिसूं लागल्या. इतक्या उदास अशा त्या तिला कधींच वाटल्या नव्हत्या, गाडी घरापुढें उभी रहाताच ती झटकन् खालीं उतरली. इकडे तिकडे न पहाता तिनं आपली खोली गांठली.

समोरच तिचा आरसा टांगलेला होता. पूर्वींच त्याला चार तडा गेल्या होत्या. तिनं पुढं होऊन आपला चेहरा पाहिला. त्यांत चार प्रेतकळा आलेलीं तोंडं दिसत होतीं नि इंगळासारखे लाल डोळे होते. आरशाभर डाग पडलेलं कातडं पसरलं होतं नि भुरक्या केसांचं पोतंच वर दिसत होतं. तिला स्वत:ची भीति वाटली. शेकडोंवर्षांचं वार्धक्य आपल्यावर उतरत असल्याचा तिला भास झाला. आपलं तोंड दोन्ही हातानीं झाकून ती खालीं निजली.

इतक्यांत खोली बाहेर पावलं वाजलीं. तिनं—ओळखलं—केशवाचींच पावलं होतीं तीं. ती अगदीं व्याकुळ झाली. उठून दार लावावं, असं तिला वाटलं. पण पायांत शक्ती नव्हती. त्याला ओरडून सांगावं पण शब्द फुटत नव्हता. आंतल्या आंत ती ओरडली. केशवा आंत येऊं नकोरे—नकोरे केशव आंत येऊं—नको नारे.

पण केशव आंत आला. तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला. हात पाय शिथल पडले. केवश जवळ आला. जवळ आला नि खालीं बसला. त्याच्या धोतराचा वारा तिच्या अंगावर आला. तिच्या छातींत धडधडूं लागलं, आपले डोळे उघडले जाऊं नयेत म्हणून तिनें गच्च मिटले. क्षणभर अंगाखालची जमीन फिरल्यासारखी वाटली. तिनं आपले ओठ गच्च आवळले.

तोंच तिच्या हाताला उष्ण स्पर्श झाला. ती एकदम दचकली. केशवानं आपलीं बोटं तिच्या बोटांत अडकविलीं होतीं. हळूहळू बोटांवर दाब बसूं

लागला. तिला वाटलं हा स्पर्श आपणाला सहन तरी कसा होईल ? तिनं दांत आवळले. मुठी वळल्या नि जे कांहीं घडेल त्याला ती तयार झाली.

पण कांहींच झालं नाहीं, तिच्या मुठी सैल पडल्या. केशवाचा स्पर्श तिला भासूं लागला. त्याचा हात तिनं तसाच ठेऊन दिला. तिला तो स्पर्श हवाहवासा वाटला.

मग तिनं डोळे उघडले. मन कसं समाधानानं भरलं होतं. पण तें समाधान केव्हां मिळालं, याची कल्पना नव्हती. डोळे सुखानं भारावले होते, पण तें सुख केव्हां लाभलं याची जाणीव नव्हती. केशवाचा हात तिच्या हातांत होता, पण तो काढून घेण्याची घाई नव्हती. त्यांत संकोचही नव्हता की लज्जा नव्हती.

तिला मागची आठवण झाली. हा स्पर्श होऊं नये म्हणून आपण कितीदां संकोच केला, कितीदां लोकांना भ्यालों, कितीदां लाजलों, नि ह्याच स्पर्शानं आज आपलं अपरिमित दुःख दूर केलं. आपल्या वठून गेलेल्या मनाला पुन्हा जीवन दिलं. आयुष्यांतून आपण उठणार होतों, ते आयुष्यांत आणून वसवलं. छी छी ! केवढी चूक होती आपली.

स्वतःच्या धिक्काराच्या कल्पनेनं तिची बोटं केशवाच्या बोटावर अधिक आळवली गेली. मग तिनं केशवाकडे निश्चलपणं टक लावली. पूर्वी दिसला नव्हता इतका गोड तो दिसूं लागला. नि पूर्वी आवडला नव्हता इतका आवडला. तिच्या मनांत आलं, पहाण्यांत सुद्धां इतकं सुख आहे तर ? नि इतकं दिवस मूर्खपणानं आपण तें दवडलं.

त्याच वेळीं केशवानं किंचित भीत भीतच तिचा हात हातांत घेतला, नि ओठांतच त्यानं हांक मारली,—

'सिंधू !'

ती किंचित् हसली, जणूं तिला म्हणायचं होतं.—

'बोल ना ! असला कसला रे संकोच !'

मग तिच्या मनांत काय आलं, कुणास ठाऊक ? तिनं आपली सगळी शक्ती एकवटली. आपला मोकळा हात त्याच्या गळ्याभोंवती नेला नि आपलं तोंड त्याच्या कुशींत लपविलें. बिचारा केशव क्षणभर गोंधळला. मग त्याच्याही लक्षांत आलं—जें हवं होतं तेंच मनापासून मिळतय्. त्यानं एक हात तिच्या कमरेभोंवती टाकला, डोकं खालीं नेलं नि तिच्या केसांवर आपले ओठ टेकले.



## म्हाताऱ्याचे शेवटचे दिवस !...

म्हाताऱ्याला विचारलं पाहिजे—म्हातारा पडून आहे—म्हाताऱ्यानं अमूक केलं,—असे शब्द मुलानं म्हटलेले ऐकले कीं आजोबाना बरं वाटत नसे.—आई जिवंत होती तेव्हां तिलाही हा मुलगा असंच म्हणे,—म्हातारे ! चहा हवा का ?—म्हातारीला नवं लुगडं आणलयू.—आजोबांना वाईट वाटे. म्हातारपणीं मुलांकडून आदराशिवाय दुसरं काय हवं असतं ?

आजोबांचं घरांतलं सर्वांत लाडकं माणूस म्हणजे त्यांची नात—कमल. कमलनं विडा कुटून दिल्याशिवाय ते खात नसत. न चावण्याजोगा चविष्ट पदार्थ घरांत केला कीं कमल त्याचं पीठ करून आजोबानं देई. कमल उशाशीं फुलं आणून ठेवी. हाताचे सांधे आखडले कीं हात न दुखवतां कमलच सदरा काढून घेई. सदरा मळला कीं कमल म्हणे,—आजोबा ! सदरा धुवायला झालाय्—काढा पाहूं ! आजोबाचं नि तिचं असं कांहीं जमलं होतं की तें पाहून सारे कुत्चेष्टेनं हंसत नि म्हणत,—' आजोबा सारी इस्टेट कमललाच देणार हं ! '

आजोबा नेहमीं म्हणत,—' कमलचं लग्न उशिरां करायचं. केव्हांतरी संसाराच्या रगाड्यांत तिला लोटायची—चार दिवस माहेरीं मर्जेत राहीना का ? त्यांतून लग्न केलंच तर असं ठिकाण पहायचं कीं—'

असं होतांहोतां कमलला विसावं वर्ष लागलं. एक दिवस आजोबांच्या खोलींत विडा कुटीत असतां तिचे वडील ( आजोबांचा मोठा मुलगा ) आंत आले. आजोबांच्या गादीच्या टोकावर बसत ते म्हणाले.—

" भाऊ, हिचं लग्न करायचं म्हणतों."

एकदम दचकून आजोबा ओरडले,—

" काय !"

" कमलचं लग्न केलं पाहिजे."

" लग्न ! अरे तिचं वय असं काय आहे ?"

" लहान का आहे ती ? आतां विसावं वर्ष लागेल !"

'वीस ! अरे सोळा वर्षांची दिसते सारी. जरा घरकाम—इकडेतिकडे कांहीं शिकूं दे.'

" आतां काय शिकणार ती ? शिकायचं वय होतं, तेव्हां शिकली नाहीं. रात्रंदिवस घरकामाचे धडे चालूच आहेत. तरबेज झालीय् ती—"

" मला सांगूं नकोस. एवढ्यांत लग्न करायचं नाहीं !"

उठत किंचित् हंसत मुलगा म्हणाला,—

" तिला फुस लावूं नका भाऊ ! चांगलं ठिकाण आलं, तर यंदा तिचा बार उडवणार."

मुलगा बाहेर जातांच आजोबा म्हणाले.,

" बार उडवणार म्हणे—यांना मुली घराबाहेर घालवण्याची घाई होते. तें कांहीं नाहीं, कमल ! खरंच तुला लग्न करायचंय ?"

" नाहीं आजोबा !"

" शहाणी बाळ आहे. शीक, मोठी हो."

" मला शिकायचंय्—इंग्रजी शिकवाल ?"

बाहेरून मुलगा म्हणाला,—

" भाऊ ! मी सारं ऐकतों आहें. तिच्या मागं चार बहिणी आहेत. त्यांनाहीं तसंच ठेवायचं का ? तेंही सांगून टाका."

आजोबा कांहीं बोलले नाहीत. कमलनं कुटलेला विडा त्यांच्यासमोर ठेवला नि ती बाहेर गेली.

यानंतर घरांत गडबड वाढूं लागली. आज कोण पहायला येणार आहे—आज

कुणाला टिपण दिलं–मुलगा कुठला आहे–घरदार आहे का–घरीं माणसं कोण कोण–नि मग कमलची थट्टा–

पण आजोबा मात्र हें सारं शून्य मनानं ऐकत होते. मुलगा कसा मिळेल, यापेक्षां कमल दूर जाणार, यामुळं त्यांची विवंचना वाढली होती.

एके दिवशीं पाहण्याचा एक समारंभ झाला. दुसरे दिवशीं आजोबांनीं मोठ्या मुलाला विचारलं,—

" काय रे ! काय उत्तर आलं त्यांचं ? "

" नाहीं म्हणाले ते ! "

" नाहीं म्हणाले ? कां नाहीं ? "

" त्यांना इंग्रजी येणारी मुलगी हवीय. "

आजोबा उसळून ओरडले, " त्यांना मडम पाहिजे कीं बायको पाहिजे ? अरे घरचे चार धंदे सांभाळील कीं नाहीं हें पहायचं, का इंग्रजी पहायंच ? यांच्या बायका स्वयंपाक घरांतच बसायच्या ना ? यांच्या बायकांना मुलंच व्हायचीं ना ? चार मंडळी आली कीं ऊठबस बायकांनांच करायची ना ? अरे मग यांच्या अकला गेल्या कुठं ? चार दिवस हातांत हात घालून फिरायची मजा करतील, मग पोरंबाळं होऊन या तकलादू बायकोला कांहीं सांभाळतां आलं नाहीं कीं रडत बसतील. छे ! छे ! आमच्या कमलला असलीं स्थळंच नकोत. हुंडा जास्त द्यावा लागला, तरी चालेल. मला सांग... "

अखेरीस कमलच्या गांठी जो नवरा होता, तो आला. त्यानं कमलला पाहिली नि पसंत केली. कमलनं त्याला पसंत केलं. पहाण्याचा समारंभ आटोपतांच कमल आजोबांच्या खोलींत शिरली. आजोबांच्या शेजारीं बसून ती त्यांची पाठ चेपूं लागली. आजोबानीं विचारलं,—

" काय झालं ? "

कमलनं फक्त मान हलविली.

आजोबांनीं विचारलं,–" काय ? "

कमलनं अंऽ हं ऽ केलं. नि मग मुलीच्या मनांत येणारे माहेरच्या वियोगाचे

विचार मनांत येऊन तिच्या डोळ्यांत पाणी आलं. तें पाणी पाहून आजोबा कळवळून म्हणाले,—

" कमल,—बाळ ! काय झालं ? —"

तिच्या डोळ्यांत दुःख दिसत होतं नि तोंडावर आनंद दिसत होता. तिला कसला आनंद झालाय् नि कसलं दुःख झालंय् हें आजोबांना मनांतून कळत होतं पण तें उघड बोलण्याचं त्यांनाच भय वाटत होतं. अजून त्यांना आशा वाटत होती कीं कमल आपल्याजवळ राहील. त्यांनींच विचारलं,

" कमल ! तुझ्या आजोबांना तूं सोडून जाणार ? "

कमलची मान खाली गेली. ती बोलली नाहीं. आजोबांनीं पुन्हां म्हटलं.

" कमल ! तुझ्या आजोबाचं कसं होईल ग ?......तुला ठिकाण खरंच पसंत आहे ना ? कुणी जबरी केली नाहीं ना ? "

इतक्यांत दरवाजांत एक सावली हलली, मोठा मुलगा आंत येत कठोर आवाजांत म्हणाला,

" भाऊ ! मी ऐकतोंय सारं. तुमचे दिवस किती राहिले आतां ? तिच्या जन्माचा हा प्रश्न आहे. उगाच तिला प्रश्न कसले विचारतां ? ऊठ ग तूं इथून."

कमलनं आवरून धरलेला हुंदका आतां मोठ्यानं बाहेर आला. ती डोळ्यावर पदर धरीत आंत गेली. बापलेकांनीं क्षणभर एकमेकांकडे पाहिलं. मग लेक बाहेर गेला.

मुलगी बाहेर गेल्यावर आजोबांना वाईट वाटलं. ते मनाशीं म्हणाले, " खरंच मी किती स्वार्थी आहे. कमल मला कशाला हवी आहे ? माझी सेवा करायला. ती पिंडा कुटून देत, गादी स्वच्छ ठेवत, सदरा धुते. पण तिच्यावर माझा काय बरं हक्क ? तिनं केलं, हेंच फार केलं. तिला स्वतःच्या संसाराची ओढ नसेल का ? माझं काय—आहे नि नाहीं. छे ! आतां स्वतःच सारं करायची संवय ठेवली पाहिजे. "

कमलचं लग्न झालं. श्रीगजाननाच्या कृपेनें सोहळा उत्तम रतीनं पार पडला. कमल नवऱ्याबरोबर गेली पण ती गेल्यावर घर अगदीं खायला येऊं लागलं. आजोबांना तर फारच वाईट वाटलं. त्यांनीं नकळत जरी डोळ्यांतलं पाणी पुसलं

तरी सर्वांना दिसलं. नि सर्वांचेच डोळे ओले झाले. आजोबा आपल्या खोलीत पडून राहू लागले.

म्हटल्याप्रमाणं प्रथम कांहीं दिवस हिरीरीनं आजोबांनीं आपलं काम आपणच केलं. स्वत:चा विडा कुटला. गादी नीट केली. सदरा काढला. कुणी सून मदत करायला आलीच, तर ते तिच्या अंगावर ओरडले. पण लवकरच त्यांना थकवा वाटूं लागला. नाइलाजानं त्यांना अंथरुणावर पडून रहावं लागलं.

मग घरांतल्या मंडळींनीं त्यांच्या सेवेला कमलची धाकटी बहिण–सुमन पुढं केली. सुमनचं शाळेंतलं शेवटलं वर्ष होतं. तिचं वैशिष्ट्य असं होतं कीं पातळ नेसूं लागल्यापासून गोल पातळाशिवाय पातळच ती नेसली नव्हती !

आजोबाना तिचं गोल नेसणं आवडलं नाहीं. ते म्हणाले,—" सुमे ! कमळांत जो गंभीरपणा होता, तो तुझ्यांत नाहीं. ती कशी झटपट काम करी. हें असं पातळ नेसून स्वत:कडे बघणार कीं काम करणार ? "

पण कमळची ही धाकटी बहिण आजोबांच्या बोलण्यानं दबणारी नव्हती. आजोबांचं सारं बोलणं मुकाट्यानं ऐकून ती त्यांना नाहीं नाहीं ते प्रश्न विचारूं लागली.

" आजोबा ! तुमच्या लहानपणीं बायकांचा पोषाख कसा असे ? "

आजोबा ओरडत,–" सुमे ! "

" काय ? "

" तूं फार बोलतेस. "

मान घुसळीत सुमी लाडालाडांत म्हणे,–

" हें काय हो आजोबा ! सांगा ना ? "

आजोबा म्हणत,

" त्यावेळीं बायका शालू पांघरीत. "

सुमा हंसत विचारी, " शालू ! "

आजोबा सांगत,—

" त्या नथ वापरीत. "

मोठ्यानें हंसत सुमन म्हणे,—" नथ ! ! "

तिच्या हंसण्यानं चिडून आजोबा म्हणत,

" तुझ्या नाती तुला अशाच हंसतील. "

" हंसूं यात ! म्हणून मी हंसूं नये वाटतं ? माझ्या नातींचं हंसण मला थोडंच ऐकूं येणाराय ? मी त्यावेळीं स्वर्गांत असेन. "

" स्वर्गांत म्हणे ! स्वर्ग मिळायला काय केलं आहेस ?—"

आजोबांकडे बोट करून ती हंसत म्हणे,—

" वृद्धांची सेवा ! "

कांहीं दिवसानीं आजोबांना कबूल करावं लागलं कीं कमलपेक्षां सुमन कांहीं कमी चपळ नाहीं. पण एवढंच कीं सुमा जास्त लबाड आहे. आपण बोलते नि दुसऱ्याला बोलायला लावते. त्या नादांत आपले पाय दुखायचे थांबतात.

कांहीं वाचून दाखवायचं असलं, तरी सुमन वाचून दाखवी. तिचं वाचणं कमलपेक्षां स्पष्ट नि समजून असे. आजोबांना केसरी वाचावासा वाटे. कधीं कांहीं पोथ्यांतला भाग ऐकावा, असं त्यांच्या मनांत येई. कधीं जुनीं कागदपत्र तें वाचायला देत. हीं कागदपत्रं ते नेहमीं आपल्या गादीखालीं ठेवीत. त्यांची गादी नीट घालणं हे त्यामुळंच मोठं अवघड काम झालं होतं. गादीच्या उशापायथ्याखालीं कागदाचे भारे असत. ते काढलेच तर जिथल्या तिथं ठेवावे लागत. आपल्या आयुष्यांतील कांहीं आठवण पुन्हा वाचून पहावीशी आजोबांना केव्हां वाटेल नि केव्हां नाहीं !

सुमानं हें जुने कागद–पोथ्या दोन–चार दिवस वाचून दाखविल्या. मग ती कंटाळली नी म्हणाली,—

" आजोबा ! तेच तेच भाग वाचीत बसतां ? नवं वाचून दाखवूं का ? "

" नवं मला काय करायचं ? "

" वा ! नवं नच ऐकलं की, मनालासुद्धां बरं वाटतं ! "

" बरं ! आण नवं काय आहे ते. "

ही पोरगी काय वाचून दाखवणार याचा आजोबा विचार करूं लागले. आपल्या दोन नातींमधील फरक हळूहळू त्यांच्या लक्षांत येऊं लागला होता. कमल सरळपणं सांगितलेलं काम पुरं करणारी होती. तिला स्वतःचं मतच नव्हतं. सुमनला

प्रत्येक विषयांत मत होतंच, पण दुसऱ्यांचीं मतंही ती बदलवीत होती. ज्याचे जगांतले दिवस संपत आले, अशा म्हाताऱ्या आजोबाचीसुद्धां त्यांतून सुटका मन्हती.

सुमननं पदराखालीं लपवून पुस्तक आणलं. मग तिनं आजोबांना विचारलं,

" आजोबा ! सोशलिझम म्हणजे काय तुम्हाला ठाऊक आहे ? "

आजोबा वेळेवर सावध झाले. नात आपलं ज्ञान बाहेर काढणार हें त्यांच्या लक्षांत आलं.

" थोडं थोडं ठाऊक आहे. "

" मला सांगा ना ? "

" सोशलिझममध्यें सर्वांना सारखं मिळणार. गरीब—श्रीमंत भेद जाईल. "

" तुम्हाला तो आवडतो का ? "

" कां आवडायचा नाहीं ? पण काय ग ? श्रीमंताचं काढून तुम्ही गरिबांना वांटणार, मग आधींच व्यसनी नि मग्रूर झालेले गरीब जास्त बिघडतील. "

जोराजोरानं सुमा हंसूं लागली नि म्हणाली,—

" आजोबा ! सोशलिझम् तुम्हाला कळलाच नाहीं. मी तुम्हाला आतां समजावून सांगतें. ऐका —"

" मला काय करायचं आतां शिकून ? '

" तुम्हाला आतां समाधान हवं ना ? नसलेलं ज्ञान मिळालं की, खरं समाधान मिळतं आजोबा. मी सांगतें तें ऐकलंच पाहिजे. '

" बरं सांग. "

सुमन सांगूं लागली. मार्क्सवादाची उभारणी कशावर आहे हें तिनं सांगितलं. सरंजामशाही म्हणजे काय, यंत्र निर्माण झाल्यावर काय परिणाम झाले, त्यांतून भांडवलदार वर्ग कसा उत्पन्न झाला, त्यानं सरंजामशाही रसातळाला कशी नेली, भांडवलशाहीचं भवितव्य काय, सोशलिझमचं खरं स्वरूप कोणतं, अशा नाना गोष्टी ती सांगत होती. त्या ऐकतांऐकतां आजोबांच्या डोक्यांत वेगळेच विचार येत होते:—" या मुलीला हा अभ्यास काय करायचा ? "

तिचं सांगणं संपल्यावर आजोबांनीं विचारलं,

" काय ग पोरी ! तुला हे सगळं कसं ठाऊक ? "

" मी अभ्यास करतें आहें."

" शाळेंत शिकवतात ? "

हंसत सुमा म्हणाली,

" अब्रह्मण्यं ! तिथं नांवसुद्धां घेत नाहींत. "

" मग हें शिकतेस कशासाठीं ? "

" ज्ञानासाठीं नि ज्ञान देण्यासाठीं. "

" तुला काय फायदा ? "

" कां बरं ? आपलीं दुःखं कशामुळं आहेत हें लोकांना कळेल. "

" कळून काय होणार ? "

" दुःख दूर करायचं लोकांना कळूं लागेल, आजोबा ! "

अशा तऱ्हेनं नातीचा समाजवाद बरेच दिवस आजोबा ऐकत होते. ऐकतां ऐकतां एक मोठं कोडं त्यांना पडूं लागलं. सगळ्या जगाच्या गोष्टी ही मुलगी करते, पण हिच्या स्वतःबद्दल ही कधींच बोलत नाहीं. स्वतःच्या आवडीनिवडी-बद्दल नाहीं, लग्नाबद्दल नाहीं. कमल अशी नव्हती. ती स्वतःमध्यें गुरफटलेली दिसे. लग्नाचं नांव काढतांच तिच्या तोंडावर एकदम लाली येई.

एक दिवशीं सुमनला हांक मारीत एक तरुण मुलगा घरांत आला. सुमन नि तो बाहेर बराच वेळ कसला तरी खल करीत बसलीं. त्याला निरोप देऊन आल्यावर आजोबांनीं सुमनला विचारलं,—

" काय ग ! कोण होता ? "

" मित्र होता. "

" मित्र ! "

" नाहीं आजोबा ! तो नि मी एका पक्षाचे सभासद आहोंत. आम्हीं दोघं एकाच विभागांत कामगारांत काम करतों."

आजोबा कांहींच बोलले नाहींत. त्यानंतर सुमनचा मित्र वारंवार येऊं लागला. दोघं कांहीं पुस्तकं वाचीत बसत. कधीं दोघं आजोबांजवळ गप्पागोष्टी करीत. कधीं त्याचा आपआपसांत वाद चाले. आजोबांना तो मुलगा आवडला.

कांहीं दिवस गेले. घरांतली माणसं सुमनविषयीं बोलूं लागलीं. सुमनचं नि त्या मुलाचं लग्न होणार, अशी कुणकुण कानावर येऊं लागली. आजोबा आतां दोघांकडे बारकाईनं लक्ष ठेवूं लागले. ती दोघं एकत्र बसत, पण कांहींतरी मजूरांतील कामाविषयींच्या गोष्टी चालत. ती वाचीत असत, पण तीं पुस्तकं रूक्ष असत. परस्परांजवळ बसलीं, तरी ती दोघं बिलगून बसत नसत. तिच्या खांद्याभोंवतीं-कमरेभोंवतीं हात टाकणं असाही प्रकार झाला नाहीं. कधीं तोंडांतून प्रणयाचा शब्द निघाला नाहीं.

नि असं असूनमुद्धां– ' आमचं प्रेम आहे ' असं सुमननं सांगितलं. हें प्रेम कसलं–नि प्रणय कसला ?–याचा त्यांना विचारच पडला.

त्यांनीं ठरवलं कीं, ही पिढी कांहीं वेगळीच आहे. स्वत:चं असं वेगळं सुखदु:ख या पिढीला नाहीं. नेहमीं तोंडांत लोकांची भाषा नि लोकांचा विचार. त्यांचं स्वत:चं आयुष्य त्यामध्यें दिसायचं. मग त्यांच्या मनांत आलं–कांहीं कां असेना, सुमन सुखी झाली कीं झालं.

यानंतर बरेच दिवस गेले. एकदां दिवसभर सुमन त्यांच्या खोलींत फिरकली नाहीं. त्यांनीं चौकशी केली. तेव्हां त्यांना समजलं कीं ती रडत आहे. एका सुनेला बोलावून त्यांनीं सुमनला खोलींत आणवली. आजोबांनीं कुरवाळीत हळूंच विचारलं,–

" सुमा, काय झालं ? "

" कांहीं नाहीं. "

" हें काय बरं ? सांग ना ! "

" आजोबा ! आमचं भांडण झालं ! "

" इतकंच ना ? पुन्हां सलोखा होईल ! "

" अंहं ! भांडण झालं तें कायमचं . "

" कां ! तो भांडला कां ? "

" मला काय ठाऊक ? "

" तो काय म्हणाला, तें सांग. "

" तें सांगण्यासारखं नाहीं. त्यांना मोठी नोकरी लागली. "

" म्हणून डोळे फिरले वाटतं ? बदमाष ! बाहेर जाऊन त्याला गांठतों. "

" आजोबा हल्लीं बळजबरी चालत नाहीं. प्रत्येकाच्या खुषीचा प्रश्न आहे. मी आवडत नाहींशी झालें. पाहिलंत ना ?—मी कांहीं सुंदर नाहीं. माझ्यापेक्षां सुंदर मुलगी भेटली असेल. "

" सुंदर भेटली असेल म्हणे ! मग आधीं डोळे नव्हते ? गुलगुल गोष्टी केल्या—"

" नाहीं आजोबा ! प्रेमाबद्दल आम्ही बोललोंच नाहीं. "

" बोलायला कशाला हवं. प्रेमाच्या नाहींतर दुसऱ्या भाषेंत बोललां असाल. पण हें काय हें ! म्हणे सुंदर नाहीं ! सौंदर्य करायचं काय ? रात्रंदिवस बायकोला आरशासमोर ठेवायचंय ? संसारांतील कामं हुषारीनं केलीं—बाहेर चार लोकांत हुषारीनं वागतां आलं—झालं ! तुझ्यासारखी शहाणी नि हुषार बायको मिळायला जन्म पाहिजेत. थोडंसं रूप कमी असेल.पण तुला रूप नाहीं असं म्हणतोंच कोण मूर्ख ! मी सांगतों. तूं सुंदर आहेस. थांब ! त्या बदमाषाला भेटतोंच. "

पण सुमननं आजोबांची नि त्याची गांठ पडूं दिली नाहीं. आजोबांच्या लक्षांत येऊं लागलं कीं, सुमन लहान लहान गोष्टींत आपलं मन रिझवण्याचा यत्न करते आहे. ती नृत्य शिकण्यासाठीं जाऊं लागली नि घरीं आल्यावर शिकलेला धडा छोट्या बहिणींवर गिरवूं लागली. तिच्या पायांत घुंगुर बांधून सुमन तिला आजोबांच्या खोलींत आणी नि सांगे,—

" आजोबा ! राधेचा नाच.पहा...हं नाच ग पोरी ! राधा डोईवर घागर घेऊन पाण्याला गेली...कृष्ण मुरली वाजवूं लागला—"

त्या मुलीचे हावभाव पाहून सर्वजण हंसूं लागत.

परीक्षा जवळ आल्यावर सुमननं सारे खेळ सोडले. ती आजोबांच्या खोलींत बसून मनापासून अभ्यास करूं लागली. आजोबांनांही ठरविलं कीं, जरूर लागेल तेव्हांच तिला त्रास द्यायचा.

सुमा मॅट्रिक होणार, याबद्दल आजोबांना शंकाच नव्हती. कुणी शंका घेतली कीं, ते उसळून अंगावर येत. शेजाऱ्यामध्यें मॅट्रिक होणारी सुमा पहिलीच मुलगी होती.—सगळींच माणसं सारखीं नसतात. त्यांतील कांहीं शेजारी सुमाला

पाण्यांत पाहूं लागले होते. ते म्हणत—मुलीच्या जातीची म्हणूनच सुमनला इथं मॅट्रिकपर्यंत चढविली. पण युनिव्हर्सिटींत आंकली मुठ बाहेर येईल. मॅट्रिक म्हणजे काय चेष्टा आहेत ?

असं कुणाचं बोलणं कानावर आलं की आजोबांच्या अंगाचा भडका उडे. ते संतापानें वाटेल तें बोलूं लागत.—या साल्यांची मुलं भटकेगिरी करीत असतात नि मुली नवरा शोधण्याच्या मागें असतात. कुणी पास झालं तर यांना नवल वाटलं, तर त्यांत नवल काय !

परीक्षा जवळ आली तेव्हां सुमनला कोणतंही घरकाम पडत नाहीं, याची आजोबांनी काळजी घेतली. कुणी तिला काम सांगितलं तर ते रागावून ओरडत. "तिला त्रास देऊं नका. तिला अभ्यास करूं द्या.—परीक्षा म्हणजे काय हें तरी ठाऊक आहे ? नाहीं म्हणायला एक परीक्षा तुम्ही दिली आहे खरी."

परीक्षा आली नि संपली. सुमनचे पेपर्स चांगले गेले. हळूहळू निकालाचा दिवस आला.

त्या दिवशी आजोबा लवकर उठले. एक रुपया देऊन निकालाचा अंक त्यांनी विकत घेतला. सुमाचा नंबर ते शोधूं लागले.

सुमन पास झाली.

खिशांतील लाल पेन्सिल काढून आजोबांनीं सुमनच्या नांवाभोंवती एक वर्तुळ काढलं. डोळयाचं समाधान न होऊन ते एकसारखें त्या नांवाकडे पहात राहिले.

मग ते सरळ घरीं आले नाहींत. त्यांचं म्हातारपण पार कुठं पळालं ! पावलं तल्लख पडूं लागलीं. चेहरा हंसूं लागला. हातांतील कांठीं जोरजोरानें फिरूं लागली.

वाटेंत शेजारचे हरिपंत हाटे समोरून येतांना दिसले. यांचा मुलगा तीन वेळां मंडपांत जाऊन आला होता. यांनीच सुमनचं उलट भविष्य वर्तविलं होतं. त्यांच्यासमोर जातांच आजोबांनी सुमनचं नांव त्यांच्या डोळ्यांतच खुपसलं नि म्हणाले,

"हरिपंत ! हें सुमनचंच नांव ना ? मला हल्लीं डोळ्यांनीं दिसत नाहीं पहा ! "

हरिपंतांनीं चेहरा टाकतांच आजोबा काठी फिरवीत पुढं निघाले. मग प्रत्येक निंदकाच्या घरीं जाऊन सुमनच्या नांवाचं तें लाल वर्तुळ पुढं करीत त्यांनीं विचारलं,

" पहा ! ही सुमनचं ना ? मला हल्ली डोळ्यांनं बरोबर दिसत नाहीं–नि चष्मा पण विसरलों. "

सुमनला कधीं भेटेन, असं आजोबांना झालं. तिला सुंदरसं बक्षिस देण्याचा ते विचार करूं लागले. समोरून सुमन आपल्या मित्राला घेऊन येत होती. पण तीं त्यांना दिसली नाहीं. सुमननं हाक मारतांच त्यांनीं दचकून वर पाहिलं. सुमनं नि तिच्याशीं भांडलेला तरुण––

आजोबा आवेशानें काठी उगारीत पुढें झाले.

" काय रे हरामखोरा,–"

सुमन झटकन् पुढं झाली नि हळूच म्हणाली,––

" आजोबा ! आमचे मतभेद होते ते मिटले. आतां आम्हीं भांडायचं नाहीं असं ठरवलंय ! "

परीक्षा पास झाल्याच्या आनंदांत दिवस भराभर गेले. एक दिवस सुमनच्या लग्नाचा मुहूर्तही ठरला.

मग गडबड सुरू झाली. सुमनच्या तोंडून आतां वसंता ( तिचा भावी नवरा ) शिवाय दुसरा शब्द निघेनासा झाला. वसंताला अमुक आवडतं–वसंता असं म्हणाला–वसंताचे मित्र असं आहेत–वसंताच्या आकांक्षा अशा आहेत वसंताला असा. रंग आवडतो...स्वत:ला विसरून ती रंगून बोलत राही.

सुमनमधें झालेला हा बदल आजोबांच्या लक्षांत आला. स्वत:त गुरफटून ती जास्त स्वार्थी झालेली त्यांना वाटली. पूर्वीसारखीं तऱ्हेतऱ्हेनें ती बोलत नाहींशी झाली. सुमनचं वागणं आजोबांच्या मनाला लागलं. त्यांना वाटलं,– "कमल आपल्याला सोडून गेली–सुमनही आपल्याला विसरणार." ते दु:खी झाले.

पण मग स्वत:च्या मनांत आलेला विचार त्यांचा त्यांनाच खाऊं लागला.– " म्हातारपणी माणूस मूर्ख होतो. मीं पण तसाच मूर्ख झालो आहे कां ? माझ्यासाठीं

सगळ्यांनी धडपडावं असं मला वाटतं, लोकांना तसं कां वाटावं ? मला हवं नको तें मारं प्रत्येकानें आस्थेनें पहावं असा इतरांवर माझा काय अधिकार आहे ? माझे दिवस संपले. मला शक्ती नाहीं–उत्साह नाहीं–आकांक्षा नाहीं, तसं सगळ्यांनीं व्हावं ? छे ! त्यांना सर्व आयुष्य काढायचं आहे. आयुष्यांतले आनंद क्लेश त्यांना भोगायचे आहेत. त्यांचीं कर्तव्यं त्यांना पार पाडायचीं आहेत. मी मात्र अडचण झालों आहें नि मीच त्यांच्यावर रागावत आहें. चांगलें नाहीं हें !'

सुमन हर्षानं फुलली होती. आजोबांच्या बदललेल्या दृष्टीला ती अधिकच मनोहर दिसूं लागली. तिच्या पावलापावलांत, तिच्या शब्दाशब्दात, तिच्या हंसण्यामुरडण्यांत तरुणपणाचं, मोकळेपणाचं, आनंदाचं निर्व्याज दर्शन होत होतं. त्यानं आजोबा मुग्ध झाले.

ते स्वत:शीं म्हणूं लागले,–"काय ही मुलगी आहे ! कशांत मागें नाहीं. राजकारण ठाउक आहे. रसिक आहे, शिकलेली आहे, नवऱ्याचं मन राखतां येतं, ही पिढीच वेगळी आहे !"

सुमनचं लग्न झालं.

लग्नानंतर आजोबा फार वेळ बसले नाहींत. ते खोलींत येऊन निजून राहिले. एकदम शक्ति खचल्या सारखं त्यांना वाटलं. तीनचार दिवसांनंतर त्यांची तब्येत एकदम बिघडली. कमल दूर होती; पण सुमनला मात्र तांतडीनं बोलावलं.

शेवटची घटका जवळ येत होती, तसतसा त्यांच्या चेहऱ्यावर आनंद जास्त खुलूं लागला. स्वत:ला कसला हर्ष झालाय् हें तेच स्वत: शोधीत होते. नव्या पिढीचं मन आपण ओळखलं, हा आनंद होता का ? आपण चांगली पिढी मागें ठेवून जात आहेंत, याचा आनंद होता का ? कीं आयुष्याचं वर्म ओळखल्याचा तो आनंद होता ?

शेवटीं त्यांना बोलतां येत नाहींसं झालं, तरीसुद्धां चेहऱ्यावर भेसूरपणा आला नाही. डोळे, ओठ, तोंड सगळीकडे हर्ष दिसत होता. जिभेनं अडखळत ते म्हणाले,

"सुमा–सुमा ! तुझा सोशा–लि–झ–म... असाच विश्वास ठेव... कार्य कर... तुमची पिढी चांगली आहे... आनंदांत रहा."

आजोबा सर्वांना सोडून गेले. मोठमोठ्यानं हुंदके देत पदराचा बोळा तोंडांत कोंबीत सुमन खोलीबाहेर गेली. तरी पण जसं माणूस गेल्यावर अतीव दुःखाचं वातावरण घरांत पसरतं, तसं पसरलं नाहीं. आजोबांच्या चेहऱ्यावर जो हर्ष होता त्याचा हा परिणाम असेल. त्यानं दुःखसुद्धां उजळ केलं. इतकं कीं, शेवटी मोठा मुलगा म्हणाला,—

"म्हातारा फारच चांगला होता. गेला तोही थोडासुद्धां त्रास न देतां. म्हाताऱ्याला फार कळत होतं..."



## आठव्या मुलाचा जन्म !

घरांत आठवं मूल जन्माला येत होतं. पण हें आठवं मूल म्हणजे पुराणांतलं आठवं मूल नव्हे. त्या आठव्यानं जन्माला येऊन आईचा उद्धार केला; हें आठवं जन्माला येत असतानांच आईचा उद्धार करायला निघाल होत ! निदान आईच्या किंकाळ्यावरून तरी तसं वाटत होतं.

घरांतला मोठा भाऊ दशरथ त्याची बायको कौसल्या बाळंतीण होत होती. ती ज्या खोलींत पडली होती तिथं मनस्वी अंधार होता, उजेडांतून आलेल्या माणसाला आंतलं कांहींच दिसलं नसतं. ही काळोखी खोली बाळंतिणींसाठींच होती. बाळंतिणीला वारा लागूं नये म्हणून तिथं लहानशा झरोक्याशिवाय कांहींच ठेवलं नव्हतं.

कौसल्येचं वय तिशीच्या आंतच असेल. लग्न चौदाव्या वर्षी झालं. त्यानंतरच्या सोळा वर्षांत तिनं सात मुलांना जन्म दिला नि आज ही आठव्याची तयारी होती. आठ मुलं होणं हा मोठा विक्रम नव्हता. पुष्कळ शेजारणींना त्यांहूनहि जास्त मुलं झालीं होतीं. कौसल्येची सासूच तेरा मुलांची आई होती. पण आठ मुलांना जन्म देऊन कौसल्या मात्र थकली होती. बाळंतीणबाईचं कांहींच तेज तिच्या अंगावर नव्हतं. सुकलेला चेहरा, डोळ्याभोंवतालचीं काळीं वर्तुळं नि वाळलेले हातपाय. त्यांवर तिचं गंभीर पोट फारच भयाण दिसत होतं.

काळोख्या खोलींत पडून ती वेदनांनीं ओरडत होती. त्या ओरडण्याला

ढोरासारखं ओरडणं म्हटलं असतं तरच शोभलं असतं. एखाद्या कुमारिकेनं तिचं विव्हळणं ऐकलं असतं, तर लग्न न करण्याचंचि तिनं शपथ घेतली असती! कौसल्या विव्हळत होती. मधूनच बाजेवरून उठून खाली जमिनीवर पडत होती. वेदना असह्य झाल्या कीं दांत कडकड वाजेपर्यंत बाजेचे खूर चावीत होती. इतकी धडपड करण्याचं सामर्थ्य त्या तिच्या निर्बळ देहांत आहे हें सुद्धां कुणाला पटलं नसतं.

वेदनांनीं ओरडत असतां, देवाला यांतून कायमची सुटका करण्यास सांगत असतां, तिच्या मनांत मात्र येत होतं, कीं ही खेप आपली शेवटचीच खेप ठरणार. यांतून जगलोंवाचलोंच तर पुन्हां होऊं द्यायचं नाहीं. माहेरीं जायचं... पळून जायचं. पण अगदीं हेच विचार सातव्या मुलाच्या वेळींहि तिच्या मनांत आले होते. तेहि तिला आठवले. किसन जन्माला आला नि वर्ष उलटलं नाहीं तोंच...

कौसल्या बाळंत होत होती. कौसल्येची मुलं ओटीवर तिच्या जावेच्या मुलांत खेळत होती. त्यांच्या आजीनं त्यांना तिथं आणून बसविलं होतं. आणून बसविलं नसतं तरी तीं आपण होऊन बसलीं असतीं. कौसल्येच्या किंकाळ्यांनीं सारं घर-दार चुपचाप झालं होतं. मुलं भेदरली होतीं. भांडायचंचि काय, पण परस्परांशीं हळू बोलण्याचीहि त्यांची हिंमत नव्हती.

मोठीं मुलं मात्र शाळेंत गेलीं होतीं. कौसल्येच्या सासूनं त्यांना जेवायला वाढून शाळेंत पिटाळलं होतं. त्यासाठीं त्या माऊलीनं शाळेची वेळहि आधी करून घेतली होती. शाळामास्तर दुसरातिसरा परका माणूस नव्हता. शेजारचा दिनूच होता. त्याला भेटून आजीनं चोख काम केलं होतं.

कौसल्या विव्हळणं थांबून कांहीं वेळ ऊगी राहिली. तिला ऊगी राहिलेली पाहून सासूनं दरवाजांत येऊन म्हटलं, 'मुळी ऊगाळून देतें ती घे म्हणजे लवकर सुटका होईल.'

'द्या! घेतें.' आंतून आवाज आला.

तिथं सारं कांहीं सासूबाई होत्या. वेदना बंद व्हायचं औषध त्यांचंच; सुईणहि त्याच नि डॉक्टरहि त्याच! साऱ्या सुनांचीं बाळंतपणं त्यांनीच केलीं

होती. पांच सुना नि चार लेकी यांच्यामुळं या शास्त्रांत त्यांनी चांगलीच प्रवीणता मिळविली होती. इतकी, की गावांतसुद्धां अडीअडचणीला गावकरी त्यांना बोलावून नेत.

दशरथ सकाळपासून कुठं बाहेर गेला होता. कौसल्येच्या सासूनं एकदोन वेळां बाहेर येऊन मुलाबद्दल गडीमाणसांना विचारलं, पण कुणालाच ठाऊक नव्हतं. कौसल्येला चाटण देऊन ती दरवाजांत आली तेव्हा दशरथ आंत शिरतांना तिनं पाहिला. पुढं होऊन तिनं जरा रागानंच विचारलं, 'काय रे ! कुठं गेला होतास ? तुझी बायको किंकाळते आहे.'

'कुठं नाहीं. बैल हरवला होता.'

'इतर माणसं मेलीं होती ? कौसल्येनं तूं कुठं आहेस म्हणून विचारलं. म्हटलं बसलाय बाहेर. अडचणीलासुद्धा घरांत राहायला नको म्हणजे काय ?'

'मी घरांत राहून काय करणार ?'

'काय करणार तें दिसतंच ! पण तेवढाच धीर असतो. जा ! तिला पाहून ये. पण खोलींत जाऊं नको.'

खोलीच्या दारांत येऊन दशरथ उभा राहिला. आंत जाण्याची त्याला इच्छाच नव्हती. बाहेर कुणीतरी पांढरं उभं आहे असं पाहून कौसल्येनं विचारलं, 'कोण आहे ?—'

हात छातीशीं बांधून तो म्हणाला, 'मी आहें.'

कौसल्येनं नवऱ्याचा आवाज ओळखला. ती म्हणाली, 'पुढं या ! मला बरं वाटतंय आतां. संध्याकाळपर्यंत ठीक होईल.'

दशरथानं उगीचच 'हूं' केलं.

तिनं विचारलं, 'मुलं ठीक आहेत ना ?'

तो 'हो' म्हणाला.

कौसल्येनं विचारलं, 'जेवणं झाली मुलांची ?'

त्यानं मान हालविली.

'किसनचं खरजीचं औषध लावलं कां ?'

तो म्हणाला, 'लावीन आता.'

तिच्या प्रश्नांना उत्तरं देत असतांना असल्या वेळेलाहि तिला असले प्रश्न सुचावेत याचं त्याला आश्चर्य वाटलं. ती बाळंतपणाला कंटाळली असावी असा अंदाज होता. तो स्वत: तर चिडूनच गेला होता. सात मुलं ! त्यांतली पांच तर नेहमीं आजारी असत. एक खरजीनं सडला होता, दुसरा एका पायानं अधू होता, तिसऱ्याला डोक्यांत विलक्षण फोड आले होते, चौथा रिकेटी होता ! आता हें आठवं मूल कसं असेल ह्याच विचार त्याच्या मनांत आला.

या वेळेला बायकोला धीर द्यायला हवा हें दशरथला कळत होतं. पण त्याचं मन अगदीं विषण्ण झालं होतं. हळूच पाठ फिरवून तो ओटीवर आला. मग चंची सोडून हातावर तंबाखू घेऊन मळत बसला.

पण त्याच्या मनाची अस्वस्थता कमी झाली नाहीं. काळोख्या खोलींत बायकोची दिसलेली आकृति त्याच्या डोळ्यांपुढं आली. बाळंतपण तिला जड जाणार हें उघडच होतं. पण त्याबरोबर आपल्या हातांत कांहीं नाहीं हें मनांत येऊन त्याला वाईट वाटलं. गांवांत त्याच्या वयाचे चौघेपांचजण विधुर झाले होते. चारआठ मुलं मागं सोडून त्यांच्या बायका गेल्या होत्या ! आठ मुलांना संभाळीत ते एकांडा संसार हाकीत होते. चाळिशीच्या माणसाला आठ मुलांची आई होण्यास तयार असलेली बायको कुठून मिळणार ?

दशरथाचा अधू असलेला मुलगा पाय फरफटवीत त्याच्याकडे येऊं लागला. कांहीं तरी विचार मनांत येऊन दशरथ उभा राहिला. गोविंदभटाकडे जाऊन कौसल्येबद्दल त्याला प्रश्न विचारला तर ?...

हरवलेल्या वस्तु, हरवलेलीं जनावरं, चांगल्या वेळा, हें सारं पाहून द्यायचं काम गोविंदभटाकडे होतं. टोपी घालून दशरथ तडक त्याच्याकडे गेला. पण तासापूर्वीच गोविंदभट कुठं बाहेर गेल्याचं समजलं.

तो भेटायचा नाही ही कल्पनाच मनांत नव्हती; त्यामुळं दशरथाच्या मनाला बरं वाटलं नाही. त्याला तो एक लहानसा अपशकुनच वाटला. आधीच उदास झालेलं त्याचं मन अधिकच विषण्ण झालं. घरीं परतायचा बेत बदलून तो गांवाच्या टोकाकडे चालू लागला.

गांवाच्या टोकाला भिवा साळुंख्याचं घर होतं. प्रसिद्ध घर होतं तें. तिथं घरच्या भट्टींतील दारू मिळत असे.

दशरथानं तिथं जाऊन अर्धी बाटली रिकामी केली. मग अर्धा तास तो भिवा बरोबर शेतापाण्याच्या गोष्टी करीत बसला. नंतर तो घराकडे परतला.

दारू जरा चढली होती; पण मन मात्र मोकळं झालं होतं. घराकडे जातांना त्याला ऊदास वाटलं नाहीं. दरवाजांत येतांच ओटीवर बसलेल्या मुलांकडे पहात तो क्षणभर उभा राहिला. मग पुढं होऊन त्यानं एका मुलाला उचललं नि आवेगानं त्याचा मुका घेतला. घेतलेला मुका त्याला आवडला. मुक्यानं त्याला बरं वाटलं आपण मघा उगीच चिडलों असंहि त्याच्या मनांत आलं. ' मुलांवर चिडायचं कशाला ? आपलींच मुलं तीं. त्यांचं सारं केलंच पाहिजे. मुलं नसलीं तर जगायचं तरी कशाला ? मुलं नाहींत ते मुलांसाठीं रडतात. आपलीं मुलं जरा अशक्त, रोगी असतील. मुलांना रोग व्हायचेच. तीं धुळींत खेळतात, जास्त खातात. छे ! हा मुलगा फारच गोड आहे. ' दशरथानं आवेगानं त्याचे मुके घेत म्हटलं, ' पापा दे, आणखी एक दे; आणखी हवाय्...'

मुलाला खाली ठेवल्यावर त्याला कौसल्येची आठवण झाली. तिच्यावरहि चिडायचं कारण नाहीं असं त्यानं ठरवलं. ती काय आपल्याला त्रास देण्यासाठीं थोडाच मुलाला जन्म देते ? तिला पण कष्ट होतात, तिचेहि हाल होतात. ती सहन करतेच आहे. आतां जरा प्रेमानं तिच्याशीं बोलून यावं.

दशरथ कौसल्येच्या खोलीकडे वळणारा तोंच तिच्या खोलींतून जोरजोरानं किंकाळ्या ऐकूं येऊं लागल्या. आपल्या आईला त्यानं लगबगीनं बाहेर येतांना पाहिलं. त्यानं तिला विचारलं, " काय झालं ग आई ? '

लगबगीनं स्वयंपाकघराकडे जात ती म्हणाली, ' कांहीं नाहीं ! तूं आपला बाहेर बसून राहा. '

आईचं बोलणं दशरथाला आवडलं नाहीं. आपल्या बायकोवर असा प्रसंग आला असतां आपल्याला कांहीं कळूं नये ? तो पुढं होऊन म्हणाला, ' आई ! तिला त्रास होतोय् असं दिसतंय. मी नर्स आणूं ? '

दशरथाचं बोलणं ऐकतांच पाठमोरी झालेली आई एकदम वळली नि ओरडली 'मेल्यांनों ! आतांपर्यंत याच हातांनीं ना तुमच्या बायकांच्या सुटका केल्या ? तेव्हां कांहीं कुणी नर्सबाई आल्या नव्हत्या ! जा तूं बाहेर हो पाहूं !'

नाइलाजानं दशरथ बाहेर आला. पण प्रत्येक क्षणाला वाढत्या किंकाळ्या आंतून ऐकूं येऊं लागल्या. आतां मात्र दशरथला धीर धरवेना. ताडकन् उठून तो घराबाहेर आला. शहरांत जाऊन नर्स आणायचीच असं त्यानं ठरवलं.

पण घराबाहेर आल्यावर त्याचा आवेश कमी झाला. शहरांतून नर्स आणायला बैलगाडी हवी नि स्वतःची गाडी तर उभी नाहीं हें त्याला आठवलं. त्याच्या गाडीच्या चाकाची लोखंडी धाव सुटली होती नि चाक लोहाराकडे गेलं होतं. लोहाराला देण्यासाठीं पैसा नसल्यामुळं तें चाक तयार होऊन तिथं अडकून पडलं होतं. लोहारदादा वायदे ऐकायला तयार नव्हता.

कुणाची तरी गाडी मिळवली पाहिजे. शब्द टाकतांच आपली गाडी कोणता गांवकरी आपणाला देईल याचा तो विचार करूं लागला. तो विचार करू लागला तेव्हां त्याच्या ध्यानांत आलं कीं, गावांत फारच थोड्या गाड्या उभ्या आहेत. कुणाचा बैल लंगडतो आहे, कुणाच्या गाडीचं जोखड मोडलं आहे ! भाताचा देवघेवीचा धंदा करणाऱ्या लोकांजवळ काय त्या गाड्या होत्या. पण त्या मोठ्या बारदानी गाड्या होत्या.

बैलगाडीसाठीं नांव आठवतांआठवतां पुनमचंदाचं नांव आठवलं. हा मारवाडी गावांतला सर्वांत मोठा सावकार होता. घरीं तीन गाड्या भातवसुलीसाठीं कुळांकडे धावत होत्या. घरचा एक छकडा पण होता. तो तिकडे वळला.

पुनमचंदाची स्वारी कुणा कुळाशीं हुज्जत घालीत बसली होती किंवा कुळ त्याच्याशीं हुज्जत घालीत होतं. खेडेगावांत हीच गंमत आहे. कोण भांडतंय् नि कोण बोलतंय् हेंच समजत नाहीं. बराच वेळ तो बाजूला उभा राहिला. मक्त्याच्या भाताची कांहींतरी भानगड होती. कुळानं दुसऱ्या सावकाराला भात घालून टाकलं होतं. दशरथ त्यांचा वाद ऐकत बराच वेळ उभा राहिला. पुनमचंदाच्या तें लक्षांत आलं नसेल असं नाहीं; पण आलेला गरजवंत आहे कीं नाहीं हें ओळखण्याची कला खेडेगावांत सावकारांना नि शहरांत श्रीमंतांना विशेष अवगत

झालेली असते. त्या कलेच्या आधारानं दशरथ कशासाठीं आला आहे. हें पुनमचंदानं ताबडतोब जाणलं होतं.

थोड्या वेळानें चमकल्यासारखं करून दशरथाकडे वळून पुनमचंद म्हणाला, ' अरे ! ये ! ये ! बेस. '

दशरथ म्हणाला, ' बसायला वेळ नाहीं, शेठजी ! गाडी हवी होती शहरांत न्यायला. बायको अडली आहे. '

' तुझी गाडी होती ना ? '

' चाक लोहाराकडे दिलंय्. '

' अरेरे ! माझी गाडी दिली असती पण तीन गाड्या वसुलीला गेल्या आहेत. दिवस कसे आले आहेत हें तुला ठाऊकच आहे. जरा उशीर झाला की भात हातीं लागायची आशा नाहीं ! नि आपला सारा जीव भातावर–'

' गाडी नाही ' असं सांगण्याचीच ही प्रस्तावना होती.

दशरथ हळूच जाण्यासाठीं वळत म्हणाला, ' मी पहातों दुसरीकडे, शेठजी ! '

' असती तर दिली असती. तू का कुणी दुसरा आहेस ! '

उगीच कुणीं कुणाच्या उपयोगी पडायचं नाहीं हा नियम खेडेगावांत जास्त जारीनं पाळला जातो.

गाडी मिळत नाही असं पाहून दशरथ खूपच चिडला. तो स्वतःवर चिडला. गावकऱ्यांवर चिडला. मग घराजवळ येतांच कौसल्येच्या जोरजोरानं मारलेल्या किंकाळ्या कानांवर पडतांच तो तिच्यावरहि चिडला. डोक्यांत तिडीक उठून तो तणतणत घरांत शिरला नि बाळंतिणीच्या खोलीशीं येऊन त्यानं गर्जना केली,

' रांडे ! गप्प बसतेस कीं नाहीं ! पुन्हा किंकाळलीस तर फोडून काढीन. गावांत तुलाच एकटीला मुलं होत नाहींत ! अगदी चूप रहा. '

आंतून येणारं किंकाळणं एकदम थांबलं. जणूं कौसल्येच्या तोंडावर कुणीं हातच दिला ! दशरथानं तोंड वळवलं नि त्याच आवेशांत तो बाहेर आला. त्यानं कपाटांतले कांहीं पैसे उचलले, टोपी डोक्यावर ठेवली नि तो बाहेर पडला.

संतापानं दशरथ बाहेर आला खरा; पण त्याच्या मनांत खोल कुठं तरी बोचणं

होतं. कौसल्येला आपण बोललों तें बरोबर केलं नाहीं, असा विचार त्याच्या मनांत आला. तसं करायचं नाही मग करायचं काय ? गावांत एकहि गाडी अडचणीला मिळूं नये ? लोहारानं चार दिवस पैशासाठीं थांबू नये ? दानत गेली होती कुणाची ? त्याची कीं गावाची ?

जसजशीं पुढं पावलं पडत होती तसतसा त्याचा राग उतरत होता. त्याच्या मनांत कौसल्येचेच विचार एकसारखे येऊं लागले. खरंच, तिनं किंकाळणं बंद केलं असेल ? छे ! मी रागांत होतों हें तिला समजलं नसेल का ? नि मी रागावतो हा का माझा दोष आहे ? तिच्या काय, आयुष्यांत समाधान कसलं आहे ?— पोरांचं उकिरडे तिनं काढीत बसायचे नि मरमर मरून, उसनं पासनं करीत वर्षभर घासभर भात नि वस्त्र मी पुरा करायचा ! ती कधींमुद्धां पुरी व्हायची नाहीत. ती दुःखी आहे, मी दुःखी आहे तिला दुःख सहन होतं. मला होत नाही ! मी दारू प्यालो—बिघडलं काय ?

या असल्या विचारांत कौसल्येवरचं लपून बसलेलं त्यांचं प्रेम वर येऊं लागलं. आणि त्या मनःस्थितींत शहरांत जाऊन ताबडतोब नर्स आणण्याचा त्याचा पक्का निश्चय झाला.

चालतच जायला हवं होतं. शहराकडे जाण्याचा रस्ता भिवाच्या घरावरूनच गेला होता. शहराची चाल थोडीथोडकी नव्हती; दहा मैलांची होती. वाटेंत तहान लागेल, थकवा वाटला, तर एखादी–अर्धी बाटली बरोबर असावी असें ठरवून तो भिवाच्या घरासमोर आला नि ओरडला, ' ये भिवा ! '

भिवा बाहेर येतांच हातांतला रुपया खणकन् त्याच्या अंगावर फेकीत तो म्हणाला, ' एक मुरलेली बाटली काढ लवकर. '

गळ्याभोवती गुंडाळलेल्या रुमालांत दशरथानं बाटली लपविली नि तो गांवाबाहेर पडला. मैल दोन मैल गेल्यावर शेतांतील झाडाखालीं बसून बाटलीचे दोन घुटके त्यानं घेतले. मग उठून तो पुढं चालूं लागला. आणखी दोन मैलांवर त्यानं अर्धी बाटली रिकामी केली.

हळूहळू दारू चढूं लागली नि कौसल्येची वारंवार तीव्र आठवण त्याला होऊं लागली. तिचं किंकाळणं ऐकूं येऊं लागलं. त्याचं मन हळवं झालं. एखाद्या

लहान मुलासारखा तो ओक्साबोक्शी रडूं लागला. वारंवार कौसल्लेला हाक मारूं लागला. तिला जें जें बोलला त्याची माफी मागूं लागला, थोबडींत मारून घेऊं लागला !

हळूहळू रडण्याचा आवेश ओसरला. मग पुनमचंदाची नि गांवकऱ्यांची आठवण झाली. त्या सर्वांना शिव्या सुरू झाल्या. झाडाझाडावर पुनमचंद समजून तो दगड फेकूं लागला.

या आवेशानंतर दशरथ थकला. पुन्हा झाडाखालीं त्यानं विसावा घेतला. मग बाटली काढून राहिलेली दारू त्यानं एका दमांत घशाखालीं लोटली.

नवा उत्साह आला—आल्यासारखा वाटला. उत्साह डोक्यांतच होता. शरीर झोकांडे खाऊं लागलं होतं. तोंडानं बडबड चालू होतीच—" शहरांत जातो, नर्स आणतो. आली नाहीं तर हातानं धरून आणतो. पैसे मागत असली तर खळकन् रास ओततो. कौसल्ये ! तूं काळजी करूं नकोस. आता आलोच हां ! पण ओरडायचं नाहीं—अगदीं चूप ! '

त्या धुंदींत निवडुंग, झाड, दगड यांना माणूसस्वरूप आलं. कुणी कौसल्या आलं, कुणी गावकरी, कुणी पुनमचंद. हळूहळू हीं सारी मंडळी भोंवतालीं फिरूं लागली. ' आतां आलोंच हा ! चूप ! ' असं म्हणतां म्हणतां सहाव्या मैलावर दशरथ रस्त्याच्या कडेला पडला !

अगदीं अंधेर पडत आला. थंड वारा लागून दशरथाचं डोकंहि उतरलं. त्यानं डोळे उघडले तेव्हा तो क्षणभर गांगरला. मग लगोलग आपण कुठं आहोंत हें त्याच्या लक्षांत आलं.

लगबगीनं उठायचं त्याच्या मनांत होतं, पण सारं शरीर आंबलं होतं. पायांत अशक्तता आली होती. डोकं हलकं वाटत होतं. मनांत विलक्षण भकासपणा आला होता. घरीं काय झालं असेल याचा विचार मनांत आणण्याससुद्धां दशरथाला शरम वाटूं लागली. घरीं न जातां तसंच कुठंतरी नाहीसं व्हावं, असा वेडा विचार दशरथाच्या मनांत आला.

पण तसं कांहीं एक न करतां तो घराकडे निघाला. कौसल्येचं काय झालं

असेल या काळजीनं मन पुढं धाव घेत होतं; पण दुसरीकडे शरमिंदेपणाची इतकी जाणीव होत होती, कीं पावलं पुढं पडायला तयार नव्हती.

मैल दीड मैल आल्यावर गांवाकडे जाणारी गाडी दशरथाला भेटली.

दशरथाच्या खेड्यापासून दोन मैलांवर एक खेडं होतं. रस्त्ता त्या खेड्यांतून गेला होता. खेड्यांत गाडी शिरतांच कुठनतरी रडण्याचा सूर ऐकूं आला. कुणाचा तरी आप्त गेला होता. रडणारा आवाज पुरुषी होता.

दशरथानं चौकशी केल्यावर त्याला समजलं. कोल्ह्या जाधवाची बायको मेली आहे. तिला काय झालं ? बाळंत होत होती, मूल आडवं झालं. पाटलाच्या म्हातारीनं विळ्यानं शरीर फाडून मूल बाहेर काढलं. आई गमावली, नि मूल राहिलं !

ही हकीगत ऐकतांऐकतां दशरथाला ऐकूं येईनासं झालं. कौसल्या डोळ्यांपुढं दिसूं लागली. पुरुषासारखे पुरुष असून भ्याडपणानं आपण दारू प्यालों नि तिकडे कौसल्या—

गाडीवरून उडी टाकून तो धावत सुटला. आता त्याला धीर नव्हता, गाडीचा वेग फारच हळू होता. घरीं गेल्यावर कोण काय म्हणेल याची त्याला पर्वा नव्हती. रागाची नव्हती, शरमेची नव्हती. आता त्याला कौसल्या हवी होती. बस् एक कौसल्या !

धापा टाकीत तो घरांत शिरला. सारं घर चूपचाप होतं. मुलांचं रडणं नव्हतं, कौसल्येचं किंकाळणं नव्हतं. मुलं ओटीवर दिव्याच्या उजेडांत बसलीं होती. नेहमीप्रमाणं दिव्याच्या स्तोत्र किंवा दुसरं कांही तीं म्हणत नव्हती. सर्वांचे चेहरे भेदरलेले वाटत होते.

दशरथानं दरवाजांतून माजघरांत पाहिलं. त्याची आई समोरूनच आली; पण त्याला पाहूनसुद्धां न बोलतां पुढं गेली.

दशरथाच्या मनांत आलं—सासऱ्यांना आपल्याविषयीं तिरस्कार वाटूं लागला आहे. कां वाटूं नये ? कौसल्ये, तूंहि माझा तिरस्कार कर. तिरस्कारानं मारून टाका या दशरथाला ! मी चुकलों. पण कुणी चुकत का नाहीं ?

असा विचार करीत तो मुलाजवळ आला. खालीं बसला मग एकाला मांडीवर

घेऊन त्यानं कुरवाळलं. पण त्या लहान जिवाच्या मनांतसुद्धा दशरथाबद्दल तिरस्कारानं घरणं दिलं असावं. तो मान वाकवूं लागला, अंग चोरूं लागला.

दशरथाला तें फारच जाणवलं. त्याच्या हृदयांत दुःखाचा एक तीव्र आवेग आला. मग घरांतल्या साऱ्या लोकांना ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानं त्यानं स्वतःशीं बडबडण्यास सुरवात केली—

' मी चुकलों. कुणी चुकत का नाहीं? बोलूं नको माझ्याशीं. बरंय्! पुन्हा केव्हातरी वेळ येईल. कौसल्ये! तूंसुद्धां गप्प अं? ठीक आहे. तुला ठाऊक आहे, कीं तूं मला फार आवडतेस. माझा जीव तुझ्यावर आहे हें तूं ओळखून आहेस. कर, माझे हाल कर. तुला वाटतं, मी दुखानं का दारू प्यालों? नर्स आणायला पैसे होते का? तूं अशी अडलेली. तुला सोडवायला मला कांहीं करतां येत नाहीं. कौसल्ये! मला किती यातना झाल्या असतील! मग दारू प्यालों. शहरांत लवकर पोचावं म्हणून दारू घेतली. जरा जास्त झाली. माणूस चुकतो. काय रे! ऐकतो आहेस ना? मीं चुकलों. पाया पडूं? '

नि दशरथानं खरोखरच जवळच्या मुलाच्या पायावर डोकं ठेवलं! त्या मिणमिणत्या उजेडांत, घरांतल्या भयाण शांततेंत, स्वतःशीं मोठ्यानं चाललेली त्याची बडबड इतकी विलक्षण करुण होती, की ऐकणाऱ्याला रडूं आल्याशिवाय राहिलं नसतं.

नाना कटु अनुभवांनी नि ओढघस्तीच्या परिस्थितीनं कठोर बनलेलं त्याच्या आईचं हृदयसुद्धा विरघळलं. पदराला डोळे पुशीत ती दरवाजांत आली. तिचं सारं आयुष्य त्या खेड्यांत गेलं होत. खेड्याच पन्नास वर्षांचं आयुष्य तिच्यापुढं होतं. माणस दरिद्री होत चालली आहेत, माणसं लबाड होत चालली आहेत, माणुसकी जात चालली आहे—या गोष्टी आपल्या बायकी शब्दांत तिनं अनेक वेळां बोलून दाखविल्या होत्या. तिच्या मुलापेक्षांहि अधिक भणंग नि फुकट गेलेले पुरुष तिला ठाऊक होते. आपण जास्त कठोर वागलों या जाणिवेनंच तिचं मन हळवं झालं नि डोळ्यांत पाणी आलं. पदरानं डोळे पुशीत ती लेकाला म्हणाली, ' दशरथा! झालं तें होऊन गेलं. घरांत ये. हातपाय धू. तुझी बायको बाळंत झाली. मुलगा झाला. दोघं चांगलीं आहेत. मी मात्र दिलीच आहे. '

दशरथ उठला, सदरा काढून हातपाय धुउन कौसल्येच्या खोलीशीं तो आला न आला तोंच आंतून मुलानं टाहो फोडला–' कँहाँ ! कँहाँ ! '

दशरथ होता तिथंच उभा राहिला. त्याच्या चेहऱ्यावरील गंभीरपणा जाऊन हळूहळू तिथं हसूं दिसूं लागलं. त्याची आई जवळूनच हातांत कसलं तरी भांडं घेऊन जात होती. तिच्याजवळ जाऊन लहान मुलाप्रमाणं तिचे हात हिसळीत तो म्हणाला, ' आई ! ऐकते आहेस ना ? अगदी कौसल्येसारखा आवाज आहे, नाहीं ? '



## रेडिओची गोष्ट!

त्या वर्षातील मुहूर्त तर गेलेच, पण पुढील वर्ष आलं नि त्यांतील मुहूर्तेही जाऊं लागले, तेव्हां आमचा जरी वरपक्ष होता, तरी आम्हाला रुखरुख लागली. मग वधूकडील लोकांना काळजीनं घेरलं, यांत नवल काय! स्वत:ची मुलगी झाली तरी तिची जात मुलीचीच—भोंवतालीं मोह घिरट्या घालीत असायचे. त्यांतून लग्न लांबणीवर पडत चाललेलं. मुलीच्या आईवडिलाप्रमाणे आम्हालाही ती धास्ती होती. कारण मुलगी खरोखरच चांगली होती. लहानपणापासून आमच्या मुला-बरोबर खेळतांना—हसतांना नि वाढतांना आम्ही तिला पाहत होतो. आमची तिच्यावर माया जडली होती.

आमचा मुलगा प्रभा R. I. N. (रॉयल इंडियन नेव्ही) मध्यें होता. तीन वर्षांपूर्वी तो समुद्रावर गेला. तेव्हांपासून दोन तीन वेळा तो घरीं येऊन गेला. पण गेल्या दीड वर्षांत त्याला रजा मिळाली नव्हती, आम्ही दोघं नवराबायको कधीं एकत्र, कधीं वेगवेगळीं अशीं पत्रावर पत्रं पाठवीत होतों कीं बाळा, एकदा रजा घेऊन घरीं ये नि ही जबाबदारी आपल्या शिरावर घे!

आमच्या पत्रांना त्याचीं उत्तरं कुठून तरी हिंदुस्थानांतून किंवा कुठून तरी पॅसिफिकमधून अशीं येत. त्यांमध्यें त्याच्या पाहण्यांत येणाऱ्या वेगवेगळ्या ठिकाणच्या गमती असत. लग्नाबद्दल तो लिही.

"घाई कां करतां? वधू तयार आहे, वरही तयार आहे. रजा मिळतांच येईन नि सारं ठीक होईल."

आम्हाला ज्याप्रमाणं त्याचीं पत्रं येत त्याचप्रमाणं शांतीच्या आई–वडिलां-नाही तो पत्र पाठवी. मग आम्ही दोन जोडपीं एकत्र आलों कीं आपापल्या पत्रांतील मजकूर परस्परांना सांगून त्यांत पुत्रभेटीचा आनंद घेत असूं.

पण आमच्यापेक्षां शांतीला आलेल्या पत्रांचं महत्व अधिक होतं. तिला पत्र आलं कीं ती तडक आमच्याकडं येई. मग तिची भावी सासू नि ती दोघी कुठं तरी बाजूला बसून तें पत्र वाचीत असत. त्यानं कांहीही खासगी लिहिलं असलं तरी तें न खोडतां शांता तिला वाचावयाला देई. तो इतका दूर होता नि त्याला भेटायची तिला इतकी उत्कट इच्छा होती, कीं त्याचं पत्र कुणाला तरी वाचून दाखवल्याशिवाय तिच्या जीवाला धीर येत नसावा.

सासूसुनेचं हें पत्रवाचन अगदीं खाजगी चाले. मला त्या ठिकाणीं फिरकण्याचीही परवानगी नव्हती. सासूसून मैत्रिणींप्रमाणं परस्परांशीं लगट करून बसत. दोघींच्या आयुष्याला ती एकच व्यक्ती द्वारकेच्या खांबासारखी आधार देऊन होती. त्याचं जीवन त्या दोघींचं होतं. म्हणूनच नि:संकोच एकमेकांचीं पत्रं त्या वाचीत नि वाचतां वाचतां दोघींचे डोळे ओले होत नि थोड्याच वेळांत बाहेर हुंदके ऐकूं येऊं लागत.

त्या पत्रांनीं आम्ही पांच माणसं अशा कांहीं विलक्षण जिव्हाळ्यानं गुंफलों गेलों होतों! स्वत:च्या घरीं चैन पडलं नाहीं कीं शांता आमच्याकडं येई. आपल्या सासूला घरकामांत मदत करूं लागे किंवा त्याच्या खोलींत कांहीं तरी पुस्तक वाचीत बसे. तिचं येणं–जाणं अगदीं घरच्यासारखं झालं होतं.

लग्न लांबणीवर पडत आहे इतकीच विवंचना आम्हांला असतांना अचानक एका सातव्या माणसाचा आम्हांला पत्ता लागला. सातवं म्हणजे असं–आम्ही दोन जोडपीं–आमचा मुलगा–त्यांची मुलगी अशी सहा याशिवाय सातवं माणूस आहे नि तें आम्हांला छळणार हें आमच्या लक्षांत आलं.

त्या माणसाचं नांव–अलका. आमच्या गांवांतली ती सुविख्यात मुलगी होती. अलका हें कांहीं तिचं खरं नांव नव्हतं. तें कांहीं तरी वेगळंच होतं असं म्हणत. अलका रंगानं उजळ नव्हती, सांवळीच होती. दिसायला सुंदर नव्हती, पण रेखीव होती. तिची पोषाख करायची ढब अतिशय आकर्षक होती. कुठं कोणता

रंग शोभतो याचं तिला चांगलं ज्ञान होतं. नि या सर्वांबरोबर ती धूर्त होती!

ही अलका एके दिवशीं सकाळीं आमच्याकडे आली. तिनं एक पत्र माझ्या हातीं दिलं. तें माझ्या मुलाचं होतं.

पत्र उघडून मी वाचलं. त्यानं आपली बासरी मागितली होती. अलकेजवळ मीं ती द्यावी म्हणजे अलका पाठवून देईल, असं त्यानं लिहिलं होतं.

मीं बासरी दिली. अलका ती घेऊन गेली.

पण अलका गेल्यावर मी अतिशय अस्वस्थ झालों. आपला मुलगा अलकेला पत्र पाठवतो ही कल्पना मला विचित्र वाटली. जें आम्ही ठरवलं होतं, नि जें एकदां त्यानं ठरवलं होतं, त्या सर्वाला अपशकुनच झाला असं माझ्या मनांत आलं.

अलका आली होती हें मी बायकोजवळ मुद्दामच बोललों नाहीं. किंवा आपला मुलगा तिला पत्रं धाडीत असतो हेही सांगितलं नाहीं. नेहमीप्रमाणंच मी मोकळेपणानं वागायचा प्रयत्न चालवला. लग्न उगीच लांबतय् म्हणून बायको-बरोबर चिंता केली. शांतेची कांहीं कारणावरून थट्टा केली नि हंसलों. पण या हसण्याबोलण्यांत माझं मन नव्हतं. तें सारखं विचारीत होतं—आपला मुलगा अलकेला पत्र धाडतो. याचा अर्थ काय! ही ओळख झाली केव्हां? मागील रजेंत तो आला होता तेव्हां भेटली असतील? अशा मुलीबरोबर त्यानं पत्रव्यवहार ठेवावा का?

अलकेचा अल्प परिचय असा देतां येईल. फाजील धीटपणा—धूर्तपणा—नीटनेटकेपणा या जोरावर तिनं आपलं नांव राखलं होतं. ज्या मुलींना मैत्रिणी नसतात पण मित्र असतात, अशी ती मुलगी होती. तिच्या हसण्या बोलण्याला मुलं झटदिशीं भाळत. याचं कारणं तिच्या हसण्यांत कांहीं असामान्य जादू होतीं असं नव्हे तर इतर भोंवतालच्या मुलींत मुलांकडे पाहून हसण्या बोल-ण्याचा धीटपणा नव्हता. ती कुठंही बाहेर पडली कीं एकदोन तरुण बरोबर असायचेच. कुणी म्हणत, तिचा सारा खर्च हे तरुणच करीत असतात. तिच्या जवळचा प्रत्येक जिन्नस तिला भेट आलेला असतो.

हे सारे प्रवाद खरे असतील अगर खोटे असतील; पण कांहीं तरी अफाट करून दाखवावं अशी आवड असलेली ती मुलगी होती. लोकांच्या डोळ्यांत

भरावं याशिवाय तिच्या डोक्यांत दुसरा विचारच नसे. त्यामुळं प्रेमाची भावना सर्वसाधारण तरुण–तरुणींत जशी असते, तशी तिच्यामध्यें नव्हती. म्हणूनच अशा मुलीच्या संगतींत माझ्या मुलांनं यावं, हें मला आवडलं नाहीं.

त्या प्रसंगानंतर बरेच दिवस गेले. त्यानंतर अलका आमच्याकडे कधींच आली नाहीं. मग एके दिवशीं आमच्या मुलाचं पत्र आलं—" रजा मिळाली, स्वारी निघाली आहे. "

मुलगा येणार म्हणून आम्हीं किती तरी तयाऱ्या केल्या. माझी बायको तर उत्साहानं नि आनंदानं उतूं जात होती. घर अगदीं अव्यवस्थित दिसूं लागलं आहे असं ठरवून तिनं साफसफाईला आरंभ केला. त्याची खोली तिनं शांताच्या मदतीनं सजवण्यास घेतली. घरांत खमंग वास दरवळूं लागला. त्याच्या आवडीचे पदार्थ तयार होत होते ना !

मुलाला उतरून घ्यायला आम्ही स्टेशनवर गेलों, तेव्हां मला सारखी एक भीती वाटत होती. आम्हीं स्टेशनवर पोहोंचलों नि माझी भीती खरी ठरली ! अलका स्टेशनवर आली होती. ती उभी होती त्या ठिकाणापासून दूर मी बायकोला नि शांताला घेऊन उभा राहीलों. पण पलीकडे जातांना अलकेच्या अंगावरून आम्हाला जावं लागलं. अलकेच्या पत्राचं माझ्या बायकोला कांहींच ठाऊक नव्हतं. तरीसुद्धां अलकेच्या जवळून जातांना अकलेच्या पोषाखाकडे पाहून तिनं नाक मुरडलेलं मीं पाहिलं.

अलकेनं धारवाडी खणाचं पोलकं घातलं होतं. हिरव्या गडद रंगाचं जॉर्जेट ती नेसली होती. अलकेचं शरीर आधींच रेखींव होतं. चापचोपून बसवलेल्या जॉर्जेटमुळं तें अधिकच उत्तान दिसत होतं. त्यांत तिनं ओठही रंगेवले होते.

आम्ही अलकेजवळून गुपचुप पुढं गेलों, पण अलकेनं मला पाहिलं. माझ्यामागं येऊन तिनं नमस्ते केलं.

ती काय बोलली हें माझ्या बायकोला ऐकूं आलं नाहीं. पण अलका दूर जातांच ठसक्यांत तिनं म्हटलं,—

" काय विचारीत होती बया ? "

" गाडी लेट आहे का विचारीत होती. "

" कुणी येणार आहे वाटतं तिचं ? "

" असेल कुणी नातलग ! "

गाडी आली. आमचा मुलगा खालीं उतरला. तो खालीं उतरतांच अलकेनं पुढं होऊन हसत म्हटलं, " वेल्कम्, सेलर ! "

आपल्या हातांतील फुलं तिनं त्याच्या कोटावर लावलीं. तिचा हात धरून तो जेव्हां आमच्याकडं येऊं लागला, तेव्हां माझ्या बायकोचं तोंड संतापानं लाल झालं होतं. तिनं दांतांत खसखसत विचारलं,

" ही बया इथं कशाला अडमडली ? "

" त्यांची ओळख असेल. "

" ओळख रडली ! हिचे धंदेच असे ! "

पण जें घडलं तें हंसत खेळत झेलण्याशिवाय मला दुसरा उपाय सुचला नाहीं. मी पुढं झालों. मुलाला आपल्या हातामध्यें कवटाळला. शांताचे आई-वडील आले होते, तेही पुढं आले. त्यांनीही दोन चार वाक्यं हंसत खेळत म्हटलीं. मग त्यानं आपल्या आईला नमस्कार केला. तिच्या बिचारीच्या तोंडांतून शब्द निघत नव्हता. डोळ्यांत अश्रु गोळा झाले होते. केव्हां ओघळतील याचा नेम नव्हता.

पुष्कळ दिवसांनीं आवडीचं माणूस भेटलं कीं हर्ष होतो. तो एखादा दुसऱ्या शब्दामधून नि हावभावांतून बाहेर पडतो. त्या शब्दांना अर्थही नसतो. पण बोलणारा हसतो नि ऐकणारा हसतो. दोघांना कळत असतं कीं आज शब्दांचं महत्त्व नाहीं. एकमेकांचे शब्द एकमेकांना ऐकायला मिळतात, यांतच सारा आनंद आहे.

आम्ही तेंच करूं लागलों, पण त्यांत जीव नव्हता. आम्ही बोलत होतों. ते शब्द निर्जीव येत होते. हंसत होतों; तें हसणं उगीचच घुमत होतं.

भेटीगांठी झाल्या; आम्ही स्टेशनबाहेर आलों. बाहेर येतांच अलकेनं त्याचा एक हात धरून म्हटलं,

" प्रभा ! तूं माझ्याकडे प्रथम यायचं कबूल केलं आहेस. आमच्याकडे एक दिवस रहा नि मग घरीं जा. तुझी सुटका होणार नाहीं आतां. "

कटाक्ष टाकीत—लाडालाडांत ती हें बोलली. तिनं असं म्हटल्यावर कदाचित् मीं मुलाला संमति दिलीही असती; पण इतका वेळ धुसमुसत उभी असलेली बायको आतां खवळली होती. वर्षानंतर मुलगा घरीं आला असतां त्यानं आईकडे न येतां एका नाचऱ्या पोरीकडे उतरावं ! ती अधिक बोललीच नाहीं. त्याचा हात तिनं धरला दुसऱ्या हातानं अलकेचा हात हिसडला नि ती म्हणाली,

" चल रे ! बाहेर गाडी आणली आहे. "

मग अलकेकडे वळून ती म्हणाली,

" तुला कांहीं नसेल. पण दुसऱ्याला आहे कीं नाहीं हें पहावं. "

तिचे शब्द जरा कडकच होते. मला तें आवडले नाहींत. पण बायका एकदा मत्सर करूं लागल्या की त्या काय काय बोलतील हें त्यांना उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाला सुद्धा सांगतां येणार नाहीं !

मुलगा आपल्या घरीं आला. त्याची आई त्याचं कोडकौतुक करूं लागली. मींही कांहीं कमी केलं नाहीं. स्त्रियांची माया—चटकन् रडते, म्हणून दिसते. आमची दिसत नाहीं, इतकंच.

मुलगा घरीं आला; पण पार बदलून आला होता. एक तर तो रंगानं काळवं-डला होता, नि इथून गेला त्यापेक्षां अधिक प्रौढ दिसूं लागला होता. पण त्याचं शरीर प्रौढ झालं होतं एवढंच नव्हे, तर त्याच्या वृत्तीही निबर झाल्या होत्या. पूर्वींपेक्षां त्याच्या बोलण्यांत अश्लील शब्द जास्त येत होते. नि बोलण्याचे विषय भडक नि उत्तान होते. त्याची पाहण्याची दृष्टि बदलली होती. पूर्वींची त्याची सौम्य वृत्ति, लहानसहान गोष्टींत हौसेनं मन घालण्याची आवड, कसलंच कांहीं राहिलं नव्हतं.

शांतेशीं होणारी वागणूक तर विचित्रच झाली होती ! पूर्वीं शांतानं घरांत पाऊल ठेवल्यापासून तों ती बाहेर निघेपर्यंत तो तिच्या मागं या खोलींत त्या खोलींत हिंडत असे. तिच्याशीं बोलतांना त्याला आदर नि भीति दोन्ही वाटत असे. मर्यादा तो कधीं ओलांडत नसे.

पण तिच्याशीं बोलणं त्यानं थांबवलंच होतं. तीं दोघं बसलीं असलीं कीं पूर्वींप्रमाणं तिच्याकडे एक लावून न पाहतां तो खिडकींतून बाहेर पहात असे

नि ती बरीचशीं वाक्यं बोलली कीं कष्टानं एखादं दुसरं वाक्य त्याच्या तोंडून बाहेर येई.

आल्यानंतर एकदोन दिवस प्रभा बाहेर पडला नाहीं. आम्हीं त्याला बाहेर पडूं दिलं नाहीं, हेंच खरं. दोन दिवसांनंतर तो सकाळीं बाहेर पडूं लागला. असा तो बाहेर गेला, कीं जेवणाच्या वेळेवर येई, कधीं उशिरां येई, कधीं येतच नसे. त्याची वाट पाहून अन्न थंड होई. त्याच्या आईचें डोळे सुकून जात. शेवटीं तिला पानावर बसवून चार घांस बळंबळं भरवण्याची माझ्यावर पाळी येई.

संध्याकाळीं कधीं तो बाहेर पडला तर रात्रीं दोन तीन शिवाय घरीं येत नसे. कांहीं वाजलं कीं मी उठावं, दरवाजापर्यंत जाऊन यावं. बायकोनं उठावं नि " आले रे बाळ " म्हणत दरवाजा उघडावा. पण त्याचा पत्ता नसावा. आमचे हे प्रेमाचे आभास होते. तो घरांत शिरला कीं सिगारेटचा भपकारा तोंडावर येई. आमच्याशीं कांहीं न बोलतां तो आपल्या खोलींत जाऊन झोंपे.

तो बाहेर कुठं जातो हेंहीं लवकरच आम्हाला कळलं. अलका आणि तो, दोघांना हिंडतांना ठिकठिकाणी लोकांनीं पाहिलेलं आमच्या कानावर आलं. मला स्वतःला तीं दोघं दृष्टीला पडतील या धास्तीनं बाहेर जायची भीति वाटूं लागली.

आपल्या मुलाची वागणूक चुकत आहे हे कळत असूनही मला बोलवत नव्हतं. त्या बाबतींत त्याला प्रश्न केला असता तर आमचा तो द्वेष करूं लागला असता, ही भीति होती. आपला मुलगा आपल्यापासून दूर होत आहे ही कल्पना अत्यंत दुःख देणारी असते. लहानपणीं आशाभंगासारखं दुःख नसतं; तरुणपणीं प्रेमभंगासारखं दुःख नसतं; म्हातारपणीं अपत्यभंगासारखं दुःख नसतं.

आमचं दुःख आम्हाला बोचत होतंच, पण त्यापेक्षां शांताचं दुःख पाहून आम्हीं वेडीं होत होतों. ती आपलं दुःख कुणाजवळ बोलत नव्हती. आमच्याकडचं येणं जाणं तिनं कांहींसं कमी केलं होतं, तरी आल्यावर ती कांहीं झालं नाहीं अशा अविर्भावानं वागायचा प्रयत्न करीत असतां असा एखादा शब्द तोंडांतून बाहेर पडे—असा एखादा विषय निघे, कीं पाहतां पाहतां तिचे डोळे ओले होत नि तोंड हातांत लपवून ती बाहेर जाई.

पडलेली ही कोंडी सर्वांनाच तापदायक झाली होती. ती फुटत नव्हती नि होणाऱ्या वेदना कमी होत नव्हत्या. दिवसामागून दिवस जात होता नि यांतून कसं बाहेर पडायचं त्याचा मार्ग दिसत नव्हता.

म्हणूनच एके दिवशीं बायकोनं डोळ्यांत पाणी आणून मला म्हटलं,

" एक इच्छा पुरी कराल का माझी ? "

" बोल ना. "

" सत्यनारायण करावा असं माझ्या मनांत आहे. "

मी लगेच संमति दिली. सत्यनारायणावर माझी श्रद्धा होती असं नव्हे पण तिच्या श्रद्धेनं तिनं मार्ग काढला होता. दुसरा मार्ग मला सुचत नव्हता. सत्य-नारायणांतून हवं तें मिळालं नाहीं, तरी तिच्या मनाला समाधान लाभेल आणि कांहीं तरी करीत राहिल्याचं श्रेय मिळेल.

सत्यनारायणाची तयारी जोरांत सुरू झाली. आमच्या आप्तेष्टांना प्रसादाला बोलावलं. पूजेनंतर कांहीं निवडक आप्तमित्रांसाठीं भोजनाचा उपक्रम केला.

आश्चर्य असं, कीं बायकोनं अलकेला बोलावण्यास सांगितलं ! पूजा चालू असतां समारंभ होत असतां मुलाचं मन बाहेर भरकटूं नये असं तिच्या मनांत असावं.

एकंदर समारंभ अतिशय सुंदर झाला. पानसुपारी आगतस्वागत कशांत कांहीं कमी पडलं नाहीं. आमच्याकडे रेडियो होता. प्रभानं नव्या नव्या रेकार्ड आणल्या होत्या. रेकॉर्ड रेडियोवर लावायचं काम त्यानं अलकेकडं सोपवलं होतं; तिनं आपलं काम छानच बजावलं.

पानसुपारी, प्रसाद आला. पानसुपारीसाठीं बोलावलेले परत गेले. जी खास मंडळी जेवणासाठीं बोलावली होती तेवढीच राहिली.

जेवणसुद्धां खेळीमेळींत झाली. तरुण मुलींनी वाढण्याचं काम घेतल्यामुळें तरुण मुलांना अधिक भुका लागल्या. एकमेकांना आग्रहानं वाढणं सुरू झालं.

जेवण आटोपल्यावर आम्ही सर्व स्त्री-पुरुष नातलग मंडळी बाहेर दिवाणखान्यांत जमा झालों. सर्वजण एकमेकांच्या परिचयाचे असल्यानं स्त्रियांनासुद्धां संकोच

वाटण्याचं कारण नव्हतं. बाहेर आल्यावर कुणी तक्क्यावर लंवडले, कुणी आरामखुर्चीवर पहुडले, कुणी पान खाऊं लागले, कुणी सिगारेटी पेटवल्या. प्रभा रेडियोजवळ गेला नि त्यानं रेडियो लावला.

इकडून तिकडे कांटा फिरवीत तो वेगवेगळी स्टेशनं घेत होता. मधूनच एखादं इंग्रजी गाणं लावी, मधूनच कुठं तरी भाषण येई. मधूनच मोर्स कोडवरचा रेडियो तारांचा संदेश कुक्‌–क्कू——कू करीत येत राही.

असा खेळ तो थोडा वेळ करीत राहिला. मग अचानक एका मोर्सकोडच्या स्टेशनावर त्यानं कांटा आणला नि तसाच ठेवला. कुणी तरी रेडिओवरून बिनतारी संदेश धाडीत होतं. पोस्टांतील तारेच्या कड–कट्‌ आवाजांत आम्हाला जितकं समजतं तितकंच या रेडिओ संदेशांच्या कुकूकुकूंत कळत होतं.

पण प्रभा मात्र अचानक गंभीर होऊन ऐकूं लागला होता. R. I. N. मध्यें असल्या कारणानं मोर्सकोडवरील संदेशाचा अर्थ लावण्याचं साहजिकच त्याला ज्ञान होतं. अलका त्याच्या बाजूच्याच खुर्चीवर बसली होती. सगळ्या समारंभांत तिनं त्याची बाजू सोडली नव्हती. सर्वांच्या ही गोष्ट लक्षांत आली होती नि सर्वजण ती लक्षांत न आल्याचं दाखवीत होते.

अलका खुर्चीवर बसल्या बसल्या ' लिसनर ' चा अंक घेऊन वेगवेगळ्या स्टेशनांचे कार्यक्रम पाहूं लागली. अंक चाळीत असतां एकदम एका कार्यक्रमावर बोट ठेऊन तिनं प्रभाला म्हटलं,

" प्रभा ! ए ! हा कार्यक्रम लाव ना रे ! "

" कोणता ? "

" हा बघ ! फर्माइशी प्रोग्राम दिल्लीचा. झकास फिल्मी गाणीं ऐकायला मिळतील. "

प्रभा रेडिओ ऐकण्याच्या नादांत होता. तो म्हणाला,

" बरं. "

त्याचं आपणाकडे लक्ष नाहीं असं पाहून मान वेळावीत ती म्हणाली,
" असं काय रे करतोस ! दिल्ली घे ना ! "

" घेतो–घेतो. "

पण घेतो म्हणूनही त्यानं कांटा बदलला नाहीं; उलट अगदी लक्ष लावून रेडियोतून येणारा संदेश तो ऐकूं लागला !

" कुकु—कूकूकू—कुकूकु—कूकूकु. "

कांहींशी खट्टू होऊन अलका म्हणाली,

" फक्त एक मिनिट राहिलंय आतां. जाईल कीं रे तो प्रोग्राम. "

पण " थांब थांब " म्हणण्यापलीकडे प्रभानें कांहीं केलं नाहीं. त्या दोघांमध्यें चाललेला संवाद आणि प्रभानं लावलेलं ते बिनशब्दाचं संदेशी स्टेशन यांमुळं आम्हा सर्वांच्या मनांत कुतूहल उत्पन्न झालं. कुणी तरी पुढं होऊन विचारलं.

" काय ऐकतो आहेस रे, प्रभा ? "

" सांगतो. "

तो पुन्हा लक्ष देऊन ऐकत राहिला. त्याचा गंभीर चेहरा पाहून आम्हाला राहवेना. दोघेचौघे एकदम म्हणाले,

" प्रभा ! सांग ना रे ! "

प्रभा म्हणाला,

" एक जहाज बुडत आहे. जहाजावरचा ऑपरेटर मदतीसाठीं संदेश पाठवीत आहे. "

प्रभा पुन्हा ऐकूं लागला. इतका वेळ मागं बसलेले आपापल्या खुर्च्या घेऊन पुढं आले नि ते कुतूहलानं प्रभाकडे पाहूं लागले. रेडिओतून संदेश येतच होता:

" कुकूकू कूकूकु—कुकूकु. "

मग प्रभा आम्हाला भाषांतर करून सांगूं लागला:

" जहाजाचं नांव ' इंडिपेंडंट ' आहे—जहाज × × × अक्षांश आणि * * * रेखांशावर आहे.

" वादळांत सापडल्यानं खडकावर आपटून जहाजाला भोक पडलं आहे. वादळ अजून जोरांत आहे. जहाजांत पाणी शिरत आहे. जहाज इतके हेलकावे खात आहे कीं उभं राहतां येत नाहीं. आम्हाला मदत हवी आहे. आम्ही बुडत

आहोंत–" इंडिपेंडंट " जहाजाच्या संदेश-स्टेशनावरून मी बोलत आहें–आम्ही × × अक्षांश नि × × रेखांशावर आहोंत. मदतीला या ! "

प्रभा हें सांगत असतां अलका अवस्थ होत चालली होती. वारंवार ती आपल्या घड्याळांत पाहत होती. प्रभाचा हात धरून ती म्हणाली,

" बघ ! एक रेकॉर्ड गेलीसुद्धां–आतां काननची रेकॉर्ड आहे, दिल्ली लाव ना. "

तिचा हात दूर करीत " लावतों " इतकंच म्हणून संदेश ऐकत प्रभापुन्हा आम्हाला सांगू लागला:

" आमचं जहाज एका बाजूला कलूं लागलं आहे. नाळीची बाजू पाण्यांत शिरली आहे. चहूंबाजूनं पर्वतासारख्या लाटा उठत आहेत. ' इंडिपेंडंट ' जहाजाच्या * * * नंबरच्या संदेश स्टेशनावरून मी बोलत आहें. आम्हाला मदत हवी आहे. आमचं जहाज बुडत आहे. "

थोडा वेळ थांबून संदेश सुरू झाला.

" सहा तासांपूर्वी वादळ सुरू झालं. वादळांत जहाज झुकलं. खडकावर आपटलं. आम्ही * * * अक्षांश नि * * * रेखांशावर आहोंत. आम्हाला मदत पाठवा. "

" आम्ही बायकामुलांना खालीं उतरवीत आहोंत. जहाजावर पांचशें माणूस आहे. लहान लहान बोटी खालीं उतरवीत आहोंत. पण त्या वादळांत टिकतील असं वाटत नाहीं. "

" पंधरा होड्या खालीं उतरविल्या, त्यांपैकीं दहा कुठं गडप झाल्या हें समजलंच नाहीं. बाकीच्या पांच समुद्राशीं झगडत आहेत. "

जरा रेडिओ संदेश थांबतांच अलका म्हणाली,

" आतां मात्र मी ऐकायची नाहीं हं, प्रभा ! ही पांचवी रेकॉर्ड पंकज मलिकची आहे. ' कोण देश है जाना–बाबू ! ' मला फार आवडते रे ती. जरा दिल्ली लाव ! "

" जरा थांब. "

पुन्हां संदेश सुरू झाला नि प्रभा सांगूं लागला.

" ऑपरेटिंग रूममध्यें पाणी आलं आहे. एक कोंपरा खालीं कलंडला आहे. त्या कोपऱ्यांत पाणी चढत आहे. एक बॅटरी पाण्यांत भिजली. आतां फक्त एकच बॅटरी चालू आहे. ती चालू आहे तोंपर्यंत मला संदेश देतां येईल. Q. P. L. स्टेशन बोलत आहे. आमचं जहाज बुडत आहे. + + + अक्षांश + + रेखांश. या, मदतीला या ! "

पुन्हां शांतता झाली. पुन्हां संदेश आला.

" एंजिनिअरनं एंजिन बंद केलं आहे. आतां उरलेल्या एका बॅटरीवर ताण पडणार. खोलींत अंधार झाला आहे. बॅटरीवर लहानसा दिवा लावला आहे. बाहेर स्त्रिया नि मुलं रडत आहेत. भीतीनं ओरडत देवाचा धांवा करीत आहेत. Q. P. L. स्टेशन × × × अक्षांश × × रेखांश. आम्हांला मदत द्या. वांचवा. "

संदेश जेव्हां जेव्हां मध्यें थांबत होता, तेव्हां तेव्हां आमच्या ऐकणारांत भीषण शांतता पसरत होती. प्रत्येकाच्या चेहेऱ्यावर भय-उत्सुकता–करुणा हे भाव दिसत होते.

पण अलका मात्र दुर्मुख होऊन बसली होती. तिचं म्हणणं न मानल्यामुळं चार लोकांदेखत प्रभानं जो तिचा अपमान केला होता त्याचंच तिला दुःख वाटत असावं. तिचा तो हट्टीपणा पाहून आम्हाला सर्वांना नवल वाटत होतं. ही इतकी निष्ठुर कशी ! दुसऱ्याबद्दल हिच्या मनांत यत्किंचितही ओलावा कसा नाहीं ! दुसऱ्याबद्दल बेपर्वाईनं वागून स्वतःच्या भावनांचीच पूजा करण्याच्या तिच्या या स्वार्थी वृत्तीची आम्हा सर्वांनाच घृणा वाटली.

रेडिओ संदेश पुन्हां सुरू झाला.

" आम्हाला मदत पाठवा. पांचशें स्त्री-पुरुष-मुलं यांचा जीव धोक्यांत आहे. कुणी तरी या—"

तो ऑपरेटर आतां अधिक जलद बोलूं लागला होता. पूर्वीप्रमाणं मोजक्या शब्दांत मदतीसाठीं हाक मारण्याचं त्यानं सोडलं. त्याचे शब्द भराभर येऊं लागले. तो विनंति करूं लागला—करुण करुण शब्दांत मदत मागूं लागला.

आपलं नि भोंवतालच्या परिस्थितीचं त्यानं भयंकर चित्र मांडलं. त्याच्यासमोर मृत्यु उभा आहे हे त्या शब्दाशब्दांमधून कळत होतं.

"आतां गुढग्यापर्यंत पाणी आलं. बॅटरीवर पाय ठेवून मी काम करीत आहे, थोड्याच वेळांत कमरेभोवतीं पाणी चढेल. कुणी तरी मदत पाठवा. हें Q. P. L. स्टेशन आहे. ××× अक्षांश ××× रेखांश."

"आमचा संदेश कुणालाच का ऐकूं जात नाहीं ? आम्ही आशा सोडावी का ? पांचशें माणसांना थोड्याच मिनिटांत जलसमाधि मिळणार. माझ्या आई व वडिलांना मी शेवटचं वंदन करतों. येतो ! आतां भेट पुढील जन्मीं !"

संदेश थांबतांच स्त्रियांमधून हुंदक्याचे आवाज आले. नाकं वाजूं लागलीं. पदर डोळ्यांकडे गेले. आम्हांला वाटलं संपलं ! पण पुन्हा संदेश येऊं लागला.

"पांचशें स्त्री-पुरुष मुलं समुद्रतळाशीं जात आहेत. त्यांचें नातलग दुःखानं वेडे होतील. मृत्युनं आमच्याभोंवती पाश टाकले. जगाशीं आमचा संबंध तुटत आहे. आमच्या आप्तेष्टांनी क्षमा करावी; आमच्याबद्दल देवाजवळ प्रार्थना करा."

हळुहळू आवाज लहान होत चालला.

"बॅटरी उतरत आहे. पाणी वर चढत आहे अजूनही मदत आली, तर आशा आहे. ××× जाक्षांश ××× रेखांश."

किंचित् स्तब्धता आली. रेडियोसेटकडे डोळ्यांत प्राण आणून आम्ही पाहूं लागलों. सर्वांचेच डोळे ओले झाले होते.

पण अलका निश्चल होती. संदेश थांबतांच तिनं घड्याळाकडे पाहिलं नि एकदम वीज संचारल्याप्रमाणं ती उठली. रेडियोकडे जात ती म्हणाली.

"प्रभा ! आतां मात्र चालायचं नाहीं. ही शेवटची रेकॉर्ड ज्युतिका रेची आहे. ती ऐकलीच पाहिजे; हें कुकू पुरे कर ! थांब, मीच लावते दिल्ली."

पुढं होऊन तिनं रेडिओच्या नॉबला हात घातला नि झटकन् कांटा दिल्ली स्टेशनवर आणला. प्रभा संदेश केव्हां चालू होईल त्याची वाट पाहण्यांत मग्न होता. गाण्याचा आवाज ऐकतांच त्यानं चटकन् वर पाहिलं. अलकेला रेडिओजवळ पाहतांच त्याचें डोळे रागानं लाल झाले. तो ताडकन् उभा राहिला. अलकेचे

दोन्ही हात धरून त्यानं तिला समोर उभी केली नि दुसऱ्या हातानं तिच्या मणसणीत थोबाडीत दिली !

या अनपेक्षित प्रकारानं आम्ही तर बावरलोंच, पण अलकाही बावरली. गालावर हात ठेऊन भेदरलेल्या नजरेनं तिनं इकडे तिकडे पाहिलं, नि दुसऱ्याच क्षणाला टेबलावरची पर्स उचलून ती बाहेर गेली.

कांहीं झालं नाहीं या आविर्भावांत आम्ही रेडिओकडे पाहत राहिलों. प्रभा खालीं बसला नि दिल्लीकडे नेलेला रेडिओचा कांटा त्यानं परत पूर्वीच्या जागीं आणला. संदेश सुरू झाला होता.

" विमानांची घरघर ऐकूं येत आहे. देवानं आमची प्रार्थना ऐकली. दुरून जहाजाचा कानोसाही येत आहे. अजून दहा मिनिटांत जरी तें जहाज आमच्या-जवळ आलं, तरी निम्मे जीव वांचतील.—

" खरंच जहाज आलं आहे. कमरेपर्यंत पाण्यांतून मी डेककडे जात आहें. आम्हीं बचावलों. आमचं रक्षण झालं. आम्हीं आभार मानतों. नमस्ते. "

जे अश्रु दुःखाचे होते ते क्षणांत आनंदाचे झाले. बायकांच्या चेहऱ्यावर ' ऊनपाऊस ' झळकूं लागलं. हसत हसत पदरानं डोळे पुशीत त्या उठल्या. प्रभानं रेडिओ बंद केला. रेडिओ बंद करून तो खोलींत खालच्या मानेनं येरझारा करूं लागला.

इतका वेळ शांतीकडे कुणाचं लक्ष नव्हतं. ती बाजूच्या खोलींत बसली होती. प्रभाची नजर तिच्याकडे गेली. त्यानं आपलीं पावलं त्या खोलीकडे वळवलीं.

आम्हीं परस्परांकडे पाहिलं. माझ्या बायकोचे डोळे ओले झाले. हसत हसत ती रडूं लागली.

